## संगीत, नाट्य विषयक प्रकाशने

| अ.क्र. | पुस्तकाचे नाव | | रुपये |
|---|---|---|---|
| १) | लयताल विचार | .. | ८०-०० |
| २) | माझा संगीत व्यासंग | | २८-०० |
| ३) | गायनमहर्षी अल्लादियॉं खॉं यांचे चरित्र | .. | १६-०० |
| ४) | गानहिरा | .. | २२-०० |
| ५) | आराधना | .. | ८०-०० |
| ६) | रसराज | .. | ३८-०० |
| ७) | रस - भाव - विचार | .. | २३-०० |
| ८) | दशरुपक विधान | .. | २३-०० |
| ९) | भूमिका शिल्प | .. | २५-०० |
| १०) | शेक्सपिअर परिचय ग्रंथ | | २५-०० |
| ११) | तंजावूर नृत्य प्रबंध | .. | १६५-०० |
| १२) | मराठी नाटकांची गंगोत्री | | १२०-०० |
| १३) | नाट्य मंडप | .. | १५-०० |
| १४) | बाल चरित | .. | २०-०० |
| १५) | ग्रीक शोकनाट्य (इस्किलस) | .. | ७०-०० |
| १६) | ग्रीक शोकनाट्य (सोफोक्लीस) | .. | ४५-०० |
| १७) | मी इझाडोरा | .. | २६-०० |

# भरत-मुनि-प्रणीतं नाट्यशास्त्रम्

## अष्टाविंशोऽध्यायः ।

अभिनवभारतीसह सटीप
मराठी भाषांतर

अनुवादक

श्री. चै. पां. देसाई

डॉ. ग. ह. तारळेकर

संपादक

डॉ. ग. ह. तारळेकर

☐ प्रथमावृत्ती : १९९९

☐ प्रती : ११९५

☐ प्रकाशक : अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि
संस्कृति मंडळ, मुंबई.

☐ मुद्रक : व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय,
पुणे ४११ ००१.

☐ मूल्य : रूपये ७७/-

# निवेदन

भरतमुनी प्रणीत "नाट्यशास्त्र" हा ग्रंथ "नाट्यशास्त्र" या कलेविषयीचा अत्यंत महत्वपूर्ण ग्रंथ मानला जातो. या शास्त्रातला तो प्राचीन ग्रंथ असला तरी त्याचे महत्व आजही सर्वमान्य आहे. नाट्य आणि संगीत या दोन कला आज भिन्नभिन्न मानल्या जातात. म्हणूनच गद्य नाटकांची परंपरा रंगभूमीवर निर्माण झाली आणि विकसितही झाली. परंतु जुन्या परंपरेनुसार संगीत हे नाट्याचे एक आवश्यक अंग मानले जाते. स्वतः भरतमुनींनी "गीति ही खरोखर नाट्याची शय्या म्हणजे विश्रांतीस्वरूप आधार आहे असे म्हणतात. गीत आणि वाद्य यांचा सुविहित प्रयोग केला तर नाट्यप्रयोगाची कसलीहि हानी होत नाही" असे म्हटले आहे. म्हणून भरताचे नाट्यशास्त्र या प्राचीन ग्रंथातून प्राचीन भारतीय संगीताचेही शास्त्रशुद्ध स्वरूप समजण्यास साहाय्य होते.

भरताच्या या नाट्यशास्त्राचे योग्य आकलन होण्यासाठी भट्ट अभिनवगुप्ताची अभिनव भारती टीका हाच एकमेव ग्रंथ आज उपलब्ध आहे. कै. रामकृष्ण कवी यांनी अभिनव भारती टीकेसह अत्यंत अभ्यासपूर्वक या नाट्यशास्त्राचे संपादन केले. त्यांनी चार भागात ते संपादित केले असले तरी त्यातील चौथ्या भागाचे संपादन प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे पुरेशा काटेकोरपणे त्यांना करता आले नाही. या चौथ्या भागात सुमारे सहा अध्यायात संगीताचे विवेचन आहे. परंतु त्यात संपादकांच्या प्रकृतीच्या कारणामुळे बरीच अशुद्धता राहिली. श्री. कवी यांच्या निधनानंतर बडोदा येथील पंडित पदेशास्त्री यांच्याकडे त्यातील दोष दूर करण्याचे काम सोपवले गेले. परंतु तेही काम पुरेशा साधनांच्या अभावी तसेच राहून गेले.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने नाट्यशास्त्राच्या २८ व्या अध्यायाचे मराठीत भाषांतर करण्याचे काम श्री. चैतन्य पांडूरंग देसाई या संगीततज्ञाकडे सोपविले होते. परंतु त्यांचेहि अकाली निधन झाल्यामुळे तेही काम पुरे होऊ शकले नाही. मंडळाने नंतर हे काम डॉ. ग. ह. तारळेकर यांच्याकडे सोपविले. ते महत्वपूर्ण काम डॉ. तारळेकर यांनी परिश्रमपूर्वक पूर्ण केल्यामुळे आज हा ग्रंथ विहित स्वरूपात प्रकाशित होत आहे. डॉ. तारळेकर यांनी अतिशय अभ्यासपूर्ण रीतीने या २८ व्या अध्यायाचे संपादन करून हा ग्रंथ जिज्ञासू वाचकांसाठी उपलब्ध करून दिला. त्याबद्दल मंडळ त्यांचे मनःपूर्वक आभारी आहे. अभ्यासू संगीतप्रेमी वाचक या ग्रंथाचा यथोचित उपयोग करतील, असा मंडळाला विश्वास वाटतो.

द. मा. मिरासदार
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

प्राचीन भारतीय संगीताचे शास्त्रविहित स्वरूप जाणण्यासाठी भरतमुनिप्रणीत नाट्यशास्त्र हाच सर्वांत जुना ग्रंथ सध्या तरी उपलब्ध आहे. नाट्याचे सांगोपांग वर्णन करणे हा प्रधानहेतु जरी या महान ग्रंथाचा असला तरी संगीत हे नाट्याचे आवश्यक अंग असल्याने त्याचेही शास्त्र सांगणे क्रमप्राप्त होते. भरतमुनि म्हणतात– " गीते प्रयत्नः प्रथमस्तु कार्यः शय्यां हि नाट्यस्य वदन्ति गीतिम् । गीतेऽ पि वाद्येऽ पि च सम्प्रयुक्ते नाट्यप्रयोगो न विपत्तिमेति ॥ " ( बडोदा आ. भाग ४ श्लोक ४३६ ) या श्लोकाचा आशय असा– " गीताच्या बाबतीत प्रथम प्रयत्न करायला हवा. गीति ही खरोखर नाट्याची शय्या म्हणजे विश्रांती स्वरूप आधार आहे असे ( विद्वान ) म्हणतात. गीत तसेच वाद्य यांचा सुयोग्य प्रयोग केल्याने नाट्यप्रयोगाला हानि पोचत नाही. " नाट्यशास्त्राचे सुव्यवस्थित आकलन होण्यासाठी भट्ट अभिनवगुप्तांची अभिनव भारती टीका हीच केवळ एकमेव साधन आहे. स्वर्गीय रामकृष्ण कवि यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक हस्तलिखिते मिळवून अभिनवभारतीसह नाट्यशास्त्र संपादित केले. ते बडोदा येथील गायकवाड ओरिएंटल सीरीजमध्ये ४ भागांत प्रकाशित झाले आहे. पहिल्या भागात अध्याय १ ते ७ (सन १९२६), दुसऱ्या भागात अध्याय ८ ते १८ ( सन १९३६ ), तिसऱ्या भागात अध्याय १९ ते २७ (सन १९५४) आणि चौथ्या भागात अध्याय २८ ते ३७ ( सन १९६४ ) यांचा समावेश आहे. प्रकृतीच्या अस्वास्थामुळे श्री. कवि यांना चौथ्या भागाचे संपादन व्यवस्थितपणे करता आले नाही. या भागात अध्याय २८ ते ३४ यामध्ये संगीताचे प्रतिपादन आहे. गायक-वादक यांचे गुणदोष सांगणारा भाग वेगळा अध्याय म्हणून घेतल्याने या आवृत्तीत अध्यायसंख्या ३७ झाली आहे. श्री. मनोमोहन घोष यांनी संपादित केलेली, नाट्यशास्त्राचे मूळ संस्कृत श्लोक असलेली आवृत्ति दि एशियाटिक सोसायटी, कलकत्ता, यांनी १९५६ मध्ये प्रकाशित केली. श्री. घोष यांनी मूळ संस्कृत पाठ असलेल्या काशी आवृत्ति आणि निर्णयसागर आवृत्ति यांचाहि निर्देश तळटीपांमध्ये पाठभेद म्हणून केला आहे. या आवृत्तीत गायक-वादक गुणदोष वर्णन हा भाग ३२ व्या अध्यायात, म्हणजे ध्रुवाध्यायामध्ये शेवटी केला असल्याने अध्यायाची संख्या ३६ झाली आहे व तीच योग्य आहे. बडोदा आवृत्तीचा पहिला भाग दुर्मिळ झाल्याने त्याची दुसरी आवृत्ति प्रकाशित झाली आहे व तसेच इतरही सर्व भाग दुष्प्राप्य झाल्याने संपूर्ण नाट्यशास्त्राचे अभिनवभारतीसह पुनः प्रकाशन करण्याचा बडोदा येथील गायकवाड ओरिएंटल सीरीजचा प्रयत्न चालू आहे. हे अत्यंत महत्त्वाचें कार्य धारवाड येथील सेवानिवृत्त संस्कृतचे श्रेष्ठ पंडित के. कृष्णमूर्ति यांचेकडे सोपविले गेले आहे. याशिवाय उज्जयिनी येथील कालिदास अकादमी द्वारा नाट्यशास्त्राचे आंग्ल अनुवादयुक्त प्रकाशन करण्याचे काम चालू असल्याचे समजते.

बडोदा आवृत्तीच्या ४ थ्या भागात संपादक श्री. कवि यांच्या प्रकृतीच्या कारणामुळे बरीच अशुध्दता राहिली आहे. क्वचित त्रुटित स्वरूपही आढळते. श्री. कवि यांच्या निधनामुळे या ४ थ्या भागाचे सुयोग्य संपादन करण्याचे काम बडोदा येथील पंडित पदेशास्त्री यांचेकडे सोपविण्यात आले. पण श्री. कवि यांनी मिळवलेल्या अनेक हस्तलिखितांपैकी एकाचीही प्राप्ती न झाल्याने मुद्रण प्रतीतील दोष दूर करण्याचे काम राहून गेले आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाने नाट्यशास्त्राच्या २८ व्या अध्यायाचे मराठीत भाषांतर करण्याचे काम श्री. चैतन्य पांडुरंग देसाई या संगीतज्ञाकडे सोपविले होते. परंतु त्यांच्या अकाली मृत्यूमुळे त्यांनी हाती घेतलेले कार्य अपुऱ्या स्थितीतच राहिले. नंतर साहित्य संस्कृती मंडळाने हे काम माझ्याकडे सोपविले आणि श्री. देसाई यांचे अपुरे हस्तलिखित त्यांच्या टिप्पणांसह माझ्याकडे पाठविले. स्वर्गीय देसाई माझे सन्मित्र असल्याने ही जबाबदारी मी स्वीकारली.

नाट्यशास्त्राचा काळ सामान्यपणे ख्रिस्तपूर्व ३०० ते ख्रिस्तउत्तर २०० असा विद्वान मानतात. काही विद्वान हा काळ ख्रि. पू. ५०० पर्यंतही नेतात. संगीत ही प्रायोगिक कला असल्याने तिच्या प्रयोगात्मक अवस्थेत परिवर्तन होणे ही गोष्ट स्वाभाविक आहे. अगदी ढोबळ उदाहरण द्यावयाचे झाले तर रससंख्येचे देता येईल. भरताने रस ८ मानले आहेत. 'शांत' या ९व्या रसाचा समावेश त्यांनी दिलेल्या कारिकेत नाही. या कारिकेत ' शांत ' या रसाचाही समावेश करून रससंख्या ९ असल्याची कारिका ही नंतर भट्ट उद्भट यांनी प्रविष्ट केली आहे असे मानण्याला जागा आहे. महाकवि कालिदासाने आपल्या विक्रमोर्वशीय या नाटकातील ३ ऱ्या अंकाच्या प्रारंभीच्या भागात भरतमुनींनी आठ रस असणारा नाट्यप्रयोग अप्सरांच्याद्वारा संपन्न केल्याची माहिती मिळते. याशिवाय ६ व्या अध्यायातील १० वी कारिका ' रसाभावाः ' इत्यादी हीही काही विद्वान प्रक्षिप्त मानतात. यामुळे भरतमुनिप्रणीत मूळ नाट्यशास्त्रात भर पडली असणे सहज शक्य आहे.

अभिनवअुप्त हे काश्मिरी पंडित ख्रि. उ. १० व्या शतकात होऊन गेले. ते अनेक शास्त्रपारंगत असल्याने नाट्यशास्त्रावरील त्यांच्या टीकेचे महत्त्व असाधारण आहे. पण अत्यंत महत्त्वाच्या विषयप्रतिपादनात क्वचित निर्माण झालेल्या त्रुटीमुळे ते प्रतिपादन कळण्यामध्ये अडचण उत्पन्न होते. शिवाय मूळ नाट्यशास्त्रकाल आणि अभिनवगुप्तांचा काळ यामध्ये कित्येक शतकांची दूरी असल्याने एवढ्या दीर्घकाळांत संगीतात काही बदल झाला नसेल असे म्हणता येत नाही. मतंग ( ख्रि. उ. ७ वे ८ वे शतक) यांच्या बृहद्देशी या ग्रंथांत त्यांनी नाट्यशास्त्रातील जातिगानाची माहिती देऊन नंतर रागगायनाचे सविस्तर वर्णन केले आहे. त्यांनी रागगायनाचे वर्णन प्रथम आपणच केले असल्याचे म्हटले आहे. [ ( बृ. श्लो. २७९ ) मतंगाने मार्ग व देशी हा भेदही संगीताच्या बाबतीत सांगितला आहे. ) ]

श्री. देसाई यांच्या अपुऱ्या हस्तलिखिताचा उपयोग करून मी मुद्रणप्रत तयार केली. त्यांनी स्वीकारलेले पाठभेद घेऊन मी भाषांतर केले आहे. ही पाठदुरुस्ती त्यांनी काही थोड्या हस्तलिखितांच्या आधारे सुचविली आहे.

बडोदा आवृत्ति असणाऱ्या नाट्यशास्त्रातील २८ ते ३४ या अध्यायांत भरतमुनींनी जो संगीतविषयक विचार मांडलेला आहे त्याचे थोडक्यात स्वरूप असे – २८ व्या अध्यायात श्रुतिनिदर्शनासह स्वरविचार पूर्णपणे मांडून मग १८ जातींचे वर्णन दिले गेले आहे. प्राचीन काळात संगीताला 'गांधर्व' हा शब्द योजलेला आढळून येतो. गांधर्व वेद हा सामवेदाचा उपवेद मानला गेला आहे. बौद्ध जातककथा आणि जैनग्रंथ, पुराणे, रामायण व महाभारत ही आर्ष काव्ये यांत संगीताला गांधर्व हा शब्द योजलेला आहे. महाभारत आणि बौद्ध व जैन ग्रंथांत गांधर्ववेदामध्ये गायन, वादन आणि नर्तन या तिन्हींचा समावेश केलेला आहे. खारवेलचा शिलालेख ( ख्रि. उ. २ रे शतक ) रूद्रदामनचा शिलालेख ( ख्रि. उ. २ रे शतक) तसेच समुद्रगुप्ताची स्तंभप्रशस्ति ( ख्रि. उ. ४ थे शतक ) यातही गांधर्व हा शब्द संगीत या अर्थी योजलेला आहे. मध्यकालामध्ये ' गीत, वाद्य आणि नृत्त या तिन्हींना मिळून संगीत म्हटले जाते ' अशी संगीताची परिभाषा केली आहे ( उदा. संगीत रत्नाकर १.२१ ). २९ व्या अध्यायांत जातींचा रसदृष्टीने प्रयोग सांगून वर्ण, अलंकार, वीणा इत्यादी विषयी माहिती दिली आहे. ३० व्या अध्यायात वंश ( बासरी ) बद्दलचे विवेचन आहे. ३१ व्या अध्यायात ताल आणि लय यांचा सांगोपांग विचार सांगितला आहे. ३२ वा अध्याय हा ' ध्रुवाध्याय ' होय. ध्रुवाचे लक्षण सोदाहरण देऊन ३३ व्या अध्यायात गायक - वादक गुणदोषांची चर्चा केली आहे. ३४ वा अध्याय म्हणजे वाद्याध्याय असून त्यांत मृदंगादि अवनद्ध वाद्यांचे विस्तृत विचारण केले आहे. कलकत्ता आवृत्तिमध्ये अध्यायांची संख्या संगीत विषयाच्या दृष्टीने २८ ते ३३ अध्याय अशी ६ होते. गायक, वादक गुणदोष ३२ व्या अध्यायाच्या अखेरीस वर्णिले आहेत.

भरताने गांधर्वाचे लक्षण – ' गांधर्वं त्रिविधं विद्यात् स्वरतालपदात्मकम् ' असे दिले आहे. अर्थात यानुसार गांधर्व हे स्वर, ताल आणि पद ( शब्द ) यांचे समन्वित गानस्वरूप होय. ते तारायुक्त वीणावाद्यांमधून निर्माण झालेले आणि अनेक वाद्यांचा आश्रय असणारे असेही म्हटले आहे – ' यत्तु तन्त्रीकृतं प्रोक्तं नानातोद्य– समाश्रयम् '। ' आतोद्य ' म्हणजे वाद्य. गांधर्वाच्या वरील व्याख्येत स्वर हा प्रधान असून, ताल साम्यासाठी उपकारक असतो. पद म्हणजे शब्द या दोन्हींना आधारभूत होय. नाट्यशास्त्रानंतरच्या दत्तिलांच्या ग्रंथात गांधर्वाची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे –

पदस्थस्वरसङ्घातस्तालेन सुमितस्तथा ।
प्रयुक्तश्चावधानेन गान्धर्वमभिधीयते ॥३॥ ( दत्तिलम् - ३ )

या श्लोकाचा आशय असा – ' शब्दांच्या आश्रयाने केलेल्या स्वरसमूहाची योजना ज्यात तालाने योग्य रीतीने मापली जाते आणि अवधानपूर्वक प्रयुक्त केली जाते ते गांधर्व म्हटले जाते " ' अवधान म्हणजे सुयोग्य अशी बुध्दी इत्यादींची योजना. चित्ताची एकाग्रता ही गानसिध्दीस आवश्यक आहे हे दत्तिलांचे म्हणणे अत्यंत महत्त्वाचे आहे.नारदीय शिक्षेमध्ये गांधर्वाची व्युत्पत्ति अशी दिली आहे –

गेति गेयं विदुः प्राज्ञा धेति कारुप्रवादनम् ॥
वेति वाद्यस्य संज्ञेन गांधर्वस्य विरोचनमिति ॥१२॥ ( नारदीय शिक्षा १.४.१२ )

नारदाने गांधर्व या शब्दाचे जे वरील व्युत्पत्ति निदर्शन केले आहे त्यानुसार ' गा ' म्हणजे गेय, ' ध ' म्हणजे कारुप्रवादन आणि ' व ' म्हणजे वाद्य असा बोध होतो. या श्लोकावरील भट्ट शोभाकराच्या टीकेत ' गा ' शब्दाने गान निदर्शित होते, ' ध ' याने वैणिकाचे प्रवादन आणि ' व ' याने वादन निदर्शित होते असे विवरण मिळते. ' प्रवादन ' या शब्दाने कौशल्यपूर्वक अशी हाताच्या बोटांची योजना त्याने सांगितली आहे. अभिनवगुप्तांनी ' गां ', ' वाचं ' धारयति ही युत्पत्ति गांधर्व या शब्दांची सांगितली आहे. ही वाचा म्हणजे गान-स्वरूपाची वाणी होय. नाट्यशास्त्रात ' गंधर्वांचे ते गांधर्व ' म्हणजेच गंधर्वांच्याकडून प्रयुक्त होणारे ते गांधर्व ही व्युत्पत्ति दिलेली आहे. गांधर्व शब्दातील रेफाने वाद्य किंवा काकुप्रवादन निदर्शित होते असेही एक विवरण मिळते. कारू या ऐवजी या विवरणांत काकु हा शब्द मिळतो. काकु म्हणजे नादाचा परिणामकारक असा बदल.

गांधर्वाचे जे तीन घटक-स्वर, ताल आणि पद यांच्याविषयी भरतमुनिकृत विचारांचा परामर्श काहीशा संक्षेपाने पुढे देत आहे –

स्वरविचारात – स्वर, ग्राम, मूर्च्छना, तान, स्थान, वृत्ती, शुष्क, साधारण, वर्ण, अलंकार, धातु, श्रुती यती आणि जाती यांचा समावेश आहे. हा विषय २८ ते ३० या अध्यायात मिळतो. ३१ व्या अध्यायात तालासंबंधी विशेषतः प्राचीन मद्रक, अपरांतक इत्यादी ७ गीते, त्यांच्या ताल योजनेची माहिती दिली आहे. पद म्हणजे गद्य आणि पद्य अशा दोन प्रकारचे होय; गद्य म्हणजे अनिबद्ध आणि छंदोबद्ध पद्य निबध्द होय. ३२ व्या अध्यायात जे ध्रुवाविधान आले आहे. त्यात शब्दाचे सार्थ स्वरूप महत्त्वाचे आहे. कारण ध्रुवागानात गेय काव्याचा अर्थ हा गेयतेप्रमाणेच महत्त्वाचा असतो. अवनद्ध वाद्ये यांचे ३३ व्या अध्यायात मिळणारे वर्णन नाट्यप्रयोगाच्या सफलतेसाठी आवश्यक होते, कारण नटांच्या हालचाली होत असताना सुयोग्य असे मृदंगवादन केले जात असे.

आता स्वरविषयक सर्व तपशील जाणून घेऊया – स्वर – श्रुति, ग्राम आणि मूर्च्छना – मतंगाने बृहद्देशीत सामवेदापासून स्वर निर्माण झाले असे विधान केले आहे. सामगानातील स्वरसप्तक अवरोही आहे. ते सध्याच्या स्वरसप्तकारच्या परिभाषेप्रमाणे म ग री स नी ध प असे सांगता येते. गांधर्वाचे स्वरसप्तक आरोही होते. म्हणून भरताने षड्ज ऋषभ, गांधार, मध्यम, पञ्चम, धैवत आणि निषाद असे ७ स्वर सांगितले आहेत. श्रुतींच्या योगाने त्यांचे चार प्रकारचे स्वरूप होते. ते म्हणजे वादी, संवादी, अनुवादी आणि विवादी असे होय. ज्या दोन स्वरांच्यामध्ये नऊ आणि तेरा श्रुतींचे अंतर असते ते परस्पर संवादी होत. या संवादी स्वरांच्या जोड्या षड्ज ग्रामाध्ये स - म, स - प, री-ध आणि ग - नी या होत. वादी म्हणजेच अंश स्वर होय. मध्यम ग्रामातही अशा तऱ्हेनेच स्वरसंवाद असतो फक्त स - प या ऐवजी प - री असा संवाद असतो. ज्या दोन स्वरांच्यामध्ये वीस श्रूतींचे अंतर असते ते विवादी होत. उदाहरणार्थ री - ग आणि ध - नी. राहिलेल्या स्वरांच्यामध्ये अनुवाद असतो. ग्राम म्हणजे सात स्वरांचा समूह होय. भरताने मूळ २ ग्राम म्हणजे सप्तके सांगितली आहेत. पुराणांत आणि आर्षकाव्यांत जो गांधारग्रामाचा निर्देश आहे त्याचा भरताने उल्लेखही केलेला नाही. याला दोन कारणे संभवतात. एक म्हणजे नाट्याच्या परिणामकारकतेसाठी तो भरताला अनुकूल वाटला नसावा. दुसरे कारण असे की या ग्रामाची जी

श्रुतिव्यवस्था मध्यकालातल्या संगीतविषयक ग्रंथांत आढळते ती मध्ये संवादतत्त्वाच्या बाबतीत उणीव दिसून येते आणि याच महत्त्वाच्या कारणामुळे हा ग्राम प्रचारातून लुप्त झाला असावा. भरताने दिलेली ग्रामसंकल्पना संवादतत्त्वावर आधारलेली आहे. षड्जग्राम हा षड्जस्वरापासून सुरू होतो तर मध्यमग्राम हा मध्यमापासून सुरू होतो. ही दोन मूलभूत स्वरसप्तके भरताने दिलेल्या गांधर्वशास्त्रात पायाभूत मानली आहेत. भरताच्या संवादकल्पनेतील माहिती होण्यासाठी त्याने सांगितलेल्या श्रुति - स्वर यांच्या संबंधाचे ज्ञान कळून घेणे आवश्यक आहे. यासाठी त्याने श्रुति - निदर्शन हा प्रयोग सांगितला आहे, तो असा - दोन सर्व बाबतीत सारख्या असणाऱ्या वीणा षड्ज - ग्रामात लावायच्या. त्यांतील एक म्हणजे चलवीणा मध्यमग्रामात लावायची म्हणजेच पञ्चमाचा एक श्रुति अपकर्ष करायचा. म्हणजेच री आणि प यामध्ये मध्यम संवाद स्थापित करायचा. दुसऱ्या म्हणजे अचल वीणेतील पञ्चमामध्ये आणि री - प संवाद केल्यामुळे जो पञ्चम मिळतो त्यामध्ये फरक दिसून येतो. हा पञ्चम अचल वीणेतील पञ्चमापेक्षा थोडा उतरलेला आहे. हे कळल्यामुळे हा जो नादातला फरक त्यालाच श्रुति ही संज्ञा भरताने दिली आहे. अशा तऱ्हेने चलवीणेमध्ये पुन्हा एकदा अपकर्ष केल्याने चलवीणेतील गान्धार हा अचलवीणेतील ऋषभाशी मिळून जातो. यावरून ऋषभ आणि गान्धार यामधले अंतर दोन श्रुतींचे होते. पुन्हा असाच अपकर्ष केल्याने चलवीणेतील ऋषभ अचलवीणेतील षड्जाशी एकरूप होतो. यामुळे स आणि री यामधील अंतर तीन श्रुतींचे आढळते. पुन्हा एकदा असाच अपकर्ष केल्यावर चलवीणेतील षड्ज अचलवीणेतील निषादाशी एकरूप होतो. याप्रमाणे जी ग्रामव्यवस्था निर्माण होते ती पुढीलप्रमाणे –

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **षड्जग्राम –** | स | रि | ग | म | प | ध | नि | |
| | ४ | ३ | २ | ४ | ४ | ३ | २ | = २२ श्रुति |
| **मध्यमग्राम** | म | प | ध | नि | स | री | ग | = २२ श्रुति |
| | ४ | ३ | ४ | २ | ४ | ३ | २ | |

या श्रुति निदर्शनावरून प्रत्येक ग्रामातील श्रुतींची संख्या बावीस ही कळते. भरताने संवादासाठी दोन स्वरांच्यामध्ये नऊ आणि तेरा या श्रुतींचे अंतर सांगितले आहे. असे असताही मध्यम आणि निषाद यामध्ये नऊ श्रुतींचे अंतर असल्याने म-नि ही जोडी संवादी म्हणून न देता भरताने अनुवादी म्हणून का दिली हे जाणून घेणे महत्त्वाचे आहे. कारण पुढे मध्यकालातील संगीत शास्त्रात तसेच पुढील काळातील संगीतप्रचारात म - नि संवाद मान्य झालेला आहे. संवादी स्वरांच्या बाबतीत नऊ किंवा तेरा श्रुतींचे अंतर असणे तसेच ते दोन्ही स्वर सम श्रुतिक असणेही आवश्यक आहे असे अनुमान नाट्यशास्त्रात दिलेल्या या संवादीस्वरांच्या जोड्यावरून काढता येते. शिक्षा ग्रंथात (पाणिनिशिक्षा श्लो.१२ नारदीया शिक्षा - १.८.८) चतुःश्रुतिक स्वर हे वैदिक स्वरितापासून, त्रिश्रुतिक स्वर अनुदात्तापासून आणि द्विश्रुतिकस्वर उदात्तापासून उत्पन्न झाले असे सांगितले आहे. हे कारण समश्रुतिकत्वाच्या मुळाशी दिसते. संवादी स्वरांच्यालक्षणात समश्रुतिकत्वही आवश्यक असल्याचे मतंगाने (बृहद्देशी पृ. १४) आणि

अभिनवगुप्तांनी ( नाट्यशास्त्र, बडोदा भाग ४ पृ. १७ ) सांगितले आहे. भरताने दिलेल्या विवादी स्वरांच्या लक्षणावरून गान्धार हा ऋषभाचा आणि निषाद हा धैवताचा विवादी आहे हे मत भरताला अभिप्रेत होते असे म्हणता येते. मतंगाने ( बृहद्देशी पृ. १६ ) विवादी स्वरांचा प्रयोग देऊन हे विशद केले आहे. ऋषभाच्या जागी गान्धार किंवा गान्धाराच्या जागी ऋषभ प्रयुक्त केल्यास जातीच्या रंजक आविष्काराला हानी पोचते असे तो म्हणतो. विवादी स्वर शत्रूसारखा असल्याने त्याचा प्रयोग अल्प असतो असे अभिनवगुप्त म्हणतात. विवादी स्वरांचे स्वरूप पार्श्वदेवाने संगीतसमयसारात ( पृ. ६ श्लो. ९ - १० ) सांगितले आहे ते असे – विवादी स्वर अल्प योजावा किंवा तो प्रच्छादनीय अथवा लोप्य करावा. स्वराला थोडा स्पर्श करणे म्हणजे प्रच्छादन व तो संपूर्णपणे न योजणे म्हणजे लोप होय. मध्ययुगीन संगीतशास्त्रामध्ये रंजकतेसाठी विवादी स्वराचा अल्पप्रयोग मान्य होता असे दिसून येते.

श्रुति हा शब्द श्रु म्हणजे ऐकणे या धातूपासून निष्पन्न झाला आहे. कानाने ऐकू येणारा नाद म्हणजेच श्रुति असे म्हटल्यास ही नादसंख्या खूपच होऊ शकते. असे असता भरताने ही संख्या बावीसच का मानली हे मागे सांगितलेल्या श्रुतिनिदर्शन प्रयोगाद्वारे कळू शकते. श्रुति व स्वर यांमधील फरक अभिनवगुप्ताने पुढलीप्रमाणे सांगितला आहे–" श्रुतींच्या जागी आघात केल्यावर उत्पन्न होणाऱ्या नादाने प्रभावित झालेला अनुरणन स्वरूपाचा स्निग्ध मधुर नाद म्हणजेच स्वर होय " हे विशद करायचे म्हणजे तारेवर श्रुतीच्या स्थानी आघात केल्यावर पहिल्या क्षणी उत्पन्न होणारा अनुरणनरहित नाद म्हणजे श्रुति आणि तोच अनुरणनयुक्त सातत्य असलेला मधुर नाद तो स्वर. शार्ङ्गदेव ही श्रुति आणि स्वर यांतील फरक याप्रमाणेच स्पष्ट करतो. भरताने श्रुतींचे विधान वीणेच्या बाबतीत केले आहे. म्हणून अभिनवगुप्त म्हणतात की श्रुती या वीणेमध्येच उपयुक्त होत. श्रुतिनिदर्शन वीणेच्या द्वारे स्पष्ट होते. वर श्रुति आणि स्वर यांतील फरक सांगताना श्रुतिस्थान हा शब्द आला आहे. त्याचा अर्थ त्या त्या स्वरांतील जी अंतिम श्रुति त्या स्थानी केलेला आघात असा समजला पाहिजे. दोन स्वरांच्या मध्ये जे श्रुत्यंतर भरताने सांगितले आहे त्यानुसार श्रुतिस्वरूपाने निष्पन्न होणारा नाद हा स्वराप्रमाणे संगीतोपयोगी असणे हे भरताला अभिप्रेत होते की नाही यासंबंधी निश्चित विधान करता येत नाही. तसेच श्रुती या जरी स्वरसंबद्ध आहेत तरी स्वरांचे धर्मविशेष श्रुतींच्या बाबतीत दिसून येत नसल्याने श्रुतींचा उपयोग स्वराचे स्वरूप निश्चित होण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे. कारण अनुरणनत्व हे स्वराला माधुर्य आणणारे महत्त्वाचे साधन आहे. मतंगाने श्रुतींच्या संख्येबाबत विविध मते निर्दर्शित केली आहेत. श्रुती या अनंत आहेत असेही एका आचार्यांचे मत त्याने दिले आहे. पण विचार करून बुध्दि परिपुष्ट झालेल्या विद्वानांच्या मताने श्रुतिसंख्या सप्तकांत २२ मानणे हेच योग्य असा त्याचा आशय दिसतो. या बाबतीत अहोबल या पंडिताने म्हटले आहे – " ऐकू येणे यावरून श्रुति या स्वरापेक्षा वेगळया आहेत असे म्हणता येत नाही. ज्या श्रुति त्या त्या रागांचे स्वरूप निर्माण करण्यात कारणीभूत होतात त्यांचे स्वरस्वरूपच होय. ज्यांचा असा उपयोग होत नाही त्यांच्या बाबतीत श्रुति ही संज्ञा मानणे योग्य आहे " यावरून भरतानंतरच्या काळात काही शतकांनी श्रुतींचे संगीतोपयोगी स्वरूप शास्त्रात मान्य केले गेले असे म्हणण्यास आधार मिळतो.

भरताने सात स्वराखेरीज दोन अधिक स्वर मानले आहेत ते म्हणजे– अंतरगांधार आणि काकलीनिषाद हे होत. गांधार आणि निषाद हे दोन्ही द्विश्रुतिकस्वर आहेत. त्यांचे चतुःश्रुतिकस्वर

निष्पन्न झाल्यास त्यांना अंतर ग आणि काकली नि या संज्ञा भरताने दिल्या आहेत. पण त्यांचा उपयोग मर्यादित असून त्यांना अंश स्वरूप प्राप्त होत नव्हते. 'अंतर स्वराचा संयोग हा नेहमी आरोहात व तोही थोड्या प्रमाणात करावा. केव्हाही अवरोहात करू नये. जर त्याचा असा प्रयोग थोड्या किंवा जास्ती प्रमाणात केला तर असा अंतरस्वर जातीचे रंजकत्व आणि श्रुति यांचा नाश करेल. '' या दोन स्वरांचा प्रयोग भरताने दिलेल्या नियमाप्रमाणेच व्हायला पाहिजे असा संकेत पुढील काळात प्रचारात राहिलेला नाही. श्रुतींच्या संबंधामध्ये आणखी एक संज्ञा पुढे मध्यकाळात मान्यता पावलेली दिसते. तिचा विचार करण्यापूर्वी अंतरस्वरांची कल्पना कशी निर्माण झाली असेल हे भरताच्या एका मूर्च्छनेची दोन प्रकारे सिध्दी होते या विधानावरुन जाणता येते. मूर्च्छना म्हणजे क्रमाने सात स्वरांचा आरोह आणि अवरोह होय. मागे सांगितल्याप्रमाणे मध्यमग्राम मध्यमापासून सुरु होतो त्यामुळे त्या ग्रामातील पहिली मूर्च्छना –

| म | प | ध | नि | स | रि | ग | अशी होते. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ३ | ४ | २ | ४ | ३ | २ | |

या मूर्छनेतील धैबत दोन श्रुतींनी उतरल्यावर तिचे स्वरूप पुढीलप्रमाणे होईल.

| म | प | ध | नि | स | रि | ग |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ३ | २ | ४ | ४ | ३ | २ |

मध्यमाला षडज् मानून ही मूर्छना षडज्ग्रामाची केल्यास तिचे स्वरूप असे होईल –

| स | रि | ग | म | प | ध | नि |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ३ | २ | ४ | ४ | ३ | २ |

हीच षडज्ग्रामाची पहिली मूर्छना होय. मध्यमंग्रामातील चतुःश्रुति धैवत गांधार मानून बाकीचे स्वर त्या प्रमाणे स्थापित केल्यास षडजूंग्रामाची जी मूर्छता मिळते तिच्यात गांधार चारश्रुतींचा मिळतो.

| स | रि | ग | म | प | घ | नि |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ३ | ४ | २ | ४ | ३ | २ |

या षडज्ग्रामातील मूर्च्छनेमध्ये गान्धाराने मध्यमाच्या दोन श्रुति घेतल्याने त्याचे स्वरूप गान्धार आणि मध्यम या दोन स्वरांच्यामधले व त्यांना साधारण असणाऱ्या स्वरूपाचे होते. म्हणून हा चतुःश्रुति साधारण गान्धार अंतरगान्धार या संज्ञेने सांगितला आहे. षडज्ग्रामातील गान्धार दोनश्रुतींनी चढवून त्याला

धैवत मानले व त्यानुसार पुढील मध्यम, पञ्चम इत्यादी स्वर यथाक्रम निषाद, षडज् इत्यादी स्थापित केले तर पुढीलप्रमाणे मूर्च्छना मिळते.

दोन श्रुतींनी गान्धार चढवल्यावर –

| स | रि | ग | म | प | ध | नि |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ३ | ४ | २ | ४ | ३ | २ |

गान्धाराला धैवत मानून केलेल्या योजनेप्रमाणे मिळणारे स्वरसप्रक :

| म | प | ध | नि | स | रि | ग |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ३ | ४ | २ | ४ | ३ | २ |

हीच मध्यम ग्रामाची सौवीरी ही पहिली मूर्च्छना होय. अंतरगान्धाराशी पञ्चम संवाद असणारा ४ श्रुतींचा निषाद हा साधारण स्वर. यालाच भरताने काकली ही संज्ञा दिली आहे. अंतर ग व काकली नि यांना स्वतंत्रपणे स्वरत्व नव्हते.

भरताची ग्राम-संकल्पना स्वरसंवादावर आधारित आहे. षड्जग्रामात षड्ज-पञ्चम संवादाच्या तीन जोड्या आहेत, तर षड्ज-मध्यम संवादाची एक जोडी आहे. मध्यमग्रामात नऊ श्रुत्यंतरे असणाऱ्या दोन जोड्या आणि तेरा श्रुत्यंतरे असणारी एक जोडी आहे. यावरून षड्ज-ग्रामात षड्ज-पञ्चम संवादाचे आणि मध्यमग्रामात षड्ज-मध्यम संवादाचे आधिक्य दिसून येते.

श्रुतींची नावे मध्यकालामधील ग्रंथांत आढळतात, भरताने ती दिलेली नाहीत. भरताचा श्रुतिविचार मुख्यतः संवादसिद्धी आणि स्वरस्वरूप निश्चिती यासाठी होता. श्रुतींच्या जातींची कल्पना मध्यकाळात सांगितली गेली. या पाच जाती म्हणजे दीप्ता, आयता, मृदु, मध्या आणि करुणा अशा आहेत. नारदाने आपल्या शिक्षेत दीप्ता, आयता इत्यादी संज्ञा स्वरांच्या आविष्कारांच्या बाबतीत सांगितल्या आहेत. ( नारदीय शिक्षा-१.७.१० ते १२ ) दीप्ता ही श्रुति मन्द्र, द्वितीय, चतुर्थ, अतिस्वार आणि तृतीय या स्वरांच्या बाबतीत आणि करुणा ही क्रुष्ट स्वराच्या बाबतीत सांगितली आहे. क्रुष्ट, प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, पञ्चम किंवा मन्द्र आणि षष्ठ किंवा अतिस्वार या संज्ञा सामगानाच्या संदर्भातल्या आहेत. म्हणजे दीप्ता आणि करुणा या दोनच श्रुती स्वरांच्या संदर्भात आढळून येतात. भट्ट शोभाकर या नारदीय शिक्षेच्या टीकाकाराने प्रथम स्वराच्या बाबतीत मृदु ही श्रुति दिली आहे. नारदाने द्वितीय स्वराच्या बाबतीत, म्हणजे गांधाराच्या बाबतीत मृदु, मध्या आणि आयता या आणखी तीन श्रुती सांगितल्या आहेत. खालचा म्हणजे तृतीय स्वर ( रि ) पुढे आला असता द्वितीय स्वराची आयता ही श्रुति होय. विपर्यय म्हणजे या उलट योजना असताना द्वितीय स्वराची मृदु ही श्रुति होय आणि द्वितीय स्वर पुढे आला असता मध्यमा - श्रुति होय, अर्थात हे श्रुति विवेचन सामगानाच्या बाबतीतले आहे. विपर्यय या शब्दाचा चतुर्थ स्वर असा जो अर्थ भट्ट शोभाकराने दिला आहे तो अभिनवगुप्तांना

मान्य नाही. अभिनवगुप्त म्हणतात (ना. शा. २९ श्लोक ३७ पृ. ८९) की विपर्यय म्हणजे मध्यम स्वर होय. अर्थात् मध्यमस्वर पुढे आला असता गान्धाराची मृदु ही श्रुति होय. हा श्लोक अलंकार वर्णनामध्ये आला असल्याने तो भरताच्या संगीत विचाराच्या दृष्टीने अभिनवगुप्तांनी विशद केलेला दिसतो. या ज्या श्रुतीच्या पाच संज्ञा मिळतात त्या पुढे मध्यकालामध्ये श्रुतींच्या जाती म्हणून दिल्या आहेत. प्रत्येक श्रुतीची जाति दिली गेली आहे. शार्ङ्गदेवाने या श्रुतिजातींची स्वरसंबद्ध योजनाही दिली आहे.

| श्रुतिनाम | | जाति | श्रुतिनाम | | जाति |
|---|---|---|---|---|---|
| १. तीव्रा | ... | दीप्ता | १२. प्रीती | ... | मृदु |
| २. कुमुद्वती | ... | आयता | १३. मार्जनी | ... | मध्या |
| ३. मंदा | ... | मृदु | १४. क्षिति | ... | मृदु |
| ४. छन्दोवती | ... | मध्या | १५. रक्ता | ... | मध्या |
| ५. दयावती | ... | करुणा | १६. संदीपनी | ... | आयता |
| ६. रजनी | ... | मध्या | १७. आलापिनी | ... | करुणा |
| ७. रतिका | ... | मृदु | १८. मदन्ती | ... | करुणा |
| ८. रौद्री | ... | दीप्ता | १९. रोहिणी | ... | आयता |
| ९. क्रोधा | ... | आयता | २०. रम्या | ... | मध्या |
| १०. वज्रिका | ... | दीप्ता | २१. उग्रा | ... | दीप्ता |
| ११. प्रसारिणी | ... | आयता | २२. क्षोभिणी | ... | मध्या |

या श्रुतींची स्वरसंबद्ध योजना अशी – १ ते ४ या षड्जाच्या, ५ ते ७ या ऋषभाच्या, ८ व ९ या गान्धाराच्या, १० ते१३ या मध्यमाच्या, १४ ते १७ या पञ्चमाच्या, १८ ते २० या धैवताच्या आणि २१ आणि २२ या निषदाच्या श्रुती होत. यावरून असे म्हणता येते की मध्यकाळात श्रुतींच्या स्वरूपाविषयी अधिक विचार होऊन प्रत्येक श्रुतीचा आविष्कार जाणून घेऊन त्या दृष्टीने श्रुतींची नावे ही सांगितली गेली. हा रागगायनातील श्रुति स्वर संकल्पनेचा मध्योत्तर काळ आणि आधुनिक काळ यामधील दुवा होय.

अभिनवगुप्तांनी म्हटले आहे. कांहीच्या मताने श्रुतिक्रमाने जर स्वर हे आविष्कृत होत असतात तर श्रुतींचेच विवेचन प्रथम व्हायला हवे. त्याला उत्तर असे की जर ध्वनि-नाद रूपाने असलेल्या श्रुति निश्चित अशा श्रुत्यंतराने निर्माण होणारे स्वर असे असते तर हा आक्षेप योग्य ठरला असता. पण असे नसते कारण उच्च आणि नीच अशा स्वरूपाच्या श्रुती या स्वरांच्या आश्रयानेच जाणल्या जातात.

भरताने दोन्ही ग्रामांतील मिळून चौदा मूर्च्छना नामनिर्देशासह सांगितल्या आहेत. मूर्च्छ् म्हणजे व्यापणे, मूर्च्छना साती स्वरांनी व्यापला जातात. मूर्च्छनेची व्याख्या सप्तकातील क्रमयुक्त सात स्वर. एवढीच भरताने दिलेली आहे. या व्याख्यातील क्रम अभिनवगुप्तांनी स्पष्ट केला आहे तो असा – क्रमाने सात स्वरांचा आरोह तसाच त्यांचा अवरोह.

षड्ज - ग्रामाच्या मूर्च्छना अशा – उत्तरमन्द्रा षड्जापासून सुरू होणारी रजनी निषादापासून, उत्तरायता धैवतापासून, शुद्धषड्जा पञ्चमापासून मत्सरीकृता मध्यमापासून अश्वक्रान्ता गांधारापासून आणि अभिरुद्‌गता ऋषभापासून यांचे आरंभीचे स्वर स, नि, ध, प, म, ग, आणि रि असे क्रमाने दिलेले आहेत. यावरून एक गोष्ट ध्यानात येते की मध्य षड्जापासून सुरू होणारी जी पहिली मूर्च्छना तिच्यापासून बाकीच्या सहा मूर्च्छना क्रमाने मन्द्र स्वरांनी सुरू होणाऱ्या आहेत. मध्यमग्रामाच्या मूर्च्छना – मध्यमापासून सुरू होणारी सौवीरी, गान्धारापासून सुरू होणारी हारिणाश्वा, ऋषभापासून सुरू होणारी कलोपनता, षड्जापासून सुरू होणारी शुद्धमध्या, निषादापासून सुरू होणारी मार्गी, धैवतापासून सुरू होणारी पौरवी आणि पञ्चमापासून सुरू होणारी हृष्यका. या मूर्च्छनांचेही आरंभिक स्वर म, ग, रि, स, नि, ध आणि प असे अवरोह क्रमाने आहेत. या मूर्च्छना, सर्व स्वरांची योजना क्रमाने केली असता होणाऱ्या त्या संपूर्ण, षाडव आणि औडुव स्वरूप असणाऱ्या, तसेच साधारण स्वरांच्यामुळे होणाऱ्या अशा चार प्रकारच्या आहेत. षाडव या स्वरूपात त्या त्या ग्रामातील कोणते विशिष्ट स्वर गाळायचे तेही भरताने स्पष्ट केले आहे. षड्जग्रामात स, रि, नि आणि प यातील एकेक स्वर गाळून षाडवमूर्च्छना होतात. मध्यमग्रामात स, रि, आणि ग यापैकी एकेक स्वर गाळून तीन षाडवमूर्च्छना होतात. अशारीतीने हे षाडवस्वरूप सर्व मूर्च्छनांच्यामध्ये केले असता एकोणपन्नास प्रकार होतात. पाच स्वरांचे स्वरूप असणाऱ्या औडुव प्रकारांचे वर्णन असे - षड्जग्रामामध्ये स आणि प गाळून, रि आणि प गाळून, आणि नि व ग गाळून असे तीन औडुव प्रकार होतात. मध्यमग्रामात गान्धार आणि निषाद रहित आणि ऋषभ आणि धैवत रहित असे दोन प्रकार होतात. अशा तऱ्हेने हे औडुव प्रकार सर्व मूर्च्छनांच्या मध्ये योजल्याने पस्तीस प्रकार होतात. या षाडव आणि औडुव प्रकारांना भरताने तान हा शब्द योजला आहे. अर्थात हे तान मूर्च्छनांच्यावर आधारलेले आहेत. त्यांची एकूण संख्या वर सांगितलेल्याप्रमाणे चौऱ्याऐंशी होते. ती तानांची योजना वीणेवर दोन प्रकाराने करता येते. ते प्रकार म्हणजे प्रवेश आणि निग्रह हे होत. प्रवेश म्हणजे तारेवर खालचा स्वर चढविणे किंवा वरचा स्वर उतरणे, निग्रह म्हणजे जो स्वर वगळायचा तो निर्माण करणाऱ्या तारेला स्पर्श न करणे. भरतांनी मध्यम स्वरानेच मूर्च्छना निर्देश करावा असे म्हटले आहे. कारण मध्यम हा नाश न होणारा ( म्हणजेच सतत असणारा ) असा आहे. निग्रह म्हणजे स्पर्श न करणे आणि पर्यग्रह म्हणजे पुन्हा घेणे. भरताने मूर्च्छना आणि तान यांचे उद्दिष्ट स्थानप्राप्ति हे दिले आहे आणि विविध मूर्च्छना यांचे प्रयोजन प्रयोक्ता आणि श्रोता यांचा आनंद हे दिले आहे. अभिनवगुप्तानी ' मध्यमस्वरानेच ' याचे स्पष्टीकरण समूह वाचक एकवचन ( जातौ एकवचनम् ) या न्यायाने मध्य स्थानातील स्वरांनी असे दिले आहे. कारण मध्यम स्वरसप्तक हे नित्य स्वरूपाने असते. कारण ते आधारभूत असते. दत्तिलाने मध्यम ग्रामांत पञ्चमस्वर आणि षड्जग्रामात धैवतस्वर हे नाश न होणारे असे जाणावे तसेच मध्यम मात्र सर्वत्रच

नाश न पावणारा जाणावा असे म्हटले आहे (द. १.२०). दत्तिलाच्या या विधानाचे कारण असे दिसते की मध्यमग्रामाची सिद्धि पञ्चमाच्या त्रिश्रुति स्वरूपाशिवाय होऊ शकत नाही आणि षड्जग्रामामध्ये धैवत हा अनिवार्य ठरतो. हे दोन्ही ग्रामभेदासाठी आवश्यक असल्याने दत्तिलाचे हे विधान काही आचार्यांना मान्य नाही. त्यांच्या म्हणण्यानुसार मध्यम हाच फक्त अविनाशी होय. त्याचा लोप करायचा नसतो. येथे अभिनवगुप्तांनी एक शंका उपस्थित केली आहे. सप्तकातील स्वरांची सांक्षिप्त नावे स, रि, ग इत्यादी प्रचारात योजिली जातात. रि हे व्यञ्जन आहे मग ते स्वराचे अनुकरण कसे करेल? स इत्यादींच्या बाबतीतही असेच म्हणता येते. रि हे ऋषभ शब्दाचा आरंभ नाही. तसेच स षड्ज शब्दातील प्रथम अक्षर नाही. त्याला उत्तर असे की स रि ग म इत्यादी स्वरांच्या संज्ञा केवळ सांकेतिक आहेत. प्रचारामध्ये षड्ज इत्यादींचे संक्षिप्त स्वरूप म्हणून या संज्ञा योजिल्या जातात. त्यामुळे रि हे व्यंजन किंवा ऋ हा स्वर या दोन्हींची ऋषभ स्वराची सांकेतिक योजना निर्दोष होय.

भारतीय संगीत हे अतिप्रचीन काळापासून स्वरानुगतिक ( म्हणजे melodic) आहे. सामगानापासून ही संगीत परंपरा प्रचलित आहे. गान्धर्वातील स्वरानुगतिक गीत प्रकारांना जाति हा शब्द भरताने वापरलेला आहे. जाति या शब्दाचा अर्थ नंतरच्या संगीत शास्त्रकारांनी जन् म्हणजे जन्मणे, उत्पन्न होणे यापासून निष्पन्न झालेला जाति हा शब्द नंतरच्या राग इत्यादींची जननी म्हणून विशद केला आहे. भरताने षड्जग्राम व मध्यमग्राम मिळून एकूण अठरा जाती दिल्या आहेत. त्यातील सात या शुध्द स्वरूपाच्या व बाकीच्या अकरा संसर्गज विकृत म्हणून दिल्या आहेत. जातीचे लक्षण भरताने दहा घटकांनी सांगितले आहे. ती लक्षणे पुढीलप्रमाणे–

(१) ग्रह – जातीच्या आरंभीचा स्वर, (२) अंश–जातीमध्ये वारंवार येणारा असा त्या जातीचा आविष्कार करणारा मुख्य स्वर, (३) जातीमधील तारस्वर घेण्याची मर्यादा, (४) जातीतील मन्द्र स्वराची मर्यादा (५) न्यास - जातीच्या समाप्तीचा स्वर, (६) अपन्यास - जातीच्या विदारीमध्ये ( गीत खण्डामध्ये ) शेवटी येणारा स्वर, (७) अल्पत्व - अल्प प्रमाणात योजलेला स्वर, (८) बहुत्व–विपुलपणे योजलेला स्वर, (९) षाडव, (१०) औडुवित. अभिनवगुप्तांनी या दहा घटकांपैकी अष्टक हे सर्वत्र असतेच, शेवटचे दोन घटक म्हणजे षाडव आणि औडुवित हे प्रकार सर्व जातीत असतातच असे नाही असे स्पष्ट केले आहे. अंशापासून तारस्वर घेण्याची मर्यादा चौथ्या किंवा पाचव्या स्वरापर्यंत भरताने सांगितली असून त्यापेक्षाही वरचा स्वर घेणे हे इष्ट नाही असे म्हटले आहे. मन्द्रस्वराच्या मर्यादे बाबतीत असे सांगितले आहे की अंश स्वर, न्यास स्वर किंवा अपन्यास स्वर. जेव्हा गान्धार हा स्वर न्यास असतो तेव्हा त्या खालचा जो ऋषभ त्याचीही योजना केलेली आढळते. अल्पत्वाचे दोन प्रकार म्हणजे जो स्वर नको आहे तो गाळणे किंवा त्याची पुनरावृत्ती न करणे. या शिवाय आणखी जे तीन घटक जातीच्या लक्षणाबाबत नंतरच्या शास्त्रकारांनी दिले आहेत आणि ज्यांचा समावेश बडोदा आवृत्तीत केलेला आहे ते म्हणजे संन्यास, विन्यास आणि अंतर-मार्ग हे होत. विन्यास आणि संन्यास या संज्ञा बडोदा आवृत्तीत अंशाच्या लक्षणामध्ये समाविष्ट केलेल्या आहेत. संन्यास म्हणजे पहिल्या विदारीमध्ये शेवटी न्यास स्वर विवादित्व गाळून योजणे व पदाच्या शेवटी तो योजल्यास विन्यास होय. अंतरमार्गाचे लक्षण अल्पत्वाच्या आणि बहुत्वाच्या संदर्भात

नाट्यशास्त्रात मिळते. अंश नसणाऱ्या स्वरांची गीतात पुष्कळ प्रमाणात योजना करणे याला अंतरमार्ग म्हटले आहे. उदाहरणार्थ कार्मारवी जातीत गान्धार स्वराची संगति सर्व स्वराबरोबर योजल्याने त्याचा प्रयोग अंतरमार्गात सांगितला आहे. ज्या जातीत अनेक स्वर अंश असतात. त्यातील एक स्वर अंश म्हणून योजल्याने बाकीचे अंश पर्यायाने अंश होतात, त्यांच्या आधाराने न्यास आणि अंतरमार्ग जातीचे स्वरूप अभिव्यक्त करतात. अभिनवगुप्तांनी अंतरमार्गाच्या बाबतीत दुसरे मत दिले आहे की अंतरमार्ग सर्वत्र मुख्य असल्याने अल्पत्व आणि बहुत्व याशिवाय त्याचे स्वरूपच उपलब्ध होत नाही आणि म्हणून तो जातीची अभिव्यक्ति करणारा आहे. अनुवादी स्वर आणि अंशस्वर मुख्य असता बलवान संवादी स्वरांचे बहुत्व होते. अल्पत्वामुळे दुर्बल असणाऱ्या जातीत, अल्पत्व असणाऱ्या स्वरांना ओलांडून, बलवान स्वरावर न्यास केला जातो. ही क्रिया म्हणजे अंतरमार्ग होय. दुसरे काही आचार्य न्यास आणि अंतरमार्ग यांच्या योगाने पर्यायी अंशाचे बहुत्व योजावे असे म्हणतात. मतंगाने असे म्हटले आहे की जातीत कधी कधी अंश नसणाऱ्या स्वराचे अल्पत्व न योजता बहुत्व योजले जाते तेव्हा तो अंतरमार्ग होय ( बृह पृ. ५९, ६० ). हा अंतरमार्ग बहुशः विकृत जातीत योजायचा असतो. शुध्द जातीत त्याचा प्रयोग क्वचित केला जातो.

अठरा जातींपैकी सात या शुद्ध आणि अकरा संसर्गज विकृत होत. शुद्ध जाति या सातही स्वर घेणाऱ्या आणि स्वतःचे नाव निर्दिष्ट करणारा स्वर हा अंश, ग्रह, न्यास आणि अपन्यास असणाऱ्या अशा असतात. न्यास कायम ठेऊन बाकीचे जे घटक म्हणजे संपूर्ण स्वरूप, ग्रह, अंश आणि अपन्यास यांच्यात बदल केल्यामुळे शुद्ध जातीचे विकृत स्वरूप उत्पन्न होते. शुद्ध जातीत न्यास स्वर नियमाने मन्द्र सप्तकातला असे. दोन किंवा अधिक जातींच्या मिश्रणाने होणाऱ्या अकरा संसर्गज विकृत जाती होत. शुद्ध जातीमध्ये षाड्जी, आर्षभी, धैवती आणि निषादिनी या चार षड्जग्रामातील असून, गान्धारी, मध्यमा आणि पञ्चमी या तीन मध्यमग्रामातील होत. संसर्गज विकृत जातीतील षड्जोदीच्यवती, षड्जकैशिकी आणि षड्जमध्या या षड्जग्रामातल्या असून गान्धारोदीच्यवा, रक्तगान्धारी, गान्धारपञ्चमी, मध्यमोदीच्यवा, नंदयन्ती, कार्मारवी, आन्ध्री आणि कैशिकी या मध्यमाग्रतल्या होत. जातींचा स्वर आणि ताल योजना, जातींचे रस आणि त्यांचा विनियोग मतंगाने दिला आहे. पुढे नान्यदेवाने जातींची गीते आणि त्या त्या शुद्ध जातींचे होणारे विकृत प्रकार सांगितले आहेत. शार्ङ्गदेवाने जातींच्या प्रस्तारात गीतातील अक्षरांची कलानुसार योजना दिली आहे. ( या अठरा जातींचे भरताने सांगितलेल्या लक्षणानुसार स्वरूप माहीत होण्यासाठी शेवटी १ या परिशिष्टांत तक्ता दिला आहे ). मतंगाने जातींच्या मूर्च्छना दिल्या आहेत. शुद्ध जातीचे विकृत स्वरूप सांगताना न्यास स्वर सोडून बाकीच्या चार लक्षणात म्हणजे पूर्णत्व, ग्रह, अंश आणि अपन्यास यांच्या बाबतीत बदल करायचा असे. न्यास स्वर जाति-गायनांत परिवर्तनीय नव्हता. शुध्द जातींच्या न्यास योजनेत मन्द्र स्वरावर न्यास नियमाने सांगितला आहे. शुद्ध जातीचा न्यास मन्द्र असला पाहिजे या भरताने सांगितलेल्या नियमाऐवजी शार्ङ्गदेवाने तार न्यास नसावा असा नियम दिला आहे. संगीतरत्नाकराचा टीकाकार कल्लिनाथ याने स्पष्टीकरण देताना म्हटले आहे. '' शुद्ध जातीत मन्द्र न्यास असावा हे भरताचे म्हणणे तारस्थानात न्यास नसावा अशा अर्थाने समजून घेतले नाही तर षाड्जी जातीत मध्य, षड्ज हा न्यास असतो असे जे मतंगाने म्हटले आहे त्याच्याशी विरोध उत्पन्न होईल.''

जातींचे लक्षण विशद केल्यावर २९ व्या अध्यायात त्यांचा विनियोग कोणकोणत्या रसामध्ये आणि कसा करायचा हे आरंभी सांगितलेले आहे. ध्रुवांची योजना करताना त्यांच्या गानामध्ये प्रयत्नपूर्वक जाती सांगितल्या आहेत. त्याचे थोडक्यात विधान दिले आहे ते असे – ज्या गानामध्ये मध्यम आणि पञ्चम स्वरांचे बहुत्व असते ते श्रृंगार आणि हास्य या रसांमध्ये वापरावे. षड्ज आणि ऋषभ यांचे बहुत्व असणारे गान वीर, रौद्र आणि अद्भुत या रसांचा आविष्कार करण्यास उपयुक्त ठरते. गान्धार आणि निषाद यांचे बहुत्व असणारे गान करूण रसामध्ये इष्ट होय. तसेच धैवत बहुत्व असणारे गान बीभत्स आणि भयानक या रसात सांगितले आहे. अर्थात् हे स्वर अंश असणाऱ्या जाति - गायनाचा वापर यात अपेक्षित आहे. जाति गायनात अंश स्वर त्या गायनाचा आविष्कार निर्माण करतो व हा आविष्कार नाट्यातल्या त्या त्या प्रसंगी गायल्या जाणाऱ्या ध्रुवा गानातून त्या त्या भावाची पुष्टि करतो. भरत म्हणतात – जो स्वर जातीच्या स्वरूपात बलवान असतो त्यापासून प्रवृत्त होणारे गान त्या त्या रसामध्ये योजावे. यावरून जाती - गायन आणि नाट्यातील रस यांचा संबंध हा ध्रुवा गानाच्या दृष्टीने सांगितला गेला असे ध्यानात येते.

यानंतर आरोही, अवरोही, स्थायी आणि संचारी हे चार वर्ण आणि त्यांच्या आश्रयाने योजले जायचे अलंकार हे सांगितले गेले आहेत. ज्यात स्वरांचा आरोही क्रम असतो तो आरोही, ज्यात अवरोही क्रम असतो तो अवरोही, ज्यात स्वर स्थिर आणि सम असतात तो स्थायी आणि ज्यात स्वरांचे मिश्र असे संचार स्वरूप असते तो संचारी. भरताने स्थायी वर्णामध्ये ७, आरोही वर्णात १३, अवरोही वर्णात ५ आणि संचारी वर्णात १४ अलंकार सांगितले आहेत. ध्रुवा या अर्थाला अनुसरून गायच्या असल्याने वर्णांचा आश्रयही उचित असाच असे. तसेच अलंकारही अर्थ प्रकट होण्यामध्ये बाधा ठरू नये असेच योजावयाचे असत. भरत म्हणतात जसे चंद्राशिवाय रात्र, पाण्याशिवाय नदी, फुलाशिवाय वेली आणि अलंकाराशिवाय स्त्री शोभून दिसत नाही त्याचप्रमाणे अलंकाराशिवाय गीति होय. जातींच्या स्वरयोजनेवर आधारलेल्या चार गीती म्हणजे मागधी, अर्धमागधी, संभाविता, आणि पृथुला या होत. मागधीमध्ये शब्दांची ३ वेळा आवृत्ति असते. जेव्हा पदाचा अर्धा भाग आवृत्त होतो ती अर्धमागधी, ज्यात दीर्घ अक्षरे पुष्कळ असतात ती संभाविता आणि जिच्यात ऱ्हस्व अक्षरे पुष्कळ असतात ती पृथुला. यांची उदारहणे नंतरच्या संगीतशास्त्रात मिळतात ती अशी – उदा. संगीतरत्नाकर ( १.८ )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **मागधी –** | मा | गा | मा | धा |
| | दे | ० | वं | ० |
| | धनि | धनि | सनि | धा |
| | दे. | वं. | रु. | द्रं |
| | रिग | रिग | मग | रिस |
| | देवं | रुद्रं | वं. | दे. |

यात ‘ देवं ’ शब्द तीन वेळा आवृत्त झाला आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अर्धमागधी – | मा | री | गा | सा |
| | दे | ० | वं | ० |
| | सा | सा | धा | नी |
| | वं | रु | द्रं | ० |
| | पा | धा | पा | मा |
| | द्रं | वं | दे | ० |

हिच्यात पदांचा अर्धा भाग दोन वेळा आवृत्त झाला आहे. वं आणि द्रं.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| संभाविता – | धा | मा | मा | रिग |
| | भ | ० | क्त्या | ०० |
| | री | गा | सा | सा |
| | दे | ० | वं | ० |
| | नी | धा | सा | नी |
| | रु | ० | द्रं | ० |
| | धा | नी | मा | मा |
| | वं | ० | दे | ० |
| पृथुला – | मा | गा | री | गा |
| | सु | र | न | त |
| | सा | धनि | धा | धा |
| | ह | र० | प | द |
| | धा | सा | धा | नी |
| | यु | ग | लं | ० |
| | पा | निधप | मा | मा |
| | प्र | ण ०० | म | त. |

या गीतींचे तालस्वरूपही नंतरच्या संगीतशास्त्रात मिळते.

वीणावादनाचे स्वरूप वर्णिताना धातूंचे लक्षण सांगितले गेले आहे. वीणेच्या तारांवर आघात करून स्वर उत्पन्न केले जात, त्याला धातु असे नाव आहे. हे धातु चार प्रकारचे आहेत – विस्तार, करण, आविद्ध आणि व्यंजन. भरताचे वेळी दोन वीणा प्रचारात होत्या. या वीणांचा आकार धनुष्याकृति असून एका

वीणेत म्हणजे चित्रा या वीणेत ७ तारा असत आणि दुसऱ्या विपंची या वीणेत ९ तारा असत. अर्थात् या २ अधिक तारा अंतर ग आणि काकली नि या दोन साधारण स्वरासाठी असत. वीणेच्या नादामध्ये विशिष्ट स्वरूप निर्माण करण्यासाठी या धातूंची योजना करायची असते. विस्तार धातूचे चार प्रकार असत ते म्हणजे संघातज, समवायज, विस्तारज व अनुबंधकृत. विस्तार धातूचे सामान्य स्वरूप म्हणजे नादाचे विस्तीर्णत्व हे होय. संघातज याचे चार भेद होते. त्यामध्ये पहिल्या प्रकारात मन्द्र स्वराची दोन वेळा आवृत्ति होते. तारस्थानात दोनदा आघात केल्याने दुसरा भेद होतो. तिसऱ्यात प्रारंभी तार व शेवट मन्द्र स्वर उत्पन्न होतो आणि चवथ्या प्रकारांत प्रथम मन्द्र आणि नंतर तार स्वर आघाताने उत्पन्न करावयाचा असतो. समवायज याचे आठ भेद होते– (१) मन्द्र स्वरावर तीन वेळा आघात करणे (२) तारस्वरावर तीन वेळा आघात करणे (३) दोन वेळा मन्द्र व शेवटी तार स्वर असणे (४) तारस्थानात दोनदा प्रहार करून शेवटी मन्द्र स्वर योजणे (५) आरंभी मन्द्र आणि शेवटी दोनदा तारस्वर योजणे (६) एक वेळ तार आणि दोन वेळा मन्द्र स्वर योजणे (७) मन्द्र स्वर असणारे दोन तार स्वर म्हणजे प्रथम तार, मध्ये मन्द्र व शेवटी तार असे स्वर योजणे आणि (८) प्रथम मन्द्र मध्ये तार व शेवटी मन्द्र असे स्वर योजणे. सजातीय आणि विजातीय भेदांच्या मिश्रणाने निर्माण होणारा धातु अनुबंध होय. लघु आणि गुरू या स्वरूपाच्या प्रहारांनी करण आणि आविद्ध हे धातु निष्पन्न होतात. करण या धातूत थोडे गुरू असतात. या धातूचे ५ भेद आहेत – (१) दोन लघू व शेवटी गुरु (२) चार लघू आणि शेवटी गुरु (३) सहा लघू आणि शेवटी गुरु (४) आठ लघू व शेवटी गुरु (५) विस्ताराप्रमाणेच अनुबंध असतो. आविद्ध धातूमध्ये गुरू पुष्कळ असतात किंवा गुरू नसतातही. याचे पांच भेद असे – (१) लघु व गुरु (२) दोन लघू आणि गुरु (३) २ लघू व २ गुरू (४) चार लघू व चार गुरू आणि नंतर लघु (५) अनुबंध हा पूर्वीप्रमाणेच होय. व्यंजन हा धातु बोटाच्या वेगवेगळया योजनेमुळे निर्माण होतो. त्याचेही १० भेद आहेत. – (१) दोन्ही आंगठे व करंगळी यांनी एका तारेवर एकाच वेळी प्रहार करणे (२) वेगवेगळया स्थानातील एकच स्वर निर्माण करणाऱ्या दोन तारांवर एकाच वेळी दोन्ही अंगठयांनी प्रहार करणे (३) डाव्या अंगठ्याने दाबलेल्या तारेवर उजव्या अंगठ्याने प्रहार करणे (४) तारेवर एका जागी दीर्घ नाद उत्पन्न करणे (५) सर्व बोटांनी क्रमाने एकच स्वर निर्माण करणे (६) तिसरा भेद योजून अवरोहाने प्रहार करणे (७) डाव्या अंगठ्याने तारेवर वर आणि खाली प्रहार करणे (८) तर्जनीने प्रहार करून अत्यंत गोड नाद निर्माण करणे (९) उजवी करंगळी व दोन अंगठे यांनी तीन तारांवर तिन्ही स्थानांतील एकच स्वर निर्माण करणारा वेगवेगळा प्रहार करणे (१०) अनुबंध वरील प्रमाणेच होय.

वाद्य वादनामध्ये तीन वृत्ती सांगितलेल्या आहेत– त्या म्हणजे चित्रा, वृत्ती व दक्षिणा. चित्रावृत्तीमध्ये वादन मुख्य असून गीत गौण असते. याच्या उलट दक्षिणावृत्तीमध्ये गीत मुख्य असून वाद्य गौण असते. वृत्तीमध्ये गीत आणि वादन यांचे साम्य असते. वीणेपासून निर्माण होणारे वादन गीतामध्ये तीन प्रकारचे असते. तत्त्व या प्रकारात वीणावादन संपूर्णपणे गीताला अनुसरते. अनुगत यात वीणावादन गीताला अनुसरते आणि ओघ या प्रकारात गीताच्या अर्थाकडे लक्ष न देता द्रुत लयीमध्ये जोरदारपणे द्रुत लयीत वादन केले जाते. याच अध्यायात शेवटच्या भागामध्ये पूर्वरंगात योजल्या जाणाऱ्या बहिर्गीतांचे वादन

विशद केले आहे. ती गीते म्हणजे आश्रावणा, आरंभ, वक्त्रपाणि, सङ्खोटना, परिघट्टना, मार्गासारित, लीलाकृत आणि तीन प्रकारची आसारिते ही होत. या वादनात अक्षरांचे लघू , गुरू स्वरूप तसेच झण्टुं झण्टुं इत्यादी योजली जाणारी अर्थरहित अक्षरे दिली आहेत. तसेच वादनाचे तालही सांगितले आहेत. शेवटी वीणावादनाची सहा करणे सांगितली आहेत. मुख्य वीणेमध्ये गुरू स्वर वाजत असता दोन लघू दुसऱ्या वीणेत वाजवणे हेच पुन्हा केले जाते. एकाच वेळी गुरु लघू वाजविल्याने म्हणजे जेव्हा एका वीणेत दोन लघू वाजविले जातात त्याचवेळी गुरू स्वर वाजविला जातो. किंवा जेव्हा वीणेमध्ये दोन गुरू वाजविले जातात तेव्हा दुसऱ्या वीणेत प्लुत आणि लघू स्वर वाजविले जातात. विपंची वीणावादक अंशाला संवादी असणाऱ्या तारेवर अल्पत्व इत्यादी योजतो; वीणावादक जेव्हा गीतखंडाच्यामुळे थांबतो त्यावेळी विपंचीवादक वादन चालू ठेवतो आणि अत्यंत द्रुत लयीत विपंची वादन केले जाते. तेव्हा तो ओघ होय वीणावादन ध्रुवांच्या संदर्भात कोणाने केले जात असे. काहींच्या मते चित्रा ही वीणा बोटाने वाजवयाची असून विपंची ही कोणाने आणि बोटाने वाजवायची असे. या वादन प्रकाराला करण हा शब्द असून ही करणे विपंची वीणेशी संबद्ध असल्याचे भरताने म्हटले आहे. भरताने योजलेल्या वैणिक म्हणजे वीणावादक या शब्दामधून .निर्दिष्ट होणारी वीणा चित्रा ही होय. अभिनवगुप्तांनी मात्र मुख्य वीणा एकवीस तारा असणारी म्हटली आहे.

एकतिसाव्या अध्यायात त्या वेळच्या प्रचलित तालांची माहिती मिळते. तालामुळे गीत पूर्णपणे प्रस्थापित होते. काल मोजण्याचे साधन म्हणजे मात्रा हे होय. या मात्रेचे प्रमाण पाच निमिष ( डोळयाची उघडझाप होण्याचा काळ ) हे सांगितले आहे. अर्थात् हे पाच निमिष म्हणजे पाच लघू - अक्षरांचे प्रमाण. मात्रांच्या योगाने कला सिध्द होते. ही कला तीन प्रकारची असून ती तीन मार्गांमध्ये निश्चित केलेली आहे. चित्रमार्गात ती दोन मात्रांची, वृत्तीमार्गात चार मात्रांची आणि दक्षिण मार्गात आठ मात्रांची असते. लयीशिवाय कलेचे स्वरूप निष्पन्न होत नाही. लय म्हणजे विलीन होणे या अर्थाने दोन मात्रांच्या मधील काल होय. लयीचे विलंबित, मध्य आणि द्रुत असे तीन प्रकार आहेत. ताल मूलतः त्र्यश्र आणि चतुरश्र या दोन प्रकारचा योजला जात असे. त्यांची.नावे यथाक्षर स्वरूपात ( म्हणजे अक्षरांच्या उच्चारणात योजल्या जाणाऱ्या मात्रांच्या प्रमाणावरून ) च च्च त्पुटः आणि चाचपुटः ही होत.पहिल्याचे स्वरूप चतुरश्र असून दुसऱ्याचे त्र्यश्र असे होते. गुरू, लघू आणि प्लुत यांच्या प्रमाणांनी हे दोन आधारभूत ताल वर्तविले आहेत. लघू म्हणजे एक मात्रा, गुरू म्हणजे दोन मात्रा. त्यांचे निदर्शन ताल, प्रस्तार देताना क्रमाने ही चिन्हे योजिली जातात – लघू = ( । ), गुरू ( ऽ ), प्लुत ( ऽ̇ ).

चच्चपुट तालाचे निदर्शन असे – ऽऽ।ऽ ( एकूण आठ मात्रा ), चाचपुटाचे निदर्शन असे– ऽ।।ऽ ( एकूण सहा मात्रा ). हे ताल यथाक्षर होत. याचे द्विगुणित स्वरूप द्विकल चच्चत्पुट होय. ते असे – ऽऽ ऽऽ ऽऽ ऽऽ आणि चतुष्कल स्वरूप याच्याही दुप्पट प्रमाणाचे – ऽऽऽऽ ऽऽऽऽ ऽऽऽऽ ऽऽऽऽ. द्विकल चाचपुट असा– ऽऽ ऽऽ ऽऽ आणि चतुष्कल ऽऽऽऽ ऽऽऽऽ ऽऽऽऽ. याशिवाय षट् पिता पुत्रक, संपक्केष्टाक : आणि उद्घट्ट हे तीन प्रकारही प्रचारात होते. षट्पितापुत्रक : ( १२ मात्रा ) याचे निदर्शन असे – ऽ̇ । ऽऽ । ऽ̇. यालाच उत्तर आणि पञ्चपाणि अशी नावे होती. उद्घट्ट (६ मात्रा)–

ऽऽऽ ; संपक्वेष्टाक : ऽे ऽऽऽ ऽे या तिन्ही तालांचे द्विकल आणि चतुष्कल स्वरूप होते. मद्रक, अपरांतक इत्यादी जी गांधर्वात परंपरागत आलेली, ज्यांचे गेय आणि तालस्वरूप अत्यंत सुनिश्चित होते, त्यामध्ये ही ताल योजना करायची असे. चाचपुटाच्या प्रकारात चतुष्कला नंतर दुपटीने वाढून म्हणजे ४८ आणि ९६ मात्रा क्रमाने योजून आणखी प्रकार योजले जात होते. हे ताल हातांच्या आघातांनी कसे दाखवायचे ते वर दिलेल्या निदर्शनामध्ये हस्तपातांची आद्याक्षरे योजून दाखवायचे असत.

उदाहरणार्थ, चच्चतुट – ऽऽ । ऽ

सं श ता श

श म्हणजे शम्या ही उजव्या हाताचा प्रहार डाव्या हातावर करून, ता म्हणजे ताल डाव्या हाताचा प्रहार उजव्या हातावर करून आणि सं म्हणचे सन्निपात म्हणजे दोन्ही हातांची टाळी एकदम वाजवून दाखविला जाई. चाचपुट तालाची अशीच हस्तपातांची योजना केली जात असे.

उदाहरणार्थ – ऽ ।। ऽ

शताशता.

बाकीच्या तालामध्येही हस्तपातांची योजना याप्रमाणे केली जाई. ही टाळ्याने दाखविण्याची पद्धत जरा विचित्र वाटते. कारण ८ मात्रांच्या तालातही चार टाळ्या आहेत तसेच ६ मात्रांच्या तालातही चार टाळ्याच आहेत. यामुळे भरताने दिलेली तालपध्दति आता प्रचारात राहिलेली नाही असे वाटण्याचा संभव आहे. पण वस्तुस्थिती तशी नाही. याप्रमाणे टाळ्यांनी ताल दाखविण्याचीपध्दत धार्मिक लोकसंगीतात सध्याही दिसून येते. उदाहरणार्थ महाराष्ट्रातील आरती या प्रकारामध्ये टाळयांची योजना पुढीलप्रमाणे दिसून येते–

| | | | | |
|---|---|---|---|---|
| जयदेव | जयदेव ; | मृदंगवादनात | ' ग्यानबा | तुका ' |
| १ २ | ३ ४ ५ ६ | | १२ ३४ | ५६ ७८ |
| टा. | टा.टा.टा.० | | ऽ ऽ | । । ० ० |

तालात म्हणताना चच्चतुटातील पाताची योजना आढळते. यावरुन असे अनुमान काढता येते की भरताने दिलेली टाळ्यांनी ताल दाखविण्याची पध्दती लोकसंगीतावर आधारलेली होती. षटपितापुत्रकाचे पंचपाणि हे दुसरे नाव, पाणि म्हणजे टाळी असा अर्थ घेतल्यास तो बारा मात्रांच्या संपक्वेष्टाक या त्याच्या भेदाच्या निदर्शनाशी जुळतो, याशिवाय तालात अधिक मात्रा योजायच्या असताना त्यात आघातयुक्त योजना न करता हाताच्या बोटाचे आकुंचन, प्रसारण, उजव्या हाताची उजव्या बाजूला केलेली फेक किंवा बोटे आकुंचित करुन तो हात पालथा योजणे. चुटकी हा पात ही ध्रुव या शब्दाने सांगितला आहे. पण त्याचा वापर विशिष्ट अशा प्रकारे केला जात असे. यति म्हणजे लयीच्या प्रयोगासंबंधीचा नियम. आरंभी, मध्ये आणि शेवटी एकच लय योजिली असता ती समा यति होय ; विलंबित, मध्य आणि द्रुत अशी लय योजिली असता ती स्रोतोगता होय ; आरंभी द्रुत, मग मध्य व शेवटी विलंबित लय योजल्याने गोपुच्छा यति होते. गीत इत्यादीमध्ये त्यांच्या आरंभाबरोबर ताल सुरू झाल्यास तो समग्रह, गीत सुरु होण्यापूर्वी ताल

सुरू झाल्यास तो अतीत ग्रह होय. तसेच गीत इत्यादी सुरू झाल्यानंतर जो सुरू होतो तो अनागत ग्रह होय. भरताने मद्रक इत्यादींचे ताल स्वरूपही विस्ताराने दिले आहे. ही गीते सात होती. ती अशी – मद्रक, उल्लोप्यक, अपरांतक, प्रकरी, वेणु, रोविंदक आणि उत्तर ही होत. या प्रत्येक गीतात कोणकोणती अंगे वापरायची हेही भरताने निर्दशित केले आहे. याशिवाय या अध्यायात येणारा महत्त्वाचा विषय म्हणजे लास्यांगे हा होय. लास्य म्हणजे सुकुमार नृत्य. ही लास्यांगे गेयपद, स्थितपाठ्य, आसीनपाठ्य, पुष्पगंडिका, प्रच्छेदक, त्रिमूढक, सैंधवक, द्विमूढक, उत्तमोत्तमक व उक्तप्रत्युक्त.

(१) **गेयपद** – गायिका वाद्यांच्या साथीसह गीत गायन करते. (२) **स्थितपाठ्य** – प्रियकरापासून विरह प्राप्त झालेली स्त्री प्राकृत भाषेत रसपरिप्लुत पाठ्य म्हणते. (३) **आसीनपाठ्य** – यात स्थिरपणाने खाली बसून दुःखाचा अतिरेक आविष्कृत केला जातो. यात वाद्यसंगीत योजायचे नसते. (४) **पुष्पगंडिका** – यात गीते व विविध नृत्य योजले जाते आणि स्त्रियाच पुरुषांच्या हालचाली करतात. (५) **प्रच्छेदक** – यात चंद्रोदयामुळे भावना उत्तेजित झाल्याने दुःखी झालेली प्रिया आपल्या प्रियकराने केलेला अपराधही विसरून त्याला आलिंगन देते. (६) **त्रिमूढक** – यात समवृत्ते योजिली असून त्यात विविध पौरुष भाग वर्णिलेले असतात. (७) **सैंधवक** – यामध्ये आपले संकेत न पाळता येणाऱ्या प्रियकराचे अभिनयरूपाने स्वरूप दाखवीत प्राकृतामध्ये वीणा इत्यादीच्या करणांनी युक्त असे हे नर्तन असे. (८) **द्विमूढक** – यात रसभायुक्त गीत प्रभावीपणाने योजलेले असते, ज्यात मुख आणि प्रतिमुख हे गीतभाग योजलेले असतात. अभिनवगुप्ताच्या मताप्रमाणे यात चतुरस्त्र योजून चार दिशामध्ये पावले टाकली जातात. (९) **उत्तमोत्तमक** – यामध्ये अनेक रस प्रकट करणारे विविध वृत्ते असलेले असे गीत योजलेले असते. (१०) **उक्तप्रत्युक्त** – यात राग किंवा आनंद यानी युक्त असणारी उत्तरप्रत्युत्तरे संगीतबध्द केलेली असतात. ही लास्यांगे अभिनवगुप्तांच्या मताप्रमाणे सुकुमार पूर्वरंगामध्ये योजायची असत. उदाहरणार्थ, गीतक या पूर्वरंगातील विधीच्या जागी पाणिका ( ईश्वरस्तुतिपर पद ) योजून गेयपद योजायचे असते. स्थितपाठ्य नांदीच्या जागी आसीन पाठ्यासह योजायचे. अशाप्रकारे इतरही लास्यांगांची पूर्वरंगातील योजना अभिनवगुप्तांनी सांगितली आहे. जरी ही लास्यांगे सुकुमार पूर्वरंगात मुख्यतः योजायची असली तरी ही नाट्यामध्ये त्यांची उचित अशा स्वरूपाची योजना संभवत असल्याने त्यांचे नाट्यप्रयोगामध्ये भावपरिपोषासाठी उपयोजन होणे हे मान्य होते असे म्हणायला हरकत नाही.

३२ व्या संपूर्ण अध्यायात ध्रुवासंबंधी माहिती दिली आहे. भरताने दिलेल्या ध्रुवांच्या उदाहरणांपैकी बहुसंख्य प्राकृत भाषेत आहेत. ही ध्रुवागीते नाट्यप्रयोगात प्रसंगाला अनुसरून योजायची असत. ध्रुवामध्ये शब्द, स्वर आणि लय यांची सुयोजना निश्चित असल्याने या गीतांना ध्रुवा म्हटले आहे. नाट्यप्रयोग चांगल्या प्रकारे स्थापित होण्यास त्यांचा महत्त्वाचा भाग असे. या ध्रुवा पाच प्रकारच्या होत्या. प्रावेशिकी ही पात्राच्या प्रवेशाच्या वेळी आणि नैष्क्रामिकी, पात्र रंगभूमीवरून जाताना योजावयाच्या असत. आक्षेपिकी ध्रुवा भावामध्ये बदल दाखविण्याच्या वेळी योजायची असते. हिच्यात भावस्थितीला अनुसरून मध्य लय किंवा विलंबित लय यांचा द्रुत लयीत किंवा या उलट द्रुत लयीचा मध्य किंवा विलंबित लयीत इष्ट बदल केला जात असे. प्रासादिकी ही प्रेक्षकांची मनस्थिति रसानुभूतीमुळे विचलित झाली असता

ती पुन्हा स्थिर करण्यासाठी उपयोजिली जाई. प्रयोगांत काही प्रमाद निर्माण झाल्यास निरर्थक अक्षरे असलेले अंतरागीत योजिले जाई. त्यामुळे प्रयोगातील प्रमादावरून प्रेक्षकांचे लक्ष दूर केले जाई. भावनातिरेकामुळे – उदाहरणार्थ आत्यंतिक दुःख तसेच पात्राची भाषण विस्मृति किंवा मुकुट खाली पडणे इत्यादी सारख्या प्रयोगाची हानि करणाऱ्या गोष्टी निर्माण झाल्यास या ध्रुवा गानाचा उपयोग हमखास होई. भरताने या ध्रुवामध्ये वापरायची विविध वृत्ते उदाहरणासह दिली आहेत. ध्रुवांची भाषा सुबोध असून त्यामध्ये सूर्य, चंद्र, तारे, मेघ, वादळ आणि भारतातील ऋतूमधील दिसून येणारी विशिष्ट दृश्ये यांचे वर्णन केलेले असते. या धुव्रा प्रतीकात्मक असत. उदाहरणार्थ चंद्र, सूर्य, अग्नि व वारा यांचे वर्णन दिव्य पात्रे आणि राजे यांच्या संबंधात केलेले असे. मेघ, पर्वत आणि समुद्र ही प्रतीके राक्षसांच्या बाबतीत, मदोन्मत्त हत्ती आणि राजहंस श्रेष्ठ पात्रांच्या बाबतीत; मोर, कमळांचे ताटवे इत्यादी मध्यम पात्रांच्या बाबतीत; कोकिळा, भुंगा, कावळा इत्यादी हलक्या पात्रांच्या बाबतीत ; रात्र, ज्योत्स्ना, कमलिनी, हत्तीण आणि नदी ( यांचे संस्कृत शब्द स्त्रीलिंगी असल्याने ) राण्यांच्या बाबतीत; लता, हंसी इत्यादी मध्यम स्त्री पात्रे आणि वेश्या यांच्या बाबतीत ; आणि भृंगी, कोकीळा इत्यादी हलक्या स्त्री पात्रांच्या बाबतीत, अशा प्रकारे ही प्रतीके सविस्तर वर्णिली आहेत. ध्रुवा या नाटकाची कथावस्तु, प्रयोग, पात्राचा प्रकार, त्यांचे भाव तसेच नाट्यप्रसंगातील काल आणि अवस्था व स्थान त्याचप्रमाणे पात्रांचे वय या सर्वांचा उचितपणे विचार करून योजायच्या असत. लघू अक्षरे पुष्कळ असणाऱ्या ध्रुवा द्रुत लयीत योजल्या असता रथातून पात्रांचा प्रवेश, आकाशातून दिव्य यानांची गती, हत्तीच्या वरून संचार इत्यादीमध्ये वापरल्या जात. हालचालींची गती विलंबित असल्यास दीर्घ अक्षरे पुष्कळ असणाऱ्या ध्रुवा योजायच्या असत. अभिनवगुप्तांनी व नंतरच्या इतरही नाट्यग्रंथांत ध्रुवांचा नाट्यातील प्रयोग वर्णिला आहे.

या ध्रुवांच्या द्वारे प्रवेश करणाऱ्या पात्रांची भावस्थिती कळण्यास मदत होई. या ध्रुवा पात्रांनी गायच्या नसत. रंगभूमीच्या मागील बाजूस गायक, गायिका आणि वाद्यवृंद बसलेला असे. गायकांनी ध्रुवा गीत गायला आरंभ केल्यावर पडदा दूर झाल्यावर पात्र प्रवेश करीत असे. ध्रुवा गानात अर्थाला महत्त्व असल्याने योग्य ते थोडे अलंकार आणि साधी ताल योजना या द्वारे ध्रुवा प्रभावी ठरत. ज्यावेळी प्रत्यक्षपणे रंगभूमीवर पात्राचे गायन योजलेले असे त्यावेळी ' गायति ' अशी नाट्यसूचना कंसात दिलेली असते. ध्रुवांची जी उदाहरणे दिलेली आहेत त्यात सूर्यास्त, सूर्योदय, चंद्रोदय, ऋतु इत्यादी जी विविध दृश्ये वर्णिलेली आहेत त्यावरून लौकिक जीवनात सर्वसामान्याच्या अनुभवाला येणाऱ्या विशिष्ट गोष्टींची जाणीव स्पष्टपणे होते. अशा प्राकृत गीतांचे लोकजीवनात खूप महत्त्व असते आणि जीवनातील महत्त्वाच्या प्रसंगी अशी लोकगीते गायिली जातात. ध्रुवांच्या बाबतीत भरताने वर्णालंकार, ताल, अर्थासंबंधी आग्रह या विषयी जे विधान केले आहे आणि ध्रुवातील वर्णनावरून लोकजीवनाचे जे विशिष्ट अंग दिसून येते यावरून ध्रुवागान हे जाति-गायना इतके सुनिबद्ध नसून त्यात लोकगीताचे देशी स्वरूप आढळते असे म्हणायला हरकत नाही. यातूनच पुढे देशी गानाची परंपरा निर्माण झाली असावी असे म्हणता येते आणि म्हणून अभिनवगुप्तांनी गांधर्व आणि गान यातील फरक पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे – 'स्वर, ताल आणि पद हे संगीताचे घटक गांधर्व आणि गान ( ध्रुवागान ) या दोन्हींतही असले तरी त्यांचे स्वरूप,

फळ, योजायचा काळ आणि लक्षण यांत फरक आहे. गांधर्वात स्वरांची श्रुति मूल्ये पाळून येणारी शुद्धता अनिवार्य असून गाळायचे स्वर ठरलेले होते. गानात रंजकतेला अनुसरून स्वरांचे स्वरूप योजायचे असे. तालाचे निदर्शक हात आणि बोटे यांचा वापर गांधर्वात अनिवार्य होता तसा तो गानांत नसे. देवतांच्या प्रसादनाने गांधर्वात गायकाला अदृष्ट फळाची प्राप्ती होई. गान हे मुख्यतः श्रोत्यांना रंजविणे हे दृश्य फळ देई. गांधर्वाचा प्रयोग पूर्वरंगात होत असे तर गानाचा त्या त्या नाट्यप्रसंगाला अनुकूल असा केला जाई. गांधर्वात स्वर आणि ताल यापेक्षा शब्दांचे महत्त्व गौण स्वरूपाचे होते तर गानात स्वर आणि ताल यापेक्षा शब्दांना अधिक महत्त्वाचे स्थान होते'' गांधर्व आणि गान या दोन्हीमध्ये वीणा, वंश, मृदंगादी वाद्ये आणि टाळासारखे तालवाद्य यांची साथ असे. नाट्यशास्त्राच्या कलकत्ता आवृत्तीमध्ये गायक आणि वादक यांचे गुणदोष ३२ व्या अध्यायाच्या शेवटी दिलेले आहेत. बडोदा आवृत्तीत ३३ व्या अध्यायात ते स्वतंत्रपणे दिले आहेत. भरताचे वचन असे आहे की गुणामुळे गान हे प्रवर्तित होते तर दोषामुळे त्याचा निरास होतो. म्हणून गुण आणि दोष हे प्रयत्नपूर्वक जाणून घेतले पाहिजेत.

गायक हा तरूण, स्निग्ध आणि मधुर स्वरयुक्त कंठ असलेला तसेच लय ताल इत्यादींचे तत्त्व जाणणारा असा असला पाहिजे. गायिका या रूप गुण आणि कांति यानी युक्त, माधुर्यसंपन्न, गोड, स्निग्ध अनुरणनयुक्त इत्यादी गुणांनी युक्त असा गळा असलेल्या, योग्य प्रकारे गमक योजणाऱ्या, स्थिर मनाच्या, ताल व लय यांत कुशल आणि वाद्याला अनुसरून गायन करणाऱ्या अशा असल्या पाहिजेत. निसर्गतःच स्त्रियांचा आवाज मधुर असतो तर पुरूषांचा जोरदार असतो. म्हणून नाट्यप्रयोगात गानाच्या बाबतीत स्त्रियांची आणि पाठ्याच्या बाबतीत पुरुषांची योजना करावी. काही वेळा स्त्रियांच्याबाबतीतही पाठ्यगुण आणि पुरुषांच्या बाबतीतही गानाचे माधुर्य दिसून येते. पण हे अलंकार स्वरूप जाणावे. त्यांचा तो स्वभाव नव्हे. वीणावादक प्रहार, लय इत्यादींचा उपयोग जाणणारे, हाताचा गोडवा आणि हलकेपणा असणारे, गायकाच्या गुणांनी युक्त, मन एकाग्र असणारे, स्पष्टपणे रचित विविध करणांचा उपयोग करणारे, गीत ऐकण्यात निश्चल, वीणावादनात निष्णात चित्र इत्यादी वादनांत कुशल असे असावेत. वंशवादक हा बलवान, चित्त एकाग्र असणारा, गीत आणि लय जाणणारा, वंशाचा नाद मधुर, स्निग्ध आणि ऐकण्यास रमणीय असा निर्माण करणारा आणि दृढ हस्त असा जाणावा. वंशाचे वादन हे बोटे स्थिरपणाने ठेवून केलेले, अविच्छिन्न, वर्ण आणि अलंकार यांची जाण असलेले, मधुर, स्निग्ध आणि दोषरहित असावे असे शास्त्रांत सांगितले आहे. आचार्यांचेही गुण सांगितले आहेत. त्यामध्ये शास्त्राचे ज्ञान, प्रत्यक्ष गायनवादन करण्याचे कौशल्य, ग्रंथातील आशय धारण करणे, प्रयोगसिद्ध आणि शिष्याचा स्वभाव जाणून त्याला उपदेश करणे हे होय. यानंतर शेवटी कंठाचे गुणदोष सांगितले आहेत ते असे –

गुण सहा आहेत :– **श्रावक** – उच्च रूपाने सुस्वरपणे ऐकू येणारा, **घन** म्हणजे अखंडित स्वरूप असणारा, **स्निग्ध** म्हणजे रुक्षता नसणारा; **मधुर** म्हणजे मनाला आनंद देणारा; **अवधानवान** म्हणजे स्वरातील थोडा कमी जास्तपणा न होऊ देणारा. आणि तिन्ही स्थानांत ( म्हणजे मंद्र, मध्य आणि तार ) शोभिवंत असणारा. आवाजाचे दोष पाच सांगितले आहेत – (१) **कपिल** – गळ्यात कफ असल्याने विस्वरपणा आणि घरघर उत्पन्न होणे. (२) **अव्यवस्थित** – स्वरांच्या बाबतीत कमी जास्ती स्वरूप ज्यात असते आणि

रूक्षतेचा दोष. (३) **संदष्ट** – दात चावून गाणे. (४) **काकी** – म्हणजे स्वराचे उच्चारण त्यात्या स्वरस्थानात संकुचित असते व स्वरांत रुक्षता असते व शेवटी. (५) **तुंबकी** – नाकाच्या शेंड्यातून निघण्यामुळे जो आवाज उत्पन्न होतो तो. इतर आचार्य हाताचे गुण म्हणून सांगतात ते पुढील प्रमाणे–समान प्रहार करणे, वेगाने प्रहार करणे, स्पष्टपणे प्रहार करणे, श्रमावर विजय मिळविणे, गोडवा असणे, घामरहित, दीर्घता असणे आणि नखे मोठी असणे.

नाट्यशास्त्रातील संगीत विषयक अध्यायातील शेवटचा अध्याय अवनद्धवाद्यासंबंधीचा आहे. चामडे तोंडावर घट्ट बांधून मृदंगासारखी वाद्ये वाजविली जात. म्हणून अशा वाद्यांना अवनद्ध वाद्ये असे म्हटले आहे. तळयातील कमलपत्रावर वेगाने पडणाऱ्या धारांच्या आवाजावरून स्वातीला या वाद्यांची निर्मिती सुचली. मृदंग, पणव आणि दर्दर यांचे मुख्य वाद्य म्हणून वर्णन देऊन झल्लरी, पटह इत्यादी गौण वाद्ये म्हटली आहेत. मृदंग हा मातीचा बनविलेला असल्याने त्याचे हे नाव. पणव हा तंत्रीयुक्त असे.दर्दर हा घटाच्या आकाराचा होता. या मृदंगाला त्रिपुष्कर हा शब्द भरताने योजला आहे. यालाच भांड असेही म्हटले आहे. स्वाभाविक अशा घरगुती प्रसंगात भांड वाद्याचा प्रयोग थोड्या प्रमाणात करायचा असे. वीर, रौद्र इत्यादी रसयुक्त नाट्यविषय असता सर्व वाद्ये वाजविली जात. अभिनवगुप्तांनी भांड या शब्दाची व्युत्पत्ती ' भणति ' म्हणजे बोलते यापासून दिली आहे. अजून देखील प्रचारात मृदंग चांगला बोलतो असे म्हणण्याची प्रथा आहे. मृदंगाचे भांडे उत्कृष्ट आहे असे म्हटले जाते. या अवनद्ध वाद्यांमध्ये भेरी, पटह, झञ्झा, दुंदुभि, डिंडिम इत्यादी अवनद्ध वाद्ये त्यांच्या मर्यादित नादविशेषामुळे वर्णिलेली नाहीत. त्रिपुष्कराचे मात्र सविस्तर वर्णन दिले आहे. मृदंगामधून कोणते वर्ण निर्माण होतात. उदाहरणार्थ क ख ग घ इत्यादी १६ अक्षरे सांगून बाकीच्या मृदंगवादनात चार मार्ग, सहा करणे, तीन यती, तीन गती, तीन प्रकारचा प्रचार, तीन प्रकारचा संयोग, तीन पाणी, पंचपाणी प्रहार , तीन प्रहार, तीन मार्जना आणि वीस अलंकार यांची सविस्तर माहिती ; तसेच हस्तप्रहारांनी मृदंगातून विविध बोल कसे निर्माण करावे याविषयी वर्णन या अध्यायात मिळते. यातील तीन गती म्हणजे तत्त्व, अनुगत आणि ओघ ; सहा करणे वीणेच्या करणाप्रमाणे ; तीन प्रकारचा प्रचार म्हणजे सम, विषम आणि समविषम; तीन पाणी म्हणजे समपाणी, अवपाणी ( अर्धपाणी ) आणि उपरिपाणी हे होत ; मृदंगाच्या बाबतीमध्ये अत्यंत विशेष स्वरूपाची गोष्ट म्हणजे तीन प्रकारच्या मार्जना या होत. या मार्जना मायूरी, अर्धमायूरी आणि कार्मारवी अशा होत्या. त्रिपुष्कर म्हणजे तीन तोंडे असलेला मृदंग असा जर अर्थ घेतला तर भरताने दिलेली या त्रिपुष्कराच्या तीन तोंडातून योजण्याची स्वर योजना समजून येते. मायूरी या मार्जनेत डाव्या तोंडावर गांधार, उजव्या तोंडावर षड्ज आणि उभ्या तोंडावर पञ्चम असे स्वर सांगितले आहेत. ही मार्जना मध्यमग्रामातील गीतांच्या बाबतीत योजायची असे. डाव्या तोंडावर षड्ज, उजव्या तोंडावर ऋषभ आणि उभ्या तोंडावर धैवत अशी स्वरयोजना अर्धमायूरीची होय. तिचा वापर षड्जग्रामावर आधारलेल्या गीतामध्ये करायचा असे. कार्मारवीमध्ये डाव्या तोंडावर ऋषभ, उजव्या तोंडावर षड्ज आणि उभ्या तोंडावर पञ्चम असे स्वर सांगितले आहेत. या मार्जनेत पञ्चम हा तीन किंवा श्रुतींचा असल्याने दोन्ही ग्रामांत साधारणपणे तिचा उपयोग होत असावा असे म्हणता येईल. अशी स्वरांची योजना मृदंग वाद्यात

असल्याने गायन किंवा वादन यांचे स्वरूप प्रभावीपणाने निष्पन्न होत होते. मार्जनेमध्ये मृदंगाच्या तोंडावर अत्यंत मुलायम अशा काळ्या मातीचा लेप द्यायला भरताने सांगितला आहे. नदीच्या काठच्या, पाणी वाहून गेल्यामुळे अत्यंत मुलायम झालेल्या मातीचा लेप केल्याने मृदंगाच्या तोंडातून निघणारा नाद अनुरणनाने संपन्न असे. मातीच्या ऐवजी यव किंवा गहू यांच्या पिठाचा लेप दिल्यास फक्त एकच स्वर निर्माण होणे हा दोष सांगितला आहे. प्राचीन काळातील भारतीय शिल्पांचा अभ्यास केल्यावर असे आढळते की तीन तोंडांचा मृदंग हा अगदी क्वचित आढळतो पण मांडीवर आडवा घेतलेला एक आणि समोर उभा एक अशी तीन तोंडांची कल्पना करता येते. पुष्कर या नावाचे डावे, उजवे आणि मध्यभागी उभे अशी तीन तोंडे असलेला मृदंग पुण्याच्या राजा केळकर संग्रहालयात आढळतो. मृदंग वादनाचा नाट्यप्रयोगात वापर अत्यंत महत्त्वाचा होता. पात्रांच्या हचाली मध्ये मृदंगवादन अवश्य योजले जाई. विशेषतः परिक्रमण ( म्हणजे रंगभूमीवरून पावले टाकीत गोलाकर चालणे ) करताना मृदंगवादन आवश्यक असे. आजही भारतातील लोकनृत्यांत तसेच महाराष्ट्रातील लोकनाट्यांत ही परंपरा आढळते. मृदंग वादन हे रस आणि भाव यांना अनुसरून करायचे असल्याने भरताने या संबंधीचे तपशील विस्ताराने दिले आहेत. उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ पात्रांच्या हालचालीमध्ये मृदंग वादनात कोणते बोल योजायचे तेही भरताने सांगितले आहेत. मृदंगाचे आकार तीन प्रकारचे वर्णिले आहेत. हळदीच्या आकाराचा मृदंग आंकिक हा असून आलिंग हा गाईच्या शेपटाच्या आकृतीचा असे. ऊर्ध्वक हा यवाच्या आकृतीचा असे. मृदंग, पणव आणि दर्दर यांच्या तोंडाचे मापही सांगितले आहे. तसेच त्यांचा प्रयोग कसा करायचा तेही विशेषत्त्वाने सांगितला आहे. हाताचे पाच प्रकारचे जे प्रहार आहेत ते अद्यापही श्रेष्ठ मृदंग वादक योजतात असे आढळते. कारण अशा हाताच्या प्रहारामुळेच विशिष्ट वर्णांची मृदंगवादनातून निष्पती होते. हे प्रहार म्हणजे असे – सम हाताचा प्रहार, हाताच्या अर्ध्या भागाने प्रहार, हाताच्या बाजूने प्रहार, हाताच्या पाव भागाने प्रहार आणि तर्जनीने प्रहार. हे हाताचे प्रहार प्रयोगाला अनुसरून योजायचे असत. ध्रुवांच्या आरंभी आणि समाप्तीच्या वेळी मृदंगांची योजना तसेच पात्रांच्या प्रकारानुसार करायची वाद्यांची योजना, अवनद्ध वाद्यांत वापरायचे चामडे व त्याचे गुणदोष, वाद्यांचे पूजन इत्यादींचे वर्णन केल्यावर उत्कृष्ट मृदंग वादक कोणता ते ही अध्यायाच्या शेवटी सांगितले आहे. गीत, वाद्य, ताल, पाठ्य, ग्रह आणि मोक्ष यात निष्णात, हात हलका असलेला, ध्रुवांचे ज्ञान असणारा, हाताचा गोडवा, जोरदारपणा, मार्जनांचा योग्य प्रयोग आणि शरीर व बुद्धि एकाग्र असणारा मृदंगवादक श्रेष्ठ होय. सुसंगीत प्रयोग जाणणारा, आलेपनाचे प्रमाण जाणणारा, दोष रहित असा मृदंगवादक असला पाहिजे. हात गोलाकार फिरवून खाली किंवा वर असा हस्तप्रयोग योजून प्रहार करणारा, वेळेची जाणीव असणारा आणि छिद्र झाकण्यात निष्णात, करणांचा अभ्यास केलेला, पाणविक हा उत्तम होय. निश्चल, निपुण, हाताचा हलकेपणा असणारा, वादनाचे स्वरूप जाणणारा, मृदंग वाद्याच्या मध्ये वादन करणारा असा दर्दुर वादक स्तुत्य होय. स्फुटप्रहार, स्पष्टपणा, बोलांची भिन्नता, रजंकता, हाताने लेप लावणे, तिन्ही मार्जनांनी परिपूर्ण असे रागस्वरूप निर्माण करणारे मृदंगवादन गुणवान होय. भरत शेवटी म्हणतात – वादनामध्ये प्रथम प्रयत्न करणे आवश्यक आहे. कारण वादन हे नाट्याची शय्याच होय ( अर्थात वादन नाट्यपरिपोषासाठी आधारभूत असते तसेच पात्रांच्या

विश्रांतीसाठी त्याचे उपयोजन आवश्यक ठरते ). वादन आणि गायन यांचा सुयोग्य प्रकारें वापर केला असता नाट्यप्रयोगाला हानि पोचत नाही.

२८ व्या अध्यायाचे संपादन करताना असे ध्यानात आले की नाट्यशास्त्रात आलेल्या सर्व संगीतविषयक माहितीचा संक्षेपाने वाचकांना परिचय करून दिल्यास ते इष्ट होईल. त्यानुसार ही नाट्यशास्त्रातील संगीताची संक्षिप्त जाणकारी या प्रस्तावनेत देण्याचा प्रयत्न केला आहे. तसेच काही ठिकाणी भरताच्या संगीत विषयक विचारांची आधुनिक काळात मिळणाऱ्या माहितीनुसार फेरमांडणी करणे असाही विचार येथे केला आहे.

जातींचा तपशील परिशिष्ट एक यामध्ये, तसेच मद्रक इत्यादी सात गीतांच्या बद्दल अधिक माहिती परिशिष्ट दोन मध्ये दिली आहे. तिसऱ्या परिशिष्टात बहिर्गीतासंबंधी माहिती समाविष्ट केली आहे. जिज्ञासू वाचकांनी या परिशिष्टांचे अवलोकन करावे ही विनंती.

अक्षय्यतृतीया — डॉ. ग. ह. तारळेकर

पुणे- दि. २८-४-१९९८

श्रीरस्तु ।

# भरत-मुनि-प्रणीतं नाट्यशास्त्रम्

## अष्टाविंशोऽध्यायः ।

आतोद्यविधिमिदानीं वक्ष्यामः ।
ततं चैवावनद्धं च घनं सुषिरमेव च ।
चतुर्विधं तु विज्ञेयमातोद्यं लक्षणान्वितम् ॥१॥

## भरतमुनिप्रणीत नाट्यशास्त्र
## अठ्ठाविसावा अध्याय

आता आम्ही वाद्यविधि सांगतो :–

तत, अवनद्ध, घन व सुषिर या प्रमाणे लक्षणान्वित वाद्ये
चार प्रकारची जाणावी ॥ १ ॥

**अभिनवभारती**

॥ याच्या पुढे गेयाचा विषय आहे. ॥

ज्यापासून श्रुतिक्रमामुळे ( अन्य ) सहा स्वर उत्पन्न झाले, त्या मध्यम स्वराची इच्छा ( = साधना, संगीत - साधक ) करीत असतात. अशा प्रकारचा तो मध्यम स्वरहि ज्याचा कलात्मक विलास आहे, त्या चंद्रशेखर शंकराला मी नमस्कार करतो. [ किंवा – षट्चक्रांना जागृत करण्याचे कार्य ज्या सुषुम्णेपासून आगममार्गे सिध्द होते ( आणि योगी लोक ब्रह्मज्ञानासाठी ) जिची अपेक्षा करतात, ती सुषुम्णाहि ज्याच्या 'कले'चा विस्तार आहे, अशा त्या चन्द्र धारण करणाऱ्या ( प्रणवमय ) शिवरूपात मी लीन होतो. ] मागल्या अध्यायाच्या शेवटी ' वाद्यांचे वर्णन करू ' असे भरतमुनि म्हणाले होते, त्या अनुरोधाने सहाव्या अध्यायात आलेला श्लोक पुन्हा येथे प्रारंभी देतात :– ततं चैव. इत्यादि. उद्देशाध्याय श्लोक ६ ते १०

यांत पुढील उध्यायात येणाऱ्या विषयांची यादी ' सिद्धिः स्वरास्तथातोद्यं गानं रङ्गं च सङ्ग्रहः ' अशी दिलीच होती.

नटांनी राम वगैरेंचे रूप घेतलेले असते, त्याबद्दल शंका घेणाऱ्या प्रेक्षकांच्या तन्मयतेला येणाऱ्या अडचणींचे निवारण करण्याचे कार्य ' नाथो वनं विशति ' इत्यादि ( नाटकात गायिल्या जाणाऱ्या ) पदाच्या गायनाच्या स्वरांचा भाग ( संगीताचे वातावरण पैदा करून ) करतो आणि तालाचा भाग हा प्रयोगाला सूत्रबद्धतेने एकपणा आणतो; स्वर, लय व प्रेक्षकांचे त्यात गुंतलेले मन यांना आवरण ( आवृत्त ? ) करून त्यांना एकवटून रंजकता आणतो आणि त्यामुळे रसनिर्मितीला फार मोठे साहाय्य होते. यांपैकी स्वरभागाला तंतुवाद्ये व वेणुवाद्ये यांचा उपयोग होतो. स्वराची अत्यंत रंजकता ही दोन वाद्येच उत्पन्न करू शकतात. गायकांच्या स्वराचा कठोरपणा आदि अनेक दोषांना झाकून वीणा व वेणु त्याला सुस्वरता आणतात; कारण माधुर्य हा या वाद्यांचा स्वभावच आहे. गळ्याचे माधुर्य कमी असल्यास ( गायकाने ) ते अभ्यासाने साध्य करावे, असे म्हटले आहे. तंतावर स्वर हे बांधलेले असल्यामुळे त्या स्वरांच्या कमीजास्तपणाबद्दल शंका येण्याचे कारण नसते. स्वरांत मिळविलेल्या ( ' मूर्च्छितायाम् ' ) वीणेवर अशिक्षित माणसाने जरी बोटे टाकली, तरी स्वर बरोबर वाजतात, तसे वेणूचे नाही, म्हणून स्वर - वाद्यांत वीणेचे प्राधान्य मानले जाते. त्यामुळेच आचार्यांनी ' दारवी गात्रवीणा च ' या वचनाने कंठालाहि वीणा म्हटली आहे, कारण ( कंठाचे ) प्रतिबिंब वीणा असा व्यवहार आहे, त्यामुळेच वीणेवरील स्वर आधी सांगितले जातात – **' द्व्यधिष्ठानाः स्वरा वैणाः शारीराश्च '** इत्यादि. गान्धर्व-संगीतात गायकाला त्याचे फल अपेक्षित असते, म्हणून त्यात शारीर वीणेचे ( कंठाचे ) महत्त्व सांगितले आहे. गान-संगीतात गोडी हे त्याचे फल श्रोत्यांना मिळत असते ( प्रयोग कर्त्याला नाही ), त्यामुळे गांधर्व मुनींनी गानाचे उपकारक मानले आहे. संगीतातला तालभाग हा घन व अवनद्ध या वाद्यांच्या बोलांनी व्यक्त केला जातो, त्याचा उपयोग ध्रुवाध्यायात सांगितला आहे.[१] गान हे सामवेदापासून परंपरेने उत्पन्न झाले आहे, कारण ' सामभ्यो गीतम् ' असे वचन आहे. ब्रह्मगीतांपासून गीत हे उत्पन्न झाले म्हणून साम हे गीताचे मूळ मानले आहे, असे नव्हे. त्यामुळेच जाति वगैरेचे लक्षण प्रथम सांगितले आहे. त्यातूनहि तंताचा उल्लेख पहिल्याने केला आहे. कारण स्वरांचा लाभ तंतापासूनच होतो. त्यामुळे प्रयोजन नसतानाहि तंत विषयाचा निर्देश पूर्वीच काकु-अध्यायात केला आहे. वाद्यांचे स्वरूप अगोदर सांगितले जावे, यात काही असंगति नाही. ' लक्षणान्वितं ' म्हणजे उचित, कारण अनुचित (किरकोळ) वाद्यांचे लक्षण ग्रंथकाराने सांगितलेले नाही. त्यामुळे असे समजायचे की सांगितलेल्या ह्या वाद्यांत सर्व वाद्यांचा अंतर्भाव होतो. काही वाद्ये अंगरूपाने आहेत, तर काही वाद्ये निराळ्या प्रकारची असतानाहि त्यांचा उपयोग या (वर्णित) वाद्यसंचात होतो. घट वगैरे वाद्ये पखवाज वाद्याचेच अंग आहे, परंतु डोंबी व चाटुक या नाट्यप्रकारांखेरीज त्यांचा उपयोग केला जात नाही. अशा प्रकारची (क्षुद्र) अन्य वाद्येहि नाट्योपयुक्त ' मार्जना ' प्रकाराने आपापले स्वर व वर्ण यांनी नाट्यातील) रंजकता ज्योतिचक्राप्रमाणे सतत चालू ठेवण्यास[२] आपापल्या प्रकृति प्रमाणे चतुर्विध मुख्य वाद्यांना, अंशतः अनुसरण करून, साहाय्य करतात असे समजावयाचे आहे ॥१॥

**ततं तन्त्रीकृतं ज्ञेयमवनद्धं तु पौष्करम् ।**
**घनं तालस्तु विज्ञेयः सुषिरो वंश उच्यते ॥२॥**

तत म्हणजे तंतुवाद्ये व अवनद्ध म्हणजे पुष्कर ( पखवाज आदि ) वाद्ये जाणावी. घन वाद्ये म्हणजे झांजा ( करताल वगैरे ) जाणावी आणि सुषिर वाद्ये वंश (बासरी इत्यादि ) म्हटली आहेत. ॥२॥

अ. भा. 'ततं तन्त्रीकृतं' ह्या वचनाने पूर्वोक्त चातुर्विध्याचे स्मरण देतात, तन्त्रींनी ( तारांनी ) बनविले गेलेले ते 'तत'; चामड्याने ( तोंड ) ताणून बांधलेले ते अवनद्ध. ज्याची आकृति ( मूर्ति ) कठिण आहे ते घन. त्यामुळे ( म्हणजे घनत्वामुळे ) ही वाद्ये आपल्या विशिष्ट बोलांनी निरनिराळ्या रसभावांचा परिपोष करण्याला उपयोगी पडत नाहीत; तथापि फक्त तालाचे साम्य दाखविण्याला ही वाद्ये उपयोगी पडतात, त्यामुळे त्यांना 'ताल' ही संज्ञा दिली आहे. 'घनं सुषिरम्' असा पाठभेद कित्येकांनी स्वीकारला आहे, त्याचे कारण आतोद्य ( = वाद्य ) या शब्दाच्या संबंधामुळे त्यांनी सुषिर शब्द नपुंसकलिंगी मानला आहे.

वेणु आदि सुषिरवाद्ये स्वरात्मक असता त्यांचा निर्देश घन वाद्यांनंतर का केला ? असा प्रश्न कित्येक करतात. पण हा प्रश्न योग्य नाही, कारण स्वराच्या विषयामध्ये वीणेचेच प्राधान्य आहे. अवनद्ध वाद्ये आघातांनी वाजवावयाची असल्यामुळे त्यांची प्रकृति शुष्क आहे आणि त्या वाद्यांचे ( तालाचे ) प्रमाण दाखविण्यास ( झांजा वगैरे ) घन वाद्ये मदत करतात. वीणेप्रमाणेच ( वेणु आदि ) सुषिर[३] वाद्यांचे साम्य तंतवर्गाशी आहे. ही चारही प्रकारची वाद्ये उपरंजक आहेत. कारण येथे अभिनयाची रंजकता वाढविण्याचा उद्देश आहे. त्यासाठी उभिनय आणि वाद्ये यांचा एकत्र समूह उत्पन्न करणे आवश्यक असते. पैकी चतुर्विध वाद्यांचे स्वर - प्रधान व ताल - प्रधान असे दोन प्रकार होतात; अर्थात यांपैकी पहिला तंत व दुसरा अवनद्ध. सुषिर व घन ही त्यांची अनुक्रमे अंगे समजावी. अभिनय या संज्ञेने पात्रवर्ग समजावयाचा असून ह्यांचा ( वाद्ये वगैरेंचा ) जो समूह त्याला 'कुतप' हे नाव दिले जाते. 'कुत' म्हणजे शब्द, त्याला 'पाति' म्हणजे रक्षण करतो किंवा 'कु' म्हणजे रंग ( = रंगभूमि ) त्याला 'तपति' किंवा 'उज्ज्वलयति' म्हणजे अतिशय उजळतो, अशी 'कुतप' शब्दाची निरुक्ति समजावी ॥ २ ॥

**प्रयोगस्त्रिविधो ह्येषां विज्ञेयो नाटकाश्रयः ।**
**ततं चैवावनद्धं च तथा नाट्यकृतोऽपरः ॥ ३ ॥**

**ततः कुतपविन्यासो गायनः सपरिग्रहः ।**
**वैपञ्चिको वैणिकश्च वंशवादस्तथैव च ॥ ४ ॥**

**मार्दङ्गिकः पाणविकस्तथा दार्दरिकोऽपरः ।**
**अवनद्ध - विधावेष कुतपः समुदाहृतः ॥ ५ ॥**

नाटकामध्ये या वाद्यांचा प्रयोग तीन प्रकारे होतो असे जाणावे :– ज्यात
तंतुवाद्ये मुख्य आहेत असा, ज्यात चर्मवाद्ये प्रमुख आहेत असा,
आणि तिसरा प्रकार म्हणजे नाट्यकृत हा. ॥ ३ ॥

**गायक व त्याचे साथीदार, वैपंचिक, वैणिक व बासरीवादक**
**हे एवढे मिळून तंतु वाद्यांचा कुतप बनतो. ॥ ४ ॥**

**पखवाजी, पणववादक व दर्दुरवादक मिळून अवनद्ध**
**वाद्यांचा कुतप म्हटला आहे. ॥ ५ ॥**

अ. भा. तोच विषय पुढे सांगतात –

प्रयोगस्त्रिविधो ह्येषाम् = ह्या चारही प्रकारच्या वाद्यांचा ' नाटकाश्रयः ' म्हणजे नाटकातील पात्रवर्गासहित ' प्रयोग ' म्हणजे प्रकर्षाने होणारा योग अर्थात समूहीभाव तीन प्रकारचा आहे. दोन समूह वाद्यांचे आणि नाट्योपयोगी पात्रवर्गरूप तिसरा. म्हणून म्हणतात की, **नाट्यकृतोऽपरः** अर्थातच ( तारांना ताणून ) वाजविणे, (पखवाज वगैरेवर ) आघात करणे आणि ( वेणु वगैरेचे ) सौषिर्य ( पोकळ वाद्यात हवा घालून स्वर उत्पन करणे ) अशा वेगवेगळ्या क्रियांमुळे हे ( पहिले दोन वर्ग ) संकीर्ण रूपाचे आहेत; तथापि ह्यांचा उपयोग एकवटूनच करण्यात येतो. ' तनन ' ह्या क्रियेत स्वरप्राधान्य आहे. परंतु पखवाज वर्गाच्या वाद्यांवर आघात केल्यामुळे जे वर्ण ( बोल ) उत्पन्न होतात, त्यांचे वीणेवरील ( आघातजन्य स्वरमालिकेशी ) साम्य नाही. हीच गोष्ट ( घन वगैरे ) वाद्यांविषयी जाणावी. ' तत ' नावाचा कुतप एक वेगळा समूह करावयाचा असतो म्हणून म्हणतात :– **ततः कुतपविन्यासः** इत्यादि.

' गायकस्य परिग्रहः ' म्हणजे झांजा, करताल वगैरे वाजवून गायकाची साथ करणारे. ' विपंची ' ही ( मिजराफीने ) वाजवावयाची ( नऊ तारांची ) अपूर्ण वीणा आहे आणि ' वीणा ' ही एकवीस तारांची (= ' मत्तकोकिला ' = स्वरमंडल = कानून ) समजावी. श्लोकातील ' च ' – काराने अन्य वीणा जाणाव्या.

**तथैव च** या शब्दांनी अन्य सुषिरवाद्ये घ्यावी. आता अवनद्धवर्ग सांगतात :– मार्दङ्गिकः इत्यादि. ' मृदंग ' म्हणजे पुष्कर ( = पखवाज ), ' पणव ' म्हणजे आतल्या बाजूस तारा लावलेले असे ' हुडुक्का ' या वाद्यासारखे वाद्य व ' दर्दुर ' हे मोठ्या घटासारखे एक वाद्य आहे. तथैव च या वचनाने ' मर्दल ', ' करट ' वगैरे वाद्यांचा समूह समजावा. गायन व वादन ह्यांत ( तालाचे ) साम्य राखण्यासाठी झांजांची आवश्यकता असते, अर्थात त्यांचा उपयोग कुतपांतच होतो. ॥ ३ - ५ ॥

**उत्तमाधममध्याभिस्तथा प्रकृतिभिर्युतः ।**
**कुतपो नाट्य-योगे तु नाना-देश-समुद्भवः ॥ ६ ॥**

अनेकदेशीय उत्तम, मध्यम व अधम अशा ( विविध प्रकारच्या )
पात्रांनी युक्त असा नाट्यकुतप होतो. ॥ ६ ॥

अ. भा. आता नाट्यकुतपाचे वर्णन करतात :– **उत्तमाधममध्याभिः** इत्यादि पुढे ' उत्तम ' वगैरे प्रकारांचे वर्णन करतील, त्याप्रमाणे उचित पात्रसमुदाय, असा अर्थ येथे समजावा. ' तु ' या शब्दाने अगोदर सांगितलेल्या विषयापेक्षा निराळे वैशिष्ट्य समजावे. तत व अवनद्ध कुतपांची रंगभूमीवरील विशिष्ट स्थाने पुढे पुष्कराध्यायात सांगण्यात येतील. नाट्यकुतपाच्या प्रयोगामध्ये व्यत्यय येऊ नये, अशा तऱ्हेचा संपूर्ण संच असावा. त्या कारणाने या विषयात देशनियम सांगितलेला नाही. नानादेश इत्यादि वचनाने देशविशेष अनुलक्षित आहे, असे दुसरे टीकाकार म्हणतात. ॥ ६ ॥

**एवं गानं च वाद्यं च नाट्यं च विविधाश्रयम् ।**
**अलात-चक्र-प्रतिमं कर्तव्यं नाट्य-योक्तृभिः ॥ ७ ॥**

ह्याप्रमाणे गीत, वाद्य व नाट्य या विविधाश्रयी ( कलांचा ) उपयोग नाट्यप्रयोगकर्त्यांनी ( नाट्यात ) अलातचक्राप्रमाणे ( अखंडित असा ) करावा. ॥ ७ ॥

अ. भा. ह्या तीन समूहांचा परस्परांशी संबंध नाही, अशी शंका कोणी घेतात, तिचे निराकरण असे :– **एवं गानं च वाद्यं च.** इत्यादि ( तात्पर्य ), तिन्ही समुदायांनी ऐक्यभावाने कार्य करावयाचे आहे. असे येथे ज्याअर्थी ( म्हटले ) आहे, त्याअर्थी ही शंका योग्य नाही हे उघड आहे. एकटा गायक, एकटा मार्दंगिक वा एकटे उत्तम पात्र ( असे वेगवेगळे ) पुरुष येथे दाखविलेले नाहीत. ( सातव्या श्लोकात गान, वाद्य व नाट्य असा वेगवेगळा उल्लख आहे त्यामुळे ) गायन वगैरेंच्या वेगळेपणाबद्दल शंका घेऊन त्याला उत्तर देतात – ' विविधाश्रयम् ' म्हणजे ज्याचे आश्रय अनेक प्रकारचे आहेत असे. मतलब असा की प्रयोगकर्त्याच्या ( प्रयोगाशी ) असंबंधित असे गान वगैरे ( नाट्यप्रयोगात ) असू शकत नाही; म्हणून म्हटले आहे की, ............... ( यांचा ऐक्यभाव ) प्रयत्नाने साधावा. **विविधाश्रयम्** म्हणजे भिन्न इन्द्रियांद्वारे ग्राह्य अशा विविध क्रियारूपाचे. त्यामुळे प्रयत्नाने त्यांचे ऐक्य अशा तऱ्हेने साधले गेले पाहिजे की प्रेक्षकांची बुद्धि ( या तिन्हींच्या विषयी ) एकरूप होईल. ज्योतीचे तेजःकण वास्तविक एकाचवेळी अनेक स्थानी प्रतीत होणारे नसतात, पण हस्तलाघवाने व यत्नाने त्यांचे साम्य संपादित करावयाचे असते, (ज्योतीला गति देऊन त्यांचे चक्र बनवायचे असते), त्याप्रमाणे ( गानादि तिन्ही वस्तूंचे ) ऐक्य हे प्रयत्नाने साधावयाचे असते; हे स्पष्ट करण्यासाठी सांगतात :– **अलातचक्रप्रतिमम्** इत्यादि ( शंका :– ) परंतु ही गोष्ट सामान्याभिनयाध्यायात तर संगितलीच होती. (निराकरण :– ) खरे आहे; पण तो विषय तेथे अभिनयाचा होता. या ठिकाणी आता गीत, वाद्य व नाट्य यांच्या परस्पर संबंधाचा विषय आहे. ( गानादींच्या ) तीन वेगवेगळ्या राशी का केल्या, या शंकेचा परिहार ' एवं गानं. ० ' आदि वचनाने होतो. तो असा की गान, वाद्य व नाट्य ही एकमेकांची उपरंजक झाली पाहिजेत. सामान्याभिनयाच्या विषयात ह्यांचे एकत्व अभिनयाच्या बळावर केले जाते. ( वास्तविक ) येथे विवाद नाही. स्वरगतींच्या राशींचे एकमेकांशी मीलन करून ते अलातचक्राप्रमाणे बनवायचे असते. वीणा, वेणु व कंठ यांच्या म्हणजे

वाद्य व गायन यांच्या विधीचे एकीकरण करावयाचे असते. या तिघांना एकवट ( = 'ग्रासीकरण' ) करणे आवश्यक आहे, हा भावार्थ.

( शंका :– ) पण ह्याप्रमाणे तीन वस्तू ( = 'राशि' ) एकीभूत झाल्यास प्रयोग सम्यक् होण्याला जी लक्षणे पाहिजेत त्यांची सिद्धि होत नाही. त्याचप्रमाणे गीत व वाद्य यांचे दोषहि सिद्धीला घातक आहेत. त्या कारणाने या प्रयोगाच्या सिद्धीची युक्ति ग्रंथकर्त्याला गेयाधिकाराच्या नंतर सांगावी लागली आहे. हीच कारणे दाखवितात की गीत, वाद्य व नाट्य यांची ( एकत्र ) सिद्धि होऊ शकत नाही. याचे ( आणखी एक कारण हे की, या तिहीं पैकी ) कोणती वस्तु प्रधान व कोणती वस्तु तिचे अंग आहे ह्याबद्दल संशय उत्पन्न होतो. पूर्वीच सिद्धीचे निरूपण करण्यात आले असते तर ( अमुक ह्या वस्तूचा ) एवढाच प्रयोग करावयाचा आहे हे माहीत झाले असते. त्या त्या अंगाची उपरंजकता सांगावयास हवी होती. ( या विवेचनाच्या मध्ये सिद्धीचे निरूपण आले असते, म्हणजे अपेक्षित उपरंजक वर्गाची स्पष्टता झाली असती.

दुसरे असा आक्षेप घेतात :– " दशरूपकाच्या प्रयोगाची सिद्धि त्यातील गायन-वादन वर्ज्य करून केवळ पठनानेहि होऊ शकते, असे ( ग्रंथकर्त्याच्या ) या वाचनाने सूचित करण्यात आले आहे. " परंतु त्यांचे हे म्हणणे योग्य नाही; कारण ( गीत-वाद्य वर्ज्य केल्याने ) नाट्यात तेवढीच अपूर्णता राहील. नाट्याचे परिपूर्ण आणि सर्वग्राही असेच स्वरूप भरतमुनींना अभीप्सित आहे. शिवाय नाट्यात गीत व वाद्य यांचे प्राधान्य आहे, असे आम्ही मागे म्हटलेच आहे. दुसरे एक टीकाकार यावर असा आक्षेप घेतात :– " असे जर आहे तर मग सिध्द्यध्यायात गीतवाद्यांचे वैषम्य सांगितले आहे ते का ? यांचे पूर्वीच समाधान करणे योग्य झाले असते. उपरंजक ( अशा गीत व वाद्य यांच्यामुळे ) नाट्याचा फायदा होऊन त्याला नाट्यता येते असे ज़र असेल तर ह्या बनावामुळे ( नाट्य ही गायन-वादनानंतर ) प्राप्त होणारी वस्तु आहे असे ठरते. ( नाटकात ) आधी गायन, त्यानंतर मध्यंतरी वादन ( व त्यानंतर नाट्य ) असा तीन किंवा चार प्रकारचा नाट्यानुसारी कार्यक्रम ठरवणे योग्य होईल. त्यामुळे उपरंजक अशा गानाच्या अनुसरणाने नाट्याची स्थापना केली पाहिजे; तरच नाट्य मनोरंजक होऊ शकते, असा नाट्यरंगासाठीचा योग्य नियम सांगावयास पाहिजे होता. " या टीकाकारांचे हे म्हणणे आम्हांस बिलकुल मान्य नाही. कारण नाट्याच्या आश्रयाशिवाय ( गानादिकांची ) किंचित देखील प्रवृत्ति होऊ शकत नाही. गानाचा सुद्धा नाट्याला अनुसरूनच उपयोग होतो, हे तालाध्यायात त्र्यश्रादि व्यवस्थाभेदाने सांगितलेच आहे. ॥ ७ ॥

**यत्तु तन्त्रीकृतं प्रोक्तं नानातोद्यसमाश्रयम् ।**
**गान्धर्वमिति तज्ज्ञेयं स्वर - ताल - पदात्मकम् ॥ ८ ॥**

ज्याला अनेक वाद्यांच्या वादनाचा - मुख्यतः वीणावादनाचा आधार आहे व जे स्वर, ताल व शब्द यांनी बनलेले आहे, ते गान्धर्व ( संगीत ) होय असे जाणावे. ॥ ८ ॥

अ. भा. :– आता तंतुवाद्याचे स्वरूप व त्यापैकी प्रमुख वीणा सांगण्यासाठी प्रस्तावना करतात :– **यत्तु तन्त्रीकृतं प्रोक्तम्** इत्यादि. विपंची आदि वीणाप्रकार आतोद्यात येत नाहीत, असे एक टीकाकार म्हणतात,

ते अयोग्य आहे. तारांच्या समग्र वाद्यांचा समावेश आतोद्यात होतो, हे न सांगताहि समजण्यासारखे आहे. त्यामुळे ( विपंची वगैरे सर्वच वीणांचा अंतर्भाव आतोद्यात होतो, ) हा अर्थ आमच्या संप्रदायास मान्य आहे. नाना प्रकारच्या वाद्यांचा ज्याला आश्रय आहे, वाद्ये ज्याच्या स्वरूपाला उपकृत करून आश्रय करतात, त्यामुळे आतोद्य ज्यात प्रधान आहे ते गान्धर्व. गान्धर्व ( = शास्त्रीय संगीत ) हे ज्याचे मोजताप आहे, गान्धर्वात ज्याचा अंतर्भाव होतो, गान्धर्वात जे अन्तर्लीन आहे ते आतोद्य, असा अर्थ समजावा. ( **स्वरतालपदात्मकम्** या वचनाने ) येथे क्रम निर्दिष्ट आहे. स्वर, ताल व पद या तीन लक्षणांनी जे युक्त ते गान्धर्व, या वचनानुसार स्वरादि क्रम ( म्हणजे स्वर, ताल व पद यांत स्वर हा मुख्य ) समजावा. त्याच प्रमाणे साथिदारांसह गायकाची गणना तत वर्गातच होते. ह्याच कारणाने गान्धर्व हे **तन्त्रीकृत** आहे, म्हणजे वीणाप्रधान आहे ( असा ग्रंथकाराचा आशय आहे ). **गान्धर्व** म्हणजे गान्धर्वशास्त्र ज्याला प्रमाण आहे ते ( अर्थात शास्त्रीय संगीत. ) ॥ ८ ॥

**अत्यर्थमिष्टं देवानां तथा प्रीतिकरं पुनः ।**
**गन्धर्वाणां च यस्माद्धि तस्माद्गाधर्वमुच्यते ॥ ९ ॥**

**अस्य योनिर्भवेग्दानं वीणा वंशस्तथैव चं ।**
**एतेषां चैव वक्ष्यामि विधिं स्वर-समुत्थितम् ॥ १० ॥**

देवांना अतिशय इष्ट व गन्धर्वांना प्रिय असल्यामुळे
याला गान्धर्व म्हटले जाते ॥ ९ ॥

याचे मूळ गान, वीणा व वेणु ही आहेत, ( म्हणून ) त्या
तिघांचा स्वरगत विधि आता वर्णन करतो. ॥ १० ॥

( शंका :– ) सामांपासून गीत उत्पन्न झाल्याचे सांगतात, त्यामुळे ( गीताचे ) मूळ सामगान हे ठरते. गान्धर्व हेहि सामगानापासून उत्पन्न झाले आहे. परंतु गान्धर्व हे स्वराद्यात्मक असल्यामुळे गान हे गान्धर्वाशी समान ठरत नाही; त्यामुळे गानाचा अंतर्भाव होतो, ही भाषाच कशी काय? याच्या उलट का असू नये? किंवा दोन्हींचे तादात्म्य का असू नये?

ह्या शंकेचे निराकरण करण्यासाठी ग्रंथकार म्हणतात :– **अत्यर्थमिष्टं देवानाम्** इत्यादि ह्या वचनाने गान्धर्वाचे आदित्व [ अनादित्व (?) ] सूचित होते. देव त्यांना इष्ट असलेली वस्तु कशी त्यागतील? या श्लोकातील **तथा** या शब्दाने ग्रंथकाराला सुचवावयाचे आहे की, गान्धर्वाने देवतांना संतोष होतो व त्यामुळे ते ( आपली ) प्रीति देतात. अशा तऱ्हेने येथे अदृष्ट फल दाखविले आहे.

देव अर्थात ईश्वर म्हणजेच इन्द्रिये, मन व संवेदना. वाद्यवादन हे या देवांप्रत पोहोचते. अर्थात या क्रियेने देववाद्यांकडुन बाह्येन्द्रियांच्या शब्दादि विषयांच्या अर्थांचे उल्लंघन होऊन देवांना इष्ट असा यज्ञच केला जातो आंणि त्यामुळे ( बाह्य विषयांहून ) पर अशा संविदेचा लाभ होतो, असे उपलक्षणेने सुचवितात. अशा प्रकारे मोक्षप्राप्तीच्या आनंदासमान ज्याचा स्वभावविशेष आहे असे एक मोक्षफलच

त्यामुळे मिळते, हे या वाक्याने दाखविले आहे. धनाची ज्याला जरूरी नाही असे हे देवांचे श्रेष्ठ यजनच आहे व पुराणश्रवण, योग इत्यादिपेक्षा प्रत्यक्ष शंकराला गान्धर्व हे जास्त आवडते, हा अर्थ. पुन्हा, **गान्धर्वाणाम्** या शब्दाने ग्रंथकर्त्याने सुचविले आहे की गान्धर्वाने अत्यन्त संविदेचा लाभ होऊन गायकाला फल प्राप्त होते. ' सकृत्प्रयुक्तापि हि नन्दयन्ती यथाविधि ब्रह्महणं पुनाति । ' [ म्हणजे ' यथायोग्य रीतीने नन्दयन्ती एकवार प्रयुक्त केली असताहि ती ब्रह्महत्या केलेल्या ( पाप्यास ) पुनीत करते ' ] इत्यादि वचनानुसार प्रयोगकर्त्याला ( गान्धर्व गायनाचे ) मुख्य फळ मिळते ( म्हणजे ते श्रोत्यांना मिळत नाही ).

( शंका :– ) परंतु गान हे मुख्यतः श्रोतृनिष्ठ आहे, त्यामुळे ते गंधर्वांची प्रीति वाढविणारे आहे, असा ग्रंथकर्त्याच्या या वचनाचा मतितार्थ आहे. ( निराकरण :– ) तथापि श्रवणाने प्रीति वाढविणारे व अनादि दृष्टादृष्ट फल देणारे म्हणून देवांना इष्ट व गंधर्वांना प्रिय ते गान्धर्व, असा या वचनाचा अर्थ योग्य आहे. त्या कारणाने जे विशेषेकरून प्रीति वाढवते ते गान असा येथे अध्याहार समजावा. कारण गानाचा उपयोग केवळ प्रीतिकार्यात होतो. अनादि असून जे स्वतःच फलरूप आहे, त्याच्यामध्ये नवीन व महान् फल देणाऱ्या वस्तूचा अन्तर्भाव करणे हा विपर्यय आहे आणि तो ( या स्पष्टीकरणामुळे ) निरस्त होत आहे. गान्धर्वाचा विशेष विचार पुढे ध्रुवाध्यायात नृत्त विषयात आम्ही करणारच आहोत. भाषेचा अर्थ लावण्याच्या युक्तीचे ज्यांना ज्ञान नाही, त्यांना सध्याच भ्रम होईल ( तो होऊ नये एवढ्याचसाठी आम्ही ) हा खुलासा केला आहे.

**अत्यर्थमिष्टं देवानाम्** इत्यादि. ' गां ' म्हणजेच वाणीला जे धारण करते ते गान्धर्व किंवा गन्धर्वांचे ते गान्धर्व, अशी व्युत्पत्ति समजावी. या विषयी **विशाखिलाचार्यांचे** वचन असे आहे :– ' पुरा स्वर्गप्रनष्टां ( वाचं ) देवेभ्यः ' इत्यादि; त्यानेहि हेच प्रदर्शित केले जाते. **' प्रीतिवर्धनम् '** या शब्दाने **नारदाचे** वचन सूचित केले आहे, ' गेति गेयं विदुः धेति धातुप्रवादनम् ' इयादि ( म्हणजे, ' ग 'याने गेय, ' ध 'याने [ वीणा धारण करणाऱ्याचे ] कौशल्ययुक्त धातूंचे वादन जाणतात इत्यादि ) या संबंधात आमच्या गुरुजींचे म्हणणे असे आहे :– गान्धर्व हे कोठून उत्पन्न झाले ? गान हे सामवेदापासून उत्पन्न झाले असता गान्धर्वाची चर्चा पहिल्याने का केली ? जर गानाचाच उपयोग आहे, तर मग त्याचेच लक्षण ( अगोदर ) सांगावयास पाहिजे होते. ह्या शंकांचे निराकरण करण्याकरिता ग्रंथकार म्हणतात :– **अस्य योनिर्भवेद्गानं** इत्यादि. **अस्य** म्हणजे या गान्धर्वाचे मूळ ( = योनि ) गान म्हणजे सामवेदोत्पन्न साम नावाची गीते. येथे **वीणा** म्हणजे महाव्रताला लागणारी औदुंबरी **वीणा**; **वंश** अर्थात नारदाचा अनुयायी शिष्य संप्रदाय. हे गान्धर्वाचे मूळ होय. किंवा गान, वीणा व वंश इत्यादि कुतप-साहित्य सांगावयाचे आहे ते या गान्धर्वांचे मूळ कारण समजावे, हा शेष अर्थ होय; कारण कुतपाला उपयोगी असल्यामुळे गान्धर्वाचा येथे उल्लेख केला आहे. दुसरे एक टीकाकार म्हणतात की लौकिक परंपरेने ब्रह्मोक्त गीते गाणाऱ्यांकडून गायिली जातात, ती ( गान्धर्वाच्या ) उत्पत्तीचे कारण होत. टीकाकारांच्या मते गान हे प्रधान व वीणा-वंश हे त्याचे साहाय्यक. ' रथन्तर गायत्रीला येथे गातात ' इत्यादि वचनाचा आधार घेऊन आणि तात्पर्याचे व्याख्यान करून गुण प्राधान्याचा हा निर्णय देण्याचा या टीकाकारांनी जो महान खटाटोप केला आहे तो विषयाला सोडून आणि ' गायतेः ' शब्दाच्या औपचारिक आश्रयाचे त्याला बळ देऊन, केला असल्यामुळे तो वाळू चघळण्याप्रमाणे

( केवळ निरर्थक ) झाला आहे. रथन्तर गायत्रीचा आधार जर मिळाला नाही तर मग केवळ ( गीतीच्या ) स्वरसंनिवेशाने ( गानाची प्रधानता ) हे सिद्ध करणार आणि नंतर गीतीमुळेच स्वरांना सामान्य - विशेषभाव प्राप्त होतात असे म्हणणार हे यांचे म्हणणे. 'आकाश हे आकाशातच राहिलेले आहे' या प्रतिपादनाप्रमाणे स्वतःला स्वतःचा आधार दर्शविणारे आहे.[४] सारांश ह्यांच्या ह्या प्रतिपादनात जरासुद्धा तथ्य नाही.

तर ग्रंथकारांनी जे हे गान्धर्व सांगितले, त्याचा गानादींमध्ये कसा उपयोग करावयाचा या विषयी म्हणतात :– **एतेषाम्** इत्यादि या वाक्यात **च** हा शब्द अर्थप्रतिपादक आहे. तथा ह्या शब्दाचा संबंध पूर्वोक्त वाक्याशी आहे. त्यामुळे गान्धर्व ह्या गायन प्रकाराने संगीतजन्य भावांचा **स्वरसमुत्थितम्** म्हणजे स्वरविषयक विधि सांगतो, दुसरा कोणताहि नव्हे, हे तात्पर्य. ॥ ९ - १० ॥

**गान्धर्वं त्रिविधं वियात्स्वर-ताल-पदात्मकम् ।**
**त्रिविधस्यापि वक्ष्यामि लक्षणं कर्म चैव हि ॥ ११ ॥**

**द्व्यधिष्ठानाः स्वरा वैणाः शारीराश्च प्रकीर्तिताः ।**
**एतषां संप्रवक्ष्यामित विधानं लक्षणान्वितम् ॥ १२ ॥**

गान्धर्व हे स्वर, ताल व पद ह्या तीन विषयांनी बनलेले आहे असे जाणावे.
त्या तिन्ही विषयांचे लक्षण व क्रिया सांगतो ॥ ११ ॥

शरीर ( = कंठ ) व वीणा ही स्वरांची दोन ( मुख्य ) स्थाने म्हटली आहेत.
ह्यांचे लक्षणासह विधान ( आता ) सांगतो ॥ १२ ॥

अ. भा. – अन्य विधि कोणता अशी शंका घेऊन पुढे म्हणतात – **गान्धर्वं त्रिविधं वियात्** । ( त्रिविध ) म्हणजे स्वरादि तीन वस्तूंचे विधान ( = विधा ) ज्याचे आहे असे. **चिरंतनांच्या** मते ' विधा ' शब्द आश्रितवाचक आहे, म्हणजे ' विधा ' हा शब्द येथे प्रकार हा अर्थ व्यक्त करीत नाही. प्रकार असा अर्थ घेतल्यास ( म्हणजे स्वर, ताल व पद यांना वेगवेगळे मानल्यास ) गान्धर्वाचा व्यवहार पृथक् होईल. पण तसे नाही. याबाबतीत **विशाखिलाचार्यांचे** वचन असे आहे :– " स्वर, पद व ताल यांच्या समवायाने गान्धर्व ( सिद्ध होते ). " या श्लोकातील ' आत्म ' शब्द या तिन्ही वस्तूंचा मिश्रीभाव सुचवितो. ' पद ' हा शब्द कारण म्हणजे अवधान सुचवितो. हाच अर्थ बरोबर आहे, कारण स्वर, ताल व पद ही समतुल्य नाहीत; म्हणून अवधान ( = पद ) हा गान्धर्वाच्या अनेक अवयवांपैकी एक आहे असे समजावे. यासाठी करायचा मिश्रीभाव त्यातील एखाद्या प्रमुख वस्तूच्या आधारानेच होऊ शकतो. त्यासाठी ( ' स्वर ' हा शब्द ) पहिल्याने घालून त्याचे प्रमुखत्व सूचित केले आहे. म्हणून स्वर हे प्रधान असून ताल हा स्वरांचे साम्य करण्यास उपकारक आहे. याविषयी ' तल प्रतिष्ठाकरणे ' ( म्हणजे ' तल, ' स्थिरपणे स्थापित करणे

या अर्थी ) हे वचन प्रसिध्दच आहे. ह्या दोन्हीहून दूरचा शब्द ' पद ' हा आहे. पद - शब्दाने गान्धर्वाला आधारतेचा लाभ मिळतो. हीच गोष्ट दत्तिलाचार्यांनी अशी सांगितली आहे – ' पदस्थः स्वरसंघातस्तालेन सुमितः ' ( दत्तिलम् - श्लोक ३ ); म्हणजे तालाने मापला गेलेला स्वरसमुदाय गीताच्या शब्दांच्या ठिकाणी स्थित असतो. त्यामुळे शब्द व ताल जसे गान्धर्वामध्ये, तसेच गानामध्ये, स्वरांच्या आधारे तंताला उपयोगी पडतात, हे तात्पर्य. ( दत्तिलाच्या या श्लोकात ) ' अवधान ' असा शब्द आहे. पण अवधान हे योगरूप आहे, ते या विषयात उपयोगी नाही. नाट्याच्या पूर्वरंगात ( ना. शा. ३४.२२२ ), परिवर्तकांच्या प्रसंगी अवनद्ध वाद्यांच्या विषयात ( ना. शा. ४.३१६, ५.६३, ६४ इ. ) देवता संतुष्ट करण्याचा विधि सांगितलाच आहे; त्या विधीमुळे विघ्ने दूर होऊन सिद्धि होते. ( अर्थात आणखी अवधानाची जरूरी नाही.) या विषयी असे म्हटले आहे :– ' गीतज्ञो यदि योगेन ' इ. म्हणजे संगीतज्ञाला योगाने परमपद प्राप्त न झाले, तरी तो रूद्राचा अनुचर होऊन त्याच्या संगतीत सुखी होतो. हा आधार कोणी देतात व म्हणतात की ' गीताचा अर्थ हा शाब्दस्वरूपाचा नसल्याने अवधानाशिवाय कदापि सिद्धि मिळणार नाही. ' **लक्षणम्** म्हणजे चतुःश्रुतिक आदि ( स्वरांचे ) स्वरूप. **कर्म** म्हणजे ग्रहांशादिरूपांची योजनात्मक क्रिया, ज्यामुळे जाति वगैरेंची उत्पत्ति होते. त्याचे कुतपाशी सात्मकत्व असले तरी वीणा, शरीर व वेणु यांच्या ( स्वरांची ) आरोह - अवरोहणादिक क्रिया हाच रंगभागाचा गानवृत्तान्त होय. कंठाप्रमाणेच वेणूमध्ये वायूच्या तीव्र मंद आघाताने स्वराची उत्पत्ति होते. आरशातील प्रतिबिम्बात उजव्या-डाव्याची उलटापालट होते, त्याप्रमाणे ( शरीराशी तुलना केल्यास ) वीणेवर तार मन्द्रस्थानांचा विपर्यास दिसून येतो. ह्या गोष्टीला अनुलक्षून सांगतात – **द्व्यधिष्ठानाः स्वरा वैणाः शारीराश्च इ.** वैण ( वीणेच्या ) स्वरांचे प्राधान्य असल्यामुळे त्या स्वरांचा उल्लेख प्रथम केला आहे, अर्थात त्यांचे विधान सांगितले आहे, असा संदर्भ. ' लक्षणाने '. म्हणजे गान्धर्व - लक्षणांना अनुसरून. ॥ ११-१२ ॥

**स्वरा ग्रामौ मूर्च्छनाश्च तानाः स्थानानि वृत्तयः ।**
**शुष्कं साधारणे वणा ह्यलङ्काराश्च धातवः ॥ १३ ॥**

**श्रुतयो यतयश्चैव नित्यं स्वरगतात्मकाः ।**
**दार्व्यां समवायस्तु वीणायां समुदाहृतः ॥ १४ ॥**

**स्वरा ग्रामावलङ्कारा वर्णाः स्थानानि जातयः ।**
**साधारणे च शारीर्यां वीणायामेष संग्रहः ॥ १५ ॥**

दारवी वीणेच्या बाबतीत पुढीलप्रमाणे विषयसमूह सांगितला आहे –
स्वर, दोन ग्राम, मूर्च्छना, ताना, स्थाने, वृत्ती, शुष्क,

दोन साधारणे, वर्ण, अलंकार, धातू, श्रुती व यती,
हे विषय सदोदित स्वरगत आहेत. ॥ १३ - १४ ॥

स्वर, दोन ग्राम, अलंकार, वर्ण, स्थाने, जाती व दोन
साधारणे मिळून हा शारीर वीणेवरील ( गायनाच्या विषयांचा ) संग्रह ( जाणावा ). ॥ १५ ॥

अ. भा. – वीणेच्या स्वरांच्या प्रकारांना उद्देशून म्हणतात :– **स्वरा ग्रामौ.** इ. ही माहिती संक्षेपाने समवायाच्या रूपाने सांगण्याचा येथे उद्देश आहे. हा उद्देश स्वरगति-संबंधीचा आहे, कारण या ( संगीताचा) आत्मा स्वर हा आहे. व्यस्त आणि समस्त आदि इष्ट व उद्दिष्ट रूप स्वर हेच आहे. ' दारु ' चे अपत्य ती दाखी वीणा अर्थात वीणारूप भगवती. विशाखिलाचार्य म्हणतात – ' दारुणो ह्यसौ जाता वाक्. ' इ. ( म्हणजे ' काष्ठापासून ही वीणा उत्पन्न झाली ' इ. ). त्याप्रमाणे काष्ठमय असूनही स्वरांना आधार देणाऱ्या संघाताला वीणा हे नाव दिले जाते. त्याच प्रमाणे शरीरा- (कंठा-) मध्ये राहिलेली वाग्रूप सरस्वती तिलाहि ( शारीर ) वीणा हा शब्द लावला जातो. **मूर्च्छनाश्च** - शारीर व दारवी वीणांवरील मूर्च्छना ह्या तुल्य आहेत. **तानं** – ताना शारीर वीणेवर शक्य असूनहि सुखावह नसल्यामुळे प्रयोगाला योग्य नाहीत. त्यांचा प्रयोग अभ्यासाठी उपयुक्त आहे म्हणावे, तर वर्ज्यावर्ज्य स्वरांमुळे त्यांची सिद्धि वीणेवर होऊ शकते. कंठाने स्वरांचा प्रयोग न करू शकणाराहि स्वतःच्या मनातले स्वरविशेष वीणेवर काढू शकतो. **वृत्तयः** – धातूंच्या वृत्ती. **शुष्कं** – शुष्क ( Solo ) वादनाचा सुलभ आधारहि वीणा हाच आहे, कारण धातु ( = मिजराबचे ठोके ) व शुष्क यांचे प्रयोग वीणेवरच सुखावह होतात. **अलंकाराश्च** – अलंकारांचा विषय पुढे येईलच. सारणेत तारा चढविण्या-उतरविण्यासाठी श्रुति हा आधार असल्यामुळे ( = ' तन्मूलत्वाच ') श्रुति ह्या फक्त वीणेवरच उपयोगी आहेत. पुढे वीणेवर अमुक इतक्या श्रुतींचा अमुक स्वर अशी श्रुतींची संख्या सांगण्यात येईलच. तात्पर्य, वीणेवर सगळे स्वरगत प्रकार स्वरांच्या रमणीयत्वामुळे अभ्यास व प्रयोग या दोन्ही कामांत उपयोगी आहेत. स्वरांबरोबर राहिलेल्या शब्दात्मक ' पदा ' बद्दलहि येणेप्रमाणेच समजावे, ( दाख्यां = ) वीणेच्या ठिकाणी, असा ग्रंथाकर्त्याचा अभिप्राय असल्यामुळे. ॥ १३ - १५ ॥

**व्यञ्जनानि स्वरा वर्णाः सन्धयोऽथ विभक्तयः ।**
**नामाख्यातोपसर्गाश्च निपातास्तद्धिताः कृतः ॥ १६ ॥**

**छन्दोविधिरलङ्कारा ज्ञेयः पद-गतो विधिः ।**
**निबद्धं चानिबद्धं च द्विविधं तत्पदं स्मृतम् ॥ १७ ॥**

**ध्रुवस्त्वावाप-निष्क्रामौ विक्षेपोऽथ प्रवेशनम् ।**
**शम्या तालः सन्निपातः परिवर्तः सवस्तुकः ॥ १८ ॥**

**मात्रा प्रकरणाङ्गानि विदारी यतयो लयाः ।**
**गीतयोऽवयवा मार्गाः पादमार्गाः सपाणयः ॥ १९ ॥**

**इत्येकविंशति-विधं ज्ञेयं तालगतं बुधैः ।**
**गान्धर्व-संग्रहो ह्येष विस्तरं तु निबोधत ॥ २० ॥**

व्यंजने, स्वर, वर्ण, सन्धि, विभक्ति, नाम, आख्यात, उपसर्ग, निपात, तद्धित, कृदन्त, छन्दोविधि व अलंकार हा पदगत विधि जाणावा. ते पद निबद्ध व अनिबद्ध असे दोन प्रकारचे आहे. ॥ १६ - १७ ॥

तालासंबंधीचे विषय एकवीस प्रकारचे जाणावे, ते असे – ध्रुव, आवाप, निष्क्राम, विक्षेप, प्रवेश, शम्या, ताल, सन्निपात, परिवर्त, वस्तुक, मात्रा, प्रकरण, अङ्ग, विदारी, यति, लय, गीति, अवयव, मार्ग, पादमार्ग [ पाद भाग ( ? ) ] व पाणि. येणेप्रमाणे हा गान्धर्व संग्रह सांगितला; आता ह्याचा विस्तार ( सांगतो तो ) ऐका. ॥ १८ - २० ॥

अ. भा. विशिष्ट स्वर व ताल यांनी मापली जाणारी वस्तु ' पद ' ही आहे. त्या पदाचे विषय आता सांगतात. नंतर तालाचे विषय वेगळे सांगतील. **व्यञ्जनानि** इ. – स्वर व व्यंजने अज्झलरूपाने व्याकरणात प्रसिद्ध आहेत, ती येथे समजावी. संगीतातील स्वर हा अक्षरधर्मी असल्यामुळे पदांच्या ( = शब्दांच्या) आधारे स्वरांचा प्रयोग करावा.

अन्य विद्वान म्हणतात – व्यंजन संज्ञेने ( शुष्क गीताचे ) ' झंटुं ' वगैरे निपात हा अर्थ घ्यावा. अकारादि ( स्वर ) पाणिका-गीतांत व रक्त - गान्धारी वगैरे जातींमध्ये दृष्टोत्पत्तीस येतात.

**स्वराः** – अ, आ, इ, ई वगैरे स्वर ( = अचः ); **वर्णाः** – स्वर व व्यंजने ( = अज्झलः ) यांचा समुदाय; **सन्धयः** – शब्दांचे सन्धि; **विभक्तयः** प्रथमा, द्वितीया वगैरे ( = सुप्तिङः ); **उपसर्गाः** – प्र वगैरे; **निपाताः** – अव्यये, ही कठोर असल्यामुळे त्याज्य समजावी; तद्धित व कृदन्त ह्यांपैकी योग्य असतील ती ग्राह्य समजावी; **अलङ्काराः** – उपमा वगैरे; **अनिबद्धम्** = गद्य; त्याच्या उलट ते **निबद्ध**; **स्मृतम्** – वाचिकाभिनयात व्यंजनादि विषयांचे वर्णन केले आहे, असा भाव, परंतु यांपैकी जे विषय सांगितले नसतील, ते यथावकाश पुढे सांगतीलच. ध्रुवस्तु. इत्यादि शब्दांनी तालविषयाची सूचि सांगितली आहे. शेवटी **गान्धर्वसंग्रहो ह्येषः** ह्या शब्दांनी सांगितलेल्या स्वरादि तिन्ही विषयांचे हे ( गान्धर्वरूपाने ) एकत्रीकरण झाले, असे सुचवितात. येथे **प्रकरण** वगैरे संज्ञांनी पुढे विस्ताराने वर्ण करण्यात आलेल्या मद्रकादि गीतांच्या लक्षणांची ओळख करून दिली आहे. **निबोधत** या शब्दाने सुचवितात की मी हे जे गान्धर्वाचे अनेक विषय दिले आहेत, त्यात क्रम असा ठेवलेला नाही; त्यामुळे त्या बाबतीत येथे तुम्ही ऊहापोह करण्यात कुशल असलेली तुमची बुद्धि वापरावी. कारण येथे ग्रंथकाराने विषयांचा क्रम सांगितलेला नाही.

कसे ते पहा :– ग्रामानंतर श्रुति सांगितल्या आहेत. स्थानाच्या पुढे साधारण व जाति सांगितल्या आहेत. त्यामुळे ही क्रमवार विषयसूचि ( = उद्देश ) होत नाही. ( जे टीकाकार या संग्रहाला ) ' उद्देश ' म्हणतात, त्यांना आम्ही उत्तर देतो की अरे बाबा तुझा तो उद्देश ग्रंथकाराने नावाने सुध्दा अनुसरलेला नाही. कारण उद्देश म्हटला की त्यात प्रयोजन असते, नुसतीच यादी ( = ' लक्षणावकाश ' ) नसते. म्हणून येथे लोकांना ग्रंथातल्या विषयांची सुखाने कल्पना यावी, एवढाच ग्रंथकर्त्याचा हेतु आहे. त्यामुळे ' या श्लोकांत विषयांचा उद्देशक्रम नाही; उलट, विषयांचा क्रम आहे ' असे जे ग्रंथविरूद्ध व्याख्यान टीकाकाराने केल आहे ते अवास्तव, सदोष व असंबद्ध असून ते त्याच्या मंदबुद्धीचे फळ आहे ! तथापि स्वरांनंतर ग्राम व त्याच्या आश्रयाने राहाणाऱ्या मूर्च्छना व ताना सांगितल्या आहेत, त्यांतला क्रम ठीक आहे. तानांच्या नंतर ग्रंथात ' स्थान ' सांगितले आहे. हें स्थान म्हणजे स्वरांच्या जागा नसून तारमंद्रादि म्हणजे स्वर वरचा आहे की खालचा आहे हे दाखविणाऱ्या संज्ञा आहेत. तर मग तारमंद्रमध्य यांच्याशिवाय स्वरस्वरूपाला उपकारक ठरणारे काही कथन ग्रंथकर्त्याने ग्रंथात केले आहे किंवा नाही, हा प्रश्न आहे. पुढे शुष्कानंतर साधारण सांगितले आहे. ' शुष्क ' वादनाच्या स्वरांसाठी येथे साधारण सांगितले आहे, या म्हणण्यात काही अर्थ नाही. कारण ' शुष्क ' – वादनात अंतरकाकलींचा प्रयोग होत नसतो. गांधारनिषाद अल्प असलेल्या जातींतच त्यांचा नियोग होत असतो. दुसरे साधारण म्हणजे जातिसाधारण, अर्थात अनेक जातींत असलेले थोडेसे साम्य. येथे रूपसादृश्याचा मुद्दा आहे, त्यामुळे त्याला ' शुष्का ' त जागाच कोठे आहे ? स्वर हे श्रुतींची अपेक्षा करणारे आहेत, तर मग श्रुतींचा उल्लेख भलत्याच स्थानी का केला ? त्याचप्रमाणे शारीरवीणेच्या संबंधात तसे सांगितले आहे, पण दारवी वीणेवर तसे स्वर नसतात, इत्यादि विवेचन टीकाकारांनी केले आहे ते केवळ विसंगत आहे. ' वीणेवर श्रुतींचा उपयोग नाही ' , असे यांनीच म्हटले आहे, तर मग श्रुती सांगण्याचा उद्देश काय ? दोन ग्रामांचे भिन्नत्व दाखविण्यासाठी श्रुतींचा विषय सांगितला आहे, असे यांचे उत्तर असेल, तर मग येथे श्रुतींचे कथन विधिवतच आहे. सारांश येथे क्रमाचे समर्थन करण्याचा उद्योग करू नये. ॥ १६ - २० ॥

तत्र स्वरा :–

**षडजूश्च ऋषभश्चैव गान्धारो मध्यमस्तथा ।**
**पञ्चमो धैवतश्चैव सप्तमोऽथ निषादवान् ॥ २१ ॥**

स्वर याप्रमाणे आहेत :–
षड्ज, ऋषभ, गान्धार, मध्यम, पञ्चम, धैवत व सातवा निषाद. ॥ २१ ॥

अ. भा. आता स्वरांचा विषय सांगतात :– तत्र स्वराः इ. म्हणजे उद्दिष्ट विषय वर सांगितले, त्या पैकी स्वर आता सांगतात. ' उपताप ' व ' आक्षेप ' ह्या दोन अर्थांच्या मीलनाने स्वर हा शब्द उत्पन्न होतो. त्या अर्थाप्रमाणे – शब्द हा जिचा स्वभाव आहे अशा चित्तवृत्तीची मध्यस्थरूप स्वास्थ्याची अवस्था

सोडण्यास लावून तिला उत्तेजित करणारे ( = ' उपतापयन्तः ' ) आणि अतिशय हृद्यतेमुळे स्वतःच्या ठिकाणी खेचून स्वतःमध्ये मिळवून टाकणारे म्हणून त्यांना स्वर म्हणतात. कोणी वर्णसाम्याच्या आधारे निरूक्ति करतात, ती अशी :– ' स्वयं ' = स्वतःमध्ये = जातिरागभाषाभेदांमध्ये, ' राजन्ते ' = विराजतात ( किंवा शोभतात, चमकतात ) म्हणून स्वर. आता ठराविक असे पुढचे - पुढचे स्वर सांगतात – **ऋषभ** ः इ. ऋषभानंतर गान्धार सांगितला आहे; पण गान्धाराचा अन्तर गान्धार हा भेद आहे, तसा ऋषभाचा अन्य भेद नाही, म्हणून नुसताच ' ऋषभ ' असे म्हटले आहे. **ऋषभश्चैव, धैवतश्चैव** यांतील **चैव** या निपातांनी काकल्यन्तर स्वरांचे भेद सूचित केले आहेत; आणि काकल्यन्तर स्वरांमुळे गान्धार - निषादांचे भेद होतात हे दर्शविण्यासाठी श्लोकात **चैव** निपात ऋषभ - धैवतानंतर योजले आहेत. स्वर साधारण ते हेच, ह्याचे विवेचन आम्ही यथावकाश करूच. स्वरांच्या मध्ये राहिलेल्या निश्चित संख्येच्या श्रुतींमध्ये वायूचा थोडासा स्पर्श होतो व त्याच्या बलाने ( आपापल्या ) श्रुतिस्थानांवर स्निग्धत्व व रक्तत्व ह्या लक्षणांनी युक्त व आश्रयभूत श्रुतीला उपरंजक असा जो ( ध्वनि ) ऐकावयास येतो तोच स्वर होय, असे कित्येकांचे मत आहे; तर षड्ज हाच ( एक ) स्वर आहे, असे दुसरे म्हणतात; आणि ( श्रुतींचा ) समूह म्हणजे स्वर असे आणखी एकांचे प्रतिपादन आहे. पण श्रुतिस्थानावर अभिघात झाल्याने उत्पन्न होणाऱ्या शब्दाने प्रभावित, अनुरणनात्मक, स्निग्धमधुर असा शब्द तोच स्वर होय, असे आम्ही म्हणतो. या विषयात नारदादिकांनी स्वरांच्या नावांचे निर्वचन असे केले आहे :– " नासा, कंठ, उर, तालु, जिह्वा व दात या सहा स्थानांच्या आश्रयाने उत्पन्न होतो, म्हणून त्याला षड्ज हे नाव आहे " वगैरे ( ना. शि. १.५.७३. ) हे विवेचन निरूपयोगी असल्याने मुनींनी स्वीकारलेले नाही; कारण, वीणेवर नासाकंठादींचे अस्तित्व नसताहि तीवर षड्जादि स्वर दिसून येतात. या बाबतीत कित्येक याप्रमाणे समाधान करतात - " शारीर वीणेचे दाखी वीणा हे प्रतिबिंब आहे, म्हणून शारीर स्वरसमूह ज्या ज्या इंद्रियांमुळे उत्पन्न होतो, त्यांचे प्रतिबिंब वीणेवरहि असावयास पाहिजे. " यांचे हे म्हणणे अगदी अयोग्य आहे. आधी वीणा ही देहाचे प्रतिबिंब ही भाषाच कशी काय ? आरशात शरीराचे प्रतिबिंब पडते, त्याप्रमाणे वीणा ही शरीराचे प्रतिबिंब तर नाहीच. वीणेवर देहाचे प्रतिबिंब दाखविणारे आरशाप्रमाणे कोणतेही स्थान नाही. शिवाय बिंब-प्रतिबिंबाप्रमाणे दोन्हींचे स्वर ( एकाचवेळी ) इंद्रियग्राह्य असत नाहीत. जसा आकाशात आपल्या ध्वनीचा प्रतिध्वनि उत्पन्न होऊन तो आपणास ( आपोआप ) ऐकावयास येतो, तसे वीणेतून वाजणारे स्वर प्रतिध्वनिरूपाने अपोआप उत्पन्न होत नाहीत. सारांश शारीर स्वर वीणेच्या स्वरांत आपले प्रतिबिंब अर्पण करतात असे दृष्टोत्पत्तीस येत नाही, दोन्ही स्वरांचे स्वतंत्र अस्तित्व प्रत्यायास येते. शारीर स्वराचा अभाव असताहि वैण स्वराची प्रवृत्ति होऊ शकते, त्यामुळ वैणस्वर हे शारीर स्वरांचे प्रतिबिंब आहे, असे म्हणणे चुकीचे आहे; कारण पृथक् प्रयत्न केल्यानेच वीणेवर स्वर उत्पन्न होतात. त्याचप्रमाणे नियमानुसार तार दाबून तारेवर बोटांनी आघात केल्याने आवाज उत्पन्न होतो व त्यानंतर अनुरणनात्मक असा जो स्वर, तो उत्पन्न होतो. त्यासाठी ( वीणेत ) नासादि सहा कारणे नसतात, त्यामुळेहि प्रतिबिंबाची घटना वर्णन करणे हे खोटे आहे. शरीरात ( मंद्रतारादि ) स्थाने खालून वर असतात आणि वीणेवर वरून खाली असतात; पण **केवळ या औत्तराधर्य**-विपर्यासांच्या कारणाने वीणा ही शरीराचे प्रतिबिंब आहे, असे ठरत

नाही; मात्र शारीर स्वरांच्या अनुसरणाने ( वीणेवर ) सारणा करण्याकरिता उपयोगी असा उत्कर्षापकर्ष संभवत असल्यामुळे ( त्या दृष्टीने ) वीणेला शरीराचे प्रतिबिंब ( म्हणून कोणी एकाने ) म्हटले आहे. 'स्वरांची संख्या सात' हे वचन दर्शविते की अंतर गांधार व काकली निषाद ( हे दोन्ही ) वेगळे स्वर नाहीत. सात स्वरांचाच संभव आहे, याबद्दल पुढे खुलासा करूच. 'तत्सवितुर्वरेण्यं' हे सात वर्ण 'निगरिधमपस' ह्या ( सात) स्वरांनी पहिल्याने ब्रह्माने उत्पन्न केले, हे कारण स्वर सातच असण्याला दुसरे एकजण देतात. ह्याचा निर्णय पुढे करीत आहोत.

दुसरे कोणी श्रुतिस्वरविषयक प्रश्न असा करतात की, स्वर हे श्रुतींच्या क्रमाने अभिव्यक्त होतात म्हणून श्रुती ह्या स्वरांच्या पूर्वी सांगावयास पाहिजे होत्या. याला उत्तर :– असे होऊ शकत होते; पण केव्हा ? की, जर ध्वनिनाद हे नाव दिले जाणाऱ्या श्रुती म्हणजे नियत श्रुत्यन्तरत्वाने ग्रहण केले जाणारे स्वर असत्या तर; पण तसे नाही. कारण श्रुती जरी उच्चनीच आहेत, तरी त्या स्वरांच्या आश्रयाने राहिलेल्या आहेत असे प्रत्ययाला येत. भट्टमातृगुप्तानेहि असेच म्हटले आहे :– " समस्त श्रुतींचा विस्तार आपोआपच होतो. कसा ? तर त्यांना असलेल्या स्वरांच्या अधिष्ठानामुळे तो श्रुतिविस्तार कानाला अमृताप्रमाणे वाटतो. " ( यावर शंका :– ) श्रुतींनाच जर स्वरत्व असेल, तर मग षड्जग्रामात जो पंचम चार श्रुतींचा आहे तो मध्यमग्रामात तीन श्रुतींचा होऊनहि पंचम कसा रहातो ? तृतीय व चतुर्थ (श्रुतीवरील) दोन ग्रामांतला पंचम एकच असू शकत नाही. (दोन्ही ग्रामांतील) धैवताबद्दल हाच न्याय समजावा. तसेच अंतर व काकली हे गान्धार व निषाद कसे ?

असे म्हटले आहे की, वसंत ऋतूत कोकिळा पंचम बोलते, (ना.शि. १-५-४) इ. हे कसे ? (समाधान :-) नासाकंठादिकांच्या ठिकाणी नियत असे श्रुतीचे रूप नसते. तसे (श्रुतीचे नियत रूप असल्यास) मग सर्व (श्रुती ह्या) स्वरच होतील. श्रुतींच्या क्रमाच्या अपेक्षेमुळे स्वरांना आपल्या रूपाचा लाभ होतो, असे मानल्यास अन्योन्याश्रय दोष उत्पन्न होतो. कारण (स्वर किंवा श्रुति यांपैकी) कोणतीहि एक वस्तु अगोदर सिद्ध नाही. तर मग मानावे लागेल की केवळ ग्रामविभाग दाखविण्यासाठीच श्रुतींचे व तद्गत संवाद वगैरेंचे वर्णन करण्यात आले आहे आणि त्यामुळे श्रुतींचे कथन स्वरांनंतर करण्यात आले आहे. ह्याच कारणामुळे विशाखिलाचार्यांनी ग्रामाच्या नंतर श्रुती सांगितल्या आहेत. सामवेदात ग्रामविभाग नसल्यामुळे केवळ उच्चपणा व नीचपणा दाखविण्यासाठी श्रुतींची नावे सांगण्यात आली आहेत; 'यः सामगानां' (ना.शि. १-५-१) इत्यादीने विभिन्न स्वरांच्या दीप्ता, आयता वगैरे पाच प्रकारच्या श्रुती, विशेष युक्तीने साध्य होणाऱ्या अशा सांगितल्या आहेत.

(शंका) :- दुसरे एकजण म्हणतात :- 'श्रुतींना स्वरत्व नाही, त्यामुळे श्रुतिक्रमाने अभिव्यक्त होणाऱ्या स्वरांचा निर्देश प्रथमतः करणेच योग्य आहे.' (समाधान :-) येथे एक गोष्ट सांगावी लागेल की श्रुति या शब्दाने जर वायूशी संयोग पावणारे विशिष्ट स्थान विवक्षित असेल, तर मग 'व्यस्तानि तानि षट्षष्टिं विद्यात्' [म्हणजे (सर्व मिळून) 'वेगवेगळया त्या (श्रुती) सहासष्ट जाणाव्या'] या वचनानुसार यांचे हे म्हणणे अयोग्य ठरते, कारण कोणते तरी एक स्थान स्वर मानले जाते. स्थानाला रूक्षता किंवा स्निग्धता

असा धर्म नसतो. वायु व त्याचा आघात यांनाहि हाच न्याय लागू पडतो. म्हणून 'श्रुतींकडून' ह्या शब्दाने विशेष स्थानातील वायूच्या संयोगाचा परिणाम विवक्षित नाही. (स्थानविशेष व परिणाम हे स्वरांच्या ठिकाणी असतात म्हणून) श्रुतींमधील रंजकता हा धर्म तोच स्वर होय. वर (टीकाकाराने) पंचम-धैवताची अनुपपत्ति दाखविली आहे, तीहि याच प्रकारची (अर्थात अयोग्य) आहे. चतुर्थ स्थानाच्या संयोगाने उत्पन्न झालेल्या ध्वनीचा जो धर्म तो तृतीय स्थानाच्या संयोगाने उद्‌भूत होणाऱ्या (स्वराच्या) धर्मासमान असू शकणार नाही, कारण दरेकाच्या धर्माची नित्यता ठरलेली आहे. एकाचा धर्म तो दुसऱ्याचा धर्म होत नाही. ह्या स्पष्टीकरणाने काकल्यन्तरांचेहि व्याख्यान (आपोआपच) केले गेले. 'कोकिलो वक्ति पञ्चमम्' इ. हे म्हणणे येथे अप्रस्तुत आहे.

(शंका :-) पण त्याला हवे असलेले स्थान जरी तेथे नसले तरी त्या स्थानापासून उत्पन्न होणाऱ्या शब्दाचा जो धर्म असतो, तो तर राहीलच; कारण धर्मीच जेव्हा तेथे नसेल, तेव्हाच (त्या धर्माच्या) कारणांचा अभाव होणार आहे. (समाधान :-) हे म्हणणे निरर्थक आहे; कारण आघातानंतर उत्पन्न होणाऱ्या ध्वनीनंतर जो दुसरा अनुरणनात्मक ध्वनि उत्पन्न होतो, तो मात्र नैसर्गिकरित्या स्निग्ध व मधुर असा असतो. (१) दोरी व तार किंवा (२) दगड व काशाचे भांडे ह्यांच्यावर आघात केल्याने त्या प्रत्येकातून निघणाऱ्या आवाजाचे गुणावगुण स्पष्ट ध्यानात येतात. तेव्हा स्वर नामक ध्वनीच्या उत्पत्तीसाठी (अनेक श्रुतींच्या समुदयाची अपेक्षा आहे, हे म्हणणे ठीक दिसत नाही; कारण प्रत्यक्ष प्रयोगान्ती स्वर हा (श्रुतींच्या) समुदायाहून निराळा आहे असे अनुभवास येते. म्हणून चतुर्थ स्थानाच्या संयोगाने उत्पन्न झालेल्या शब्दाने (= नादाने) जो (स्वर) उत्पन्न होतो, तोच तृतीय स्थानावरील शब्दाने (= नादाने) उत्पन्न होतो, केवळ उच्चस्थानावर उत्पन्न झाल्याकारणाने त्याचे उच्चत्व दिसून येते. उदाहरणार्थ :- मन्द्रषड्‌जापेक्षा मध्यषड्‌ज व तारषड्‌ज यांचे उच्चत्व अनुभवास येते. त्याच प्रकारचे अनुरणन जसे कोकिलादि वीणांच्या शब्दाने (= नादाने) उत्पन्न होते, तसेच वीणेच्या तारा व अंगुली यांच्या संयोगाने किंवा मल्लक वीणेवर गजाने केल्या जाणाऱ्या आघातामुळे उत्पन्न होणाऱ्या नादानेहि उत्पन्न होते, असे म्हणणे योग्य होईल.

(शंका :-) परंतु भिन्न वस्तूंवरील आघातादि भिन्न कारणांनी उत्पन्न होणाऱ्या त्या त्या प्रकारच्या भिन्न ध्वनींमुळे एकाच प्रकारचा अनुकरणानात्मक ध्वनि उत्पन्न होतो, हे म्हणणे कसे काय? (समाधान :-) तसे नव्हे. कारणाचा विशेष नियम (गुण) कार्यात दिसून येत नाही; उदाहरणार्थ :- लोखंडाचा तुकडा व गार किंवा अरणि आणि विद्युत् इत्यादी भिन्न कारणांनी उत्पन्न होणारा अग्नि एकच प्रकारचा धूर उत्पन्न करतो. केळीचे बीज किंवा कंद यांपासून एकच प्रकारचे केळीचे झाड उत्पन्न होते. तात्पर्य हे की कारणांची भिन्नता असूनहि त्यामुळे कार्य मात्र एकाच प्रकारचे होते, असे दिसून येते. विंचू वगैरेच्या उत्पत्तीतहि हेच दिसून येते. तसे पाहिले तर, भिन्न अग्नींपासून उत्पन्न होणाऱ्या अनेक प्रकारच्या धुरांतहि सूक्ष्म भेद असतो. त्याचप्रमाणे हा वीणेचा स्वर आहे, हा मल्लकाचा स्वर आहे, अशा प्रकारे निरनिराळ्या वाद्यांचा वेगवेगळा स्वर ओळखता येतो, परंतु षड्‌जाच्या दृष्टीने त्यात भिन्नता नसते. तसेच एकाद्या गायकाचा स्वर अनुरणन उत्पन्न करीत नाही, त्यामुळे तो जरी तेच स्वर गातो, तरी त्याला अपरिपूर्ण असे

म्हणतात. आघातजन्य ध्वनीचे अनुरणन अधिक तीव्र असल्यास ध्वनीची रक्तता अतिशय असते, मध्यम असल्यास मध्यम व नसल्यास याच्या विपरीत समजावे. सहासष्ट श्रुतिस्थानांतून (= तिन्ही सप्तकांत) वायूच्या आघाताने उत्पन्न होणारा ध्वनि अनुस्वाररूप स्वराला उत्पन्न करीत असल्यास (गायकाचा तो आवाज) परिपूर्ण व उत्कृष्ट शारीर समजावा. यात काही कमी अधिक असल्यास तो अवाज निकृष्ट मानावा लागेल. या विवेचनाने कारणांचा अभेद जाहीर होत असल्यामुळे यातील इतरेतराश्रय दोषाचेहि निराकरण झाले आहे.

स्वरांसाठी श्रुती सर्वथा उपकारी आहेत, (असे कोणी म्हणत असेल) तरी दोन्ही ग्रामांतील भेदांची कल्पना येण्यासाठी त्या ग्रामांच्या संबंधामुळे व ग्रामांना उपयोगी असल्यामुळे श्रुतींचा उल्लेख ग्रामांनंतर करण्यात आला आहे. ध्वनीच्या क्रमाची अपेक्षा न ठेवता शरीराचा (गाण्याचा) प्रयत्न होत नसतो. गायिल्या जाणाऱ्या (स्वरांचा) एक क्रम हा पहावाच लागतो; कारण स्वर हे लौकर (एकामागून एक) उत्पन्न होत असतात. स्वरांचा (क्रमयुक्त) आरोहावरोह स्वरज्ञ (शिक्षक) शिकवितो. (स्वरांचा) अभ्यास करण्याच्या कालात वीणेच्या तारांना चढविण्या-उतरण्याचे व वादि - संवादिरूप स्वर उत्पन्न करण्यास समर्थ अशा नादांच्या विशेष उत्पत्तिस्थानाचे ज्ञान विद्यार्थ्याला प्राप्त होते. (स्वरांच्या) उत्कर्षापकर्षाच्या स्थानांतील फरक कळल्यामुळे कर्णेन्द्रियाद्वारे स्वर ओळखण्याची योग्यता प्राप्त होते. परमाणुस्थानाएवढी सांगितलेली एक श्रुति ओळखली जात असल्यामुळे दत्तिलाचार्यांनी सुद्धा 'ध्वनि' शब्दाने त्यांची स्थाने, 'षड्जत्वेन गृहीतो यः षड्जग्रामे'' (द. २२) [म्हणजे षड्जग्रामात जो (ध्वनी) षड्ज म्हणून घेतलेला असतो.] या वचनाने सांगितली आहेत.

श्रुतींचे निदर्शन वीणेवर स्पष्ट होते. षड्जग्राम व मध्यमग्राम या दोन ग्रामांतील क्रमोपक्रमयुक्त पंचमस्वराच्या आधारे (= 'आशयेन') (बावीस) श्रुती दाखविल्या आहेत. प्रयत्नाने कोणत्या तरी स्थानावर आघात केला गेल्यानंतर त्या आघातामुळे एक ध्वनि व त्या ध्वनीपासून दुसरा ध्वनि (या परंपरेने उत्पन्न होणाऱ्या) स्वरामध्ये त्या स्वराच्या (मागल्या श्रुतीच्या) स्थानाचा (ध्वनी) जर उत्पन्न झाला तर त्या दोन ध्वनींचा संकर होईल. मागच्या व पुढच्या स्वरांच्या स्थानांचा संकर झाला असता स्वरगत संकीर्णभाव उत्पन्न होईल. स्वरगत (श्रुतींच्या ध्वनींच्या मिश्रणाने) संकीर्णता निर्माण होईल, ती होऊ नये व स्वरांच्या ध्वनीच्या विभागांचा (स्पष्टपणे) लाभ व्हावा, यासाठी (दोन स्वरांच्या मध्ये कमीत कमी असा अर्जनीय भाग ठेवला गेला पाहिजे, ह्या हेतूने (कमीत कमी श्रुत्यन्तराच्या अशा) द्विश्रुतिक स्वराचे अस्तित्व (= सम्पत्ति) मानले गेले आहे. दोन (श्रुती–) स्थानांच्या व्यवधानामुळे त्रिश्रुतिक स्वराची उत्पत्ति व तीन स्थानांच्या व्यवधानामुळे चतुःश्रुतिकाची उत्पत्ति झाली. त्यापेक्षा जास्ती म्हणजे चार (श्रुति–) स्थानांच्या व्यवधानासाठी अतिप्रयत्न करावा लागेल व त्यामुळे बेसुरेपणा उत्पन्न होईल म्हणून पंचश्रुतिक वगैरे स्वरांचा संभव (ठेवलेला) नाही. मात्र द्विश्रुतिक गान्धार-निषादांचा उत्कर्ष प्रत्येकी दोन श्रुतींनी होत असतो. (स्वरांच्या) एक श्रुतीच्या उत्कर्षाने स्थानांचे सांकर्य व त्यामुळे स्वरांचे सांकर्य होण्याचा प्रसंग येत असल्यामुळे, तसा उत्कर्ष संगितलेला नाही. चार श्रुती, तीन श्रुती व दोन श्रुती अशा गणनाक्रमाने स्वरांच्या

श्रुतिसंख्या सांगितल्या आहेत. षड्जग्राम षड्जप्रधान असून त्यातील स्वरांच्या श्रुतींची संख्या चार, तीन, दोन इत्यादी प्रमाणे व स्वरांचा क्रम सरिगमपधनि असा आहे. मध्यमग्रामिक स्वरांच्या श्रुती चार, तीन, चार, इत्यादि व क्रम मपधनि आदि या प्रमाणे समजावा. तसेच (ग्रामाचा) आद्य स्वर पूर्ण असल्याने चतुःश्रुतिक असतो. त्याच्या आधारे (अन्य स्वर) उत्पन्न होतात व पुन्हा प्रकृतिभूत अशा पूर्व (स्वराच्या) रूपाच्या स्पर्शाने (सर्व मिळून मूळ स्वर चार) स, रि, ग, म हे उत्पन्न होतात. त्याच रीतीने वरच्या स्थानाच्या स्पर्शाने पधनिसं हे स्वर उत्पन्न होतात; त्यापैकी केवळ (तार) षड्ज हा द्वितीय (=तार) स्थानाला स्पर्श करतो. हेच स्वर मंद्र स्थानालाहि स्पर्श करणारे (= मंद्र स्थानात) असतात, त्याचप्रमाणे कंठ–स्थान (हे मध्य सप्तकाचे) व शिर (हे तार सप्तकाचे) जाणावे. ह्या सर्व स्वरांत सर्व प्रकारे तद्रूपतेच्या आधारे अंशादि नियम सांगण्यात आले आहेत. त्या त्या स्थानातील स्वरांच्या सादृश्यावरून (स्वरांचे परस्पर) संवादस्वरूप पुढे सांगण्यात येईल. वस्तुस्थिति अशी असल्यामुळे तत्त्वतः (मूळ) स्वर तीनच आहेत :- स, रि, ग व प, ध, नि. मध्यम हा (दोन्ही त्रिकांच्या) मधोमध असा ध्रुवकस्थानीय आहे. चतुःश्रुतिक स्वर उच्चत्वामुळे उदात्त, द्वि श्रुतिक नीच असल्यामुळे अनुदात्त आणि या दोघांचा मध्यवर्ती व उदात्त-अनुदात्तांचा समाहार असा जो त्रिश्रुतिक स्वर तो स्वरित जाणावा. स्वरित स्वराच्या ठिकाणी श्रोत्रिय हे कंपितत्वाचा व्यवहार करतात. याच ग्रंथात पुढे अलंकाराच्या विषयात त्रिश्रुतिक स्वराचे कंपन सांगण्यात येणारच आहे. अशा प्रकारचा 'कंपित' हा स्वर वरच्या (चतुः श्रुतिक) व खालच्या (द्विश्रुतिक) स्वराला स्पर्श करीत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी स्वरित होण्याची क्षमता आली आहे. चतुःश्रुतिक स्वराला वरची जागा (स्पर्श करण्यासाठी) नसते आणि द्विश्रुतिक स्वराला खालची जागा (स्पर्श करण्यासाठी) नसते, त्यामुळे कंप होण्याचा त्यांना मार्गच कोणता? ॥ २१ ॥

**चतुर्विधत्वमेतेषां विज्ञेयं गानयोक्तृभिः ।**
**वादी चैवाथ संवादी विवादी चानुवाद्यपि ॥ २२ ॥**

गायन - (वादन) - प्रयोग - करणाऱ्यांनी या (सात स्वरां) चे वादी, संवादी, विवादी तसेच अनुवादी असे चार प्रकारचे स्वरूप जाणावे ॥ २२ ॥

अ.भा. - आता (गायन वादनाच्या) सर्व प्रयोगात सर्वसाधारण अशा स्वरांची योजना जाणण्यासाठी त्यांचे चार भेद दर्शविण्यास प्रारंभ करतात :- **चतुर्विधत्वमेतेषाम्.** इ. या श्लोकातील 'एव' शब्दाने (स्वरांचा) हा शास्त्रोक्त प्रयोग असल्याचे दर्शवितात; **च** शब्दाने वादी स्वरांच्या मागाहून संवादी स्वरांचा संभव दर्शवितात. **एव** शब्दाने संवादी स्वरांचा संभव निश्चित होतो. **अथ** शब्द आनन्तर्यद्योतक असून त्याने संवादी स्वरांचा क्रम वादी स्वरानंतर येतो, असे सुचवितात. **विवादी च** या शब्दातील **'च'** काराने विवादी स्वरांविषयी अवज्ञा सूचित केली आहे. **अनुवाद्यपि** यातील 'अपि' शब्दाने अनुवादी स्वरांचे अस्तित्व संवादी स्वरांच्या धर्मावर अवलंबून असते, **असे सुचविले आहे.** यामुळे अनुवादीचे कथन सर्वांच्या शेवटी केले

आहे. त्याचा आशय असा की, अनुवादी हा वादी व संवादी (या दोन्ही) स्वरांचे अनुसरण (= 'अनुलपन') करतो, म्हणून अनुवादी स्वरांचा प्रयोग जास्त केला जात नाही. ॥ २२ ॥

**तत्र यो यदांशः स तदा वादी। ययोश्च नवकत्रयोदशकमन्तरं तावान्योन्यं संवादिनौ। तद्यथा षड्ज - पञ्चमौ, ऋषभ - धैवतौ, गान्धार - निषादवन्तौ, षड्ज - मध्यमाविति षड्जग्रामे। मध्यमग्रामेऽप्येवमेव। षड्ज - पञ्चम - वर्जं पञ्चमर्षभयोश्चात्र संवादः।**

अत्र श्लोक :-

**संवादो मध्यमग्रामे पञ्चमस्यर्षभस्य च।**
**षड्जग्रामे तु षड्जस्य संवादः पञ्चमस्य च॥ २३॥**

या (सात स्वरां-) पैकी जो ज्यावेळी (एकाद्या जातीचा अगर रागाचा) अंश केला जातो त्या वेळी तो (त्या जातीचा किंवा रागाचा) वादी होतो. जे दोन स्वर एकमेकांपासून नऊ किंवा तेरा श्रुतींच्या अंतरावर असतात, ते परस्पर संवादी (म्हटले जातात); ते याप्रमाणे :- षड्ज व पंचम; ऋषभ व धैवत, गान्धार व निषाद आणि षड्ज व मध्यम, (ह्या संवादी जोड्या) षड्ज ग्रामात (समजाव्या). मध्यमग्रामातहि ह्याच प्रमाणे (समजावे; पण थोडा फरक आहे, तो असा की, मध्यमग्रामात पंचम हा एक श्रुति उतरा असतो, त्यामुळे) मध्यमग्रामात षड्ज व पंचम यांचा संवाद होत नाही; (त्या ऐवजी) ऋषभ व पंचम या दोहोंचा संवाद होतो.

एतद्विषयक श्लोक असा आहे :-

" मध्यमग्रामात पंचम व ऋषभ यांचा संवाद आहे. (तर)
षड्जग्रामात षड्ज व पंचम यांचा संवाद होत असतो" ॥ २३ ॥

अ.भा. - (शंका :-) प्रयोगात्मक रागधर्म म्हणजे ग्रह-आदि त्याचप्रमाणे अल्पत्व-बहुत्व वगैरे आहेत, (म्हणून . . . . . . ग्रहस्वरासंबंधीचे भेद इत्यादींचे वर्णन येथे करावयास पाहिजे.) (समाधान :-) तेच (ग्रंथकार) करीत आहेत. (जाति व राग यांचे) ग्रह, न्यास व अपन्यास बहुतेक करून (त्यांचा) वादी स्वरच असतो. शुद्ध जातीची लक्षणे सांगताना **स्वस्वरांशग्रहन्यास** आदि नियम आम्ही स्पष्ट करणार आहोत. विवादी स्वरांमुळे षाडव-ओडव प्रकार व अल्पत्व होते. बहुत्व हे संवादी स्वरांमुळे होते आणि तारमंद्र-गति ही न्यासावर अवलंबित असते.

(शंका :-) तुमचे हे म्हणणे खोटे आहे. शुद्ध जातींत असे होत असेल; परंतु विकृत जातीत (='अन्यत्र') ह्याचा अभाव असल्यामुळे (हे अयोग्य) कथन येथे का केले ? अनुवादी हे सर्वत्र (संवादाच्या) सीमा आहेत, हे अवश्य सांगावयास पाहिजे होते. तसेच ग्रहस्वर खास करून सांगावयास पाहिजे; कारण त्याच्या शिवाय रागाची कोणतीच क्रिया सुरू होत नाही. (समाधान :-) उच्च संगीतासाठीचे हे नियम सर्वसामान्य योजनेसाठी उपयुक्त म्हणून सांगत आहे. (तसे पाहिले तर) ग्रहापन्यासादि नियम ज्यांना लागू नाहीत. अशा भाषारागांचा अंतर्भावहि जातींमध्येच होतो. कोठल्याहि (जातीत अथवा रागात) ज्या एका

स्वराचा वारंवार उच्चार केला जातो तो वादी, त्या वादी स्वराचे अनुसरण करणारा तो संवादी, संवादीचे अनुवदन करणारे अनुवादी व ज्यांचा किंचित प्रयोग केला जातो असे स्वर विवादी असतात. अशा प्रकारे (या स्वरांच्या अशा तऱ्हेच्या प्रयोगामुळे) रागाचे स्वरूप तयार होते आणि रागाची अभिव्यक्तिहि होते. उदाहरणार्थ - ''साधपा पसपा सनिरिपा सनिसास मासासं पापासा धनि निरी-निनीसारि'' ह्या (स्वर विस्तारात) षड्ज वादी असून गान्धार-निषाद संवादी आणि मध्यम वगैरे अनुवादी होतात, तेव्हा त्यामुळे मालवकैशिक राग अभिव्यक्त होतो. (वास्तविक) हेच (म्हणजे ही योजना रागाच्या) प्रयोगाचे सर्वस्व आहे. (जाती-रागांतील) ग्रहादींची ही विशिष्ट योजना (= नियम) केवळ एक प्रकारच्या अदृष्टाच्या (म्हणजे परिणामाच्या) सिद्धीसाठी आवश्यक आहे, तीच सांगत आहोत.

आता वादी स्वराचे लक्षण सांगतात :- **यो यदांशस्तदा वादी इ. यदा** म्हणजे प्रयोगाच्या वेळी (जास्त) बोलत असल्यामुळे स्पष्टपणे भासमान होत असतो, तो स्वर वादी होय . . . . . याचे अधिक उच्चारण केले जाते त्यामुळे हा 'बोलतो' असे म्हणावयाचे असते; शिवाय या वादी स्वराच्या आधारेच तारमंद्रादि व्यवस्था होत असते. हे लक्षण वादीच्या या गुणामुळे येथेच सूचित केले गेले आहे. अंश हा वादीचा (पर्याय) शब्द आहे, असे दुसरे म्हणतात. ह्या मताला आधार म्हणून अन्य विद्वान 'यो यदांशं स्पृशति' हा पाठभेद स्वीकारतात, ते चुकीचे आहे; कारण अंश हाच वादी होय, असे दत्तिल वगैरेंनी म्हटलेच आहे. (द. १८) अंशाचे निराळे लक्षण उपयोगी नाही, असे तथेच म्हटले आहे . . . . . . . . हा निर्देश भावप्रधान समजावा.

संवादीचे लक्षण सांगतात - नवत्रयोद्शकमन्तरम् इ. या लक्षणाने स्वर निर्दिष्ट केले आहेत. दुसरे विद्वान म्हणतात - 'येथे नऊ व तेरा या शब्दांनी आठ व बारा समजावे.' म्हणजे आठ व बारा श्रुतींचे अंतर ज्या दोन स्वरांमध्ये आहे, (मध्ये आठ वा बारा श्रुती सुटल्या आहेत) ते दोन स्वर परस्परांचे **संवादी** समजावे. परंतु उपाध्याय (गुरूजी) म्हणतात - अन्तरं म्हणजे (दोन स्वरांमधील) अंतराल नव्हे, तर (स्वरांचे) स्वरूप, अर्थात ज्या (एका) स्वराचे स्वरूप नऊ श्रुतींचे आहे आणि (ज्या दुसऱ्या) स्वराचे स्वरूप तेरा श्रुतींचे आहे, ते दोन स्वर परस्पर संवादी होत. जसे (षड्जापासून पुढच्या षडजापर्यंत श्रुतींची गणना करताना) षड्जाच्या पुढच्या (= 'अनन्तर') तीन श्रुती व त्या पुढील स्वरांच्या मधल्या (= 'अन्तर'-) श्रुती धरून षड्ज हा बावीस श्रुतींचा आहे असे म्हणतात, त्याच प्रमाणे येथे समजावे. अर्थात या प्रमाणे नवश्रुति, त्रयोदशश्रुति (म्हणावयाचे).

(शंका :-) असे जर मानले तर मग (स्वर हा) चार श्रुतींपेक्षा जास्त श्रुतींचाहि असतो. असे मानावे लागेल. जास्त काय सांगावे, पण षड्जापासून निषादाची गणना केली तर तो अठरा श्रुतींचा म्हणावा लागेल.

(समाधान :-) असे नाही, कारण स्पर्श करणाऱ्या वायूच्या आघातामुळे उत्पन्न झालेल्या नादाच्या विभागांचा उपयोग (स्वरोत्पत्तीसाठी होत असतो.) त्यामुळे स्वराला उत्पन्न करणाऱ्या तेवढ्याच ( त्या स्वराच्या) श्रुतींच्या संख्येचा नियम सांगण्यात येतो. निरन्तर अशा = (जवळजवळच्या) ध्वनिविभागांचे

श्रवण केले, तर बेसुरे स्वर ऐकावयास येतील, त्यामुळे 'तीन - श्रुति - ऋषभ' इत्यादी म्हणतात, तिसरी श्रुति (म्हणजे) ऋषभ (असे म्हणत नाहीत). या विषयात **विशाखिलाचार्य** वगैरेंनी सांगितले आहे की :- स्वसंवेद्ये परमे श्रुतिधाम्नि समवधानं जपवद्दीयमानं विशिष्टादृष्टाय प्रयोक्तुर्भवति म्हणजे (प्रयोक्त्याने) स्वसंवेद्य अशा परमश्रुतिधामामध्ये (स्वरामध्ये) जपक्रियेप्रमाणे तल्लीनता ठेवली असता (योग्य स्थानावर स्वर लागतो व तो) त्या प्रयोगकर्त्याला विशिष्ट अशा अदृष्टाचा लाभ देतो. याचप्रमाणे **भट्टतोत** यांनी म्हटले आहे :- "श्रुतिः स्वरः (स्वरैः ?) स्वसंवेद्या म्हणजे श्रुति (स्वरांनी ?) स्वसंवेद्य आहे" इ. त्यामुळे गायनामध्ये (त्यांचा) सर्वत्र स्वरूपाभास होतो. आणखी म्हटले आहे :- 'श्रूयमाणास्तु गृह्यन्ते गम्भीरा इव', म्हणजे 'ऐकले असता गंभीर असे वाटतात' (तात्पर्य) स्वर हा त्याच्या अवयवांनी(तयार) होत नाही, श्रुतींच्या संचयानेहि एकदम (= 'यौगपद्याभावात्') उत्पन्न होत नाही. (श्रुतींच्या) क्रमिकत्वातहि नैरन्तर्य असते, (त्यामुळे त्या त्या स्वराच्या श्रुती) जलदीने व सर्व एकदम लागत नाहीत, तर क्रमाने लागणाऱ्या श्रुतींनी उत्पन्न होणाऱ्या संस्कारविशेषाने अन्य (अन्त्य ?) श्रुतिस्थानी स्वरांचा उदय होतो. ते असो, आता आपल्या विषयाकडे वळू.

उल्लंघनीय व स्वीकारणीय (अशा दोन्ही तऱ्हेच्या) श्रुतींच्या अपेक्षेने नवत्रयोदश श्रुती ह्या (संवादी) स्वररूप होतात, हे मागे सांगितले. 'अन्योन्यस्य' ह्या वचनाने अशा अंतरावरील वाटेल त्या दोन स्वरांचा संवाद होऊ नये असे सुचवितात म्हणून समानश्रुतिक असलेले स्वरच संवाद करतात व तेच (परस्परांचे) संवादी असतात, असा अर्थ घ्यावयाचा आहे. वीणेवर षड्जाच्या वगैरे स्थानांवर अंगुली दाबून (तारेवर) आघात करून (संवाद) प्राप्त करून घेण्याचा व्यवहार आहे. त्यामुळे संवादी स्वरांचा कधीहि लोप करू नये. अशा प्रकारे ही संज्ञा सार्थ आहे, कारण स्वरांचा परस्पर संवाद होतो, श्रुतींचा नव्हे. उदाहरणार्थ, मध्यम व निषाद यांचे (परस्पर) नवत्रयोदश अंतर असताहि त्यांचे संवादित्व नाही; त्यामुळे षड्जमध्या जातीत मध्यम हा अंश असता तिचे षाडव रूप होण्यासाठी निषादाच्या लोपाचा अपवाद येत नाही.[६]

(आक्षेप :-) पण (संवादी ह्या) संज्ञेमुळेच (जर या) लक्षणाचा लाभ हातो, तर मग (म-नि वगैरेंचा संवाद का होऊ नये ?) (समाधान :-) तसे होत नाही; कारण तसे होऊ शकले असते, तर षड्जग्राम व मध्यमग्राम यांचेपैकी कोणत्याहि ग्रामात स-प, रि-ध यांचा आणि साधारण - स्वरांच्या प्रयोगात नि-स आणि ग-म यांचा संवाद होण्यास काहीच हरकत नसती. म्हणून दोन्ही (समश्रुतिक स्वरांचा) संवादीपणा हे (ग्रंथवचन) दाखविते. हाच अभिप्राय प्रगट करण्यासाठी स्वमुखाने उदाहरणे देतात :- **यथा** इत्यादी. स-म, स-प, रि-ध, ग-नि, ह्या षड्ज ग्रामातील संवादी जोड्या आहेत.

(शंका :-) अन्यत्र (= मध्यम ग्रामात) रि-ध-प (= संवादी आहेत) हे सांगावयास पाहिजे होते, ते सोडून रि-ध अशी गणना का केली ? (समाधान :-) **यथा** ह्या आपल्या वचनाच्या सिद्धीला योग्य अशीच उदाहरणे देण्यासाठी(रि-ध अशी गणना केली). सांगण्याचे तात्पर्य की, (समश्रुतिक अशा) उभय स्वरांकडूनच परस्पर संवाद केला जातो, आणि कोणत्याहि प्रकारे हा संवादिक्रम लुप्त होणार नाही, असा प्रयत्न करणे गान्धर्व संगीतात आवश्यक आहे. याच कारणाने काकल्यन्तर स्वरांच्या प्रयोगात सुद्धा षड्ज

आदि स्वर बेसुरे (= 'श्रुत्यपहार:') न झाले पाहिजेत. म्हणूनच (प्रयोगात) त्या स्वरांचे अल्पत्व सांगितले आहे. जेव्हा ग-नि स्वरांचा साधारण प्रयोग केला जातो, तेव्हा ते षड्ज - मध्यमांच्या आत गेल्यासारखे (= 'षड्जमध्यमान्तर्गमनमिव तयो:') वाटतात. अशा प्रसंगी गायनात साधारण स्वरांच्या योगे जेव्हा स्वरसंचार होतो, तेव्हा ऐकावयास येणाऱ्या स्वरांपैकी कोणी एखादाच स्वर संवादी असतो. संवादी स्वरांचे अनुलपन अंश स्वराच्या धर्माने उपलब्ध होत असते. ते संवादी अंतर साधारणप्रयोगात लुप्त होत असते. षड्जादि स्वरांच्या (संवादींची) बाबतहि अशीच आहे; कारण षड्ज अंश असतो तेव्हाहि पंचमाच्या लोपामुळे ओडव रूप होऊ शकते. याच कारणाने बिन्दु (धातूच्या) प्रयोगात षड्ज व मध्यम . . . . . यांचे निषादाच्या तारेवर एकत्र वादन होत नाही, कारण त्यांचे (येथे) विसंवादित्वच असते. (?) **यथा** असे म्हणून पुढे (संवादी स्वरांची उदाहरणे देण्यासाठी तशा जोड्यांची गणना केली आहे. अभियुक्ता: म्हणजे हेच संवाद योग्य आहेत [७] ॥ २३ ॥

**विवादिनस्तु ते येषां द्विश्रुतिकमन्तरं, तद्यथा - ऋषभ - गान्धारौ, धैवत - निषादौ ।**
**वादि - संवादि - विवादिषु स्थापितेषु शेषास्त्वनुवादिन: । [अनुवादि - संज्ञका:**
**यथा - षड्जस्यर्षभ - गान्धार - धैवत - निषादा:, ऋषभस्य मध्यम - पञ्चम - निषादा:,**
**गान्धारस्यापि मध्यम - पञ्चम - धैवता:, मध्यमस्य धैवत - पञ्चम - निषादा:,**
**पञ्चमस्य धैवतस्य षड्ज - मध्यम - पञ्चमा: षड्जग्रामे । मध्यमग्रामेऽपि मध्यमस्य**
**धैवत - निषादर्षभ - षड्ज - गान्धारा:, पञ्चमस्य धैवत - निषादर्षभ -**
**गान्धारा:, धैवतस्य षड्जर्षभगान्धारा:, निषादस्य षड्जर्षभौ, षड्जस्यर्षभगान्धारौ ॥]**
**तत्र वद्नाद्वादी, संवदनात्संवादी, विवदनाद्विवादी, अनुवदनादनुवादीति ।**
**एतेषां स्वराणां न्यूनत्वमधिकत्वं वा तन्त्र्युपवादन - दण्डेन्द्रिय - वैगुण्यादुपलभ्यते ।**
**स्वर - विधानमेतच्चतु - र्विधत्वमिति । अथ द्वौ ग्रामो षड्जग्रामो मध्यमग्रामश्चेति ।**
**अत्राश्रिता द्वाविंशति - श्रुतय: स्वर - मण्डलसाधिता: ।**

**तद्यथा –**

**तिस्रो द्वे च चतस्रश्च चतस्रस्तिस्र एव च ।**
**द्वे चैवाद्ये चतस्रश्च षड्जग्रामे भवेद्विधि: ॥ २४ ॥**

द्विश्रुतिक अंतरावरील (म्हणजे ज्या दोन स्वरांमध्ये एक श्रुति सुटी आहे ते) स्वर (परस्परांचे) विवादी होत, ते याप्रमाणे :- ऋषभ - गान्धार व धैवत - निषाद.

वादी, संवादी व विवादी स्थापित केल्यावर, बाकीचे राहिलेले स्वर ते अनुवादी होत. [षड्जग्रामातील अनुवादी स्वर याप्रमाणे आहेत :- षड्जाचे अनुवादी रि, ग, ध, नि; ऋषभाचे म, प, नि; गान्धाराचे म, प, ध; मध्यमाचे प, ध, नि; पंचमाचे त्याच प्रमाणे धैवताचे स, म, प.

मध्यमग्रामात मध्यमाचे अनुवादी - **स, रि, ग, ध,** नि; पंचमाचे रि, ग, ध, नि; धैवताचे स, रि, ग; निषादाचे स, रि; व षड्जाचे **रि, ग.]**

(वादी वगैरे संज्ञांची व्युत्पत्ति अशी आहे :-) 'वदना' मुळे वादी, 'संवदना' मुळे संवादी; 'विवदना' मुळे विवादी; 'अनुवदना' मुळे अनुवादी.

ह्या स्वरांचा कमीजास्तीपणा (बेसुरेपणा) हा वीणेच्या तारा, खुंट्या, दांडी, इन्द्रिय इत्यादींत दोष असल्यामुळे उत्पन्न होतो. तर ह्याप्रमाणे हे चार प्रकारचे स्वरविधान होय. ग्राम दोन आहेत. षड्जग्राम व मध्यमग्राम ह्या ग्रामांच्या आधाराने सात स्वरांच्या एका मंडळात बावीस श्रुती सिद्ध होतात, त्या ह्याप्रमाणे :-

तीन, दोन, चार, चार, तीन व दोन आणि चार हा आद्य षड्जग्रामातील (श्रुतींचा) विधि होय ॥ २४ ॥

आता विवादी स्वरांचे लक्षण सांगतात :- विवादिनस्तु ते इ. अन्तर्गत स्वरूपाप्रमाणे (ग-नि हे द्विश्रुतिरूप स्वर आहेत, त्यामुळे) द्विश्रुतिक गान्धार व निषाद हे अन्य सर्व स्वरांचे विवादी आहेत, हे दर्शविण्यासाठी येथे ग्रंथकारांनी बहुवचन वापरले आहे. स्वरान्तराला अपेक्षून (अर्ध - स्वरान्तराचे हे स्वर असल्यामुळे) त्या स्वरांच्या या गुणामुळे (= 'धर्मभेदात्') त्यांना विवादित्वाची संज्ञा देण्यात आली आहे. **ऋषभ - गान्धारौ धैवत - निषादौ** इ. = ऋषभ - गान्धार व धैवत - निषाद ह्या जोड्यांतील स्वर एकमेकांच्या निकट असल्यामुळे या चार स्वरांचाच येथे उल्लेख केला आहे. (ऋषभ - गान्धार व धैवत - निषाद) यांच्या उदाहरणांचा आधार घेऊन एवढ्याच दोन दोन स्वरांचा परस्पर विवाद आहे, असे अन्य एक विद्वान सांगतात. ते खोटे आहे. निःपक्षपाती लोकांनी गान्धार - निषादांना अन्य सर्व स्वरांचे विवादी मानणे योग्य होईल. तथापि (प्रचाराप्रमाणे) षड्ज अंश असता म-प हे त्याचे संवादी आणि रि-ध (व ग-नि) अनुवादी असतात; ऋषभ अंश असता सा - ग - म - प - ध - नि हे त्याचे (संवादी - अनुवादी असतात). गान्धाराचा विवादी कोणी नाही, कारण निषाद हा त्याचा संवादी व बाकीचे पाच स्वर त्याचे अनुवादी असतात. ह्याप्रमाणे अन्य स्वरांबद्दल समजावे.

वादी हा स्वामी; अमात्याप्रमाणे इतर अनुयायी स्वर त्याचे संवादी; विवादी हे त्याच्या शत्रूप्रमाणे अर्थात अल्प, आणि नोकरांप्रमाणे अनुसरण करणारे ते अनुवादी. याप्रमाणे (संवाद-) विभाग समजावा. अनुवादी स्वरांना अनुलक्षून **वादिसंवादि** इ. वाक्य सांगतात, ते स्पष्टच आहे. यांच्या नामांची निरूक्ति सांगतात - **वदनाद्वादी** इ.

पण स - रि - ध याप्रमाणे श्रुतिक्रम सोडून संवादी वगैरेंचे विभाग वीणेवर अनियमित प्रकारे दिसतात, अशी शंका घेऊन म्हणतात :- **एतेषाम्** इ. हे वचन संवादी आदि स्वरांबद्दलचे आहे. जसे की, षड्ज - मध्यम ह्या स्वरांचे संवादित्व शास्त्रसंमत असूनहि नऊ - तेरा ऐवजी जर त्यांचे श्रुत्यन्तर विवादी स्वरांप्रमाणे (कमी - अधिक) झाले तर तेहि परस्पर विवादी होतात. याचप्रमाणे कमीजास्तपणामुळे अनुवादित्वहि कमी होते. उदारणार्थ :- ऋषभ अंश असता न्यून श्रुति षड्ज हा त्याचा अनुवादी होतो. गान्धाराच्या श्रुती वाढल्या असता तो आपले विवादित्व सोडून देतो. षड्ज स्वर हा संवादाचे मूळ आहे असे कायमचे मानून चालणाऱ्यास (दुसऱ्या स्वराचे) वादित्वहि असमंजस ठरेल, कारण संवादी वगैरे स्वरांत

प्रभुत्व असणे हेच वादित्व आहे. कित्येकदा बाह्यकारणांनी स्वरामध्ये न्यूनाधिकत्व उत्पन्न होते. उदा. वीणेची तार फार बारीक असल्यास ती स्वरात लावल्यावरहि चढते - उतरते. **उपवादन** म्हणजे तारा बांधण्याचे स्थान (= मोगऱ्या व खुंट्या). ते देखील ढिले वगैरे असल्यास वीणेवरील थाट (= 'सारणा') बिघडतो. केव्हा वीणेची दांडी वाकली जाण्याचा संभव असतो. (गायनात) इन्द्रिय म्हणजे कंठ वगैरे (= वागिन्द्रिय), त्याच्या उपलक्षणेने येथे 'इन्द्रिय' म्हणजे वीणेचे पडते व वादकाची बोटे वगैरे समजावयाची आहेत. त्यांतील दोषानेहि स्वरात बेसुरपणा येतो. ८

ह्याप्रमाणे स्वर सांगितले. नुसते स्वर कोठे दृष्टादृष्ट कार्यात उपयोगी पडत असले तरी (संगीताच्या प्रयोगात) स्वरांचा समूहच उपयोगी पडतो, ज्याला ग्राम असे नाव देण्यात येते. ग्राम दोन प्रकारचे असून ते पंचमाच्या भेदाने होतात, हे दर्शविण्यासाठी म्हणतात :- **अथ द्वौ ग्रामौ** इ. या वाक्याने गांधारग्रामाचे निरसन होते. मध्यम स्वराचे अनाशित्व असल्यामुळे तो स्वर निश्चित व प्रधान आहे. त्याचा संवादी षड्ज हा असल्यामुळे तोहि प्रधान आहे. पंचम हा (षड्जग्रामात) चतुःश्रुतिक असला तरी समश्रुतिकत्वाच्या कारणाने तो मध्यमाचा संवादी होत नाही. (?) परंतु, दत्तिलाचार्यांनी मूर्च्छनांचा प्रारंभक म्हणून षड्ज स्वराला मुख्य मानून नंतर षड्ज व मध्यम यांच्या परस्पर प्रतिनिधित्वाचे कारण दाखविले आहे :- 'षड्जग्रामिक मूर्च्छनेत षड्ज व मध्यमग्रामिक मूर्च्छनेत मध्यम ज्या स्थानावर असेल त्याप्रमाणे त्या ग्रामांची त्या क्रमाङ्काची ती मूर्च्छना जाणावी' (द. २१)

दत्तिलाचे उक्त कथन महत्वासे नाही, कारण त्यातील षड्जादींच्या प्रथमत्वाच्या उल्लेखाचा कोठेहि उपयोग होण्यासारखा नाही. ते केवळ एक शास्त्रवचन आहे, एवढेच त्याचे महत्त्व; कारण (स्वराच्या) गणनेने प्राप्त झालेल्या आदित्वावर हे प्राधान्य अवलंबून असल्याने येथे इतरेतराश्रय दोष उत्पन्न होतो.

**अत्राश्रिताः** इ., ह्याचा अर्थ ग्रामस्वरूपाच्या लाभा प्रीत्यर्थ असा समजावा. (मंद्रादि) स्थानभेदाने (श्रुती ह्या) सहासष्ट आहेत, तर मग त्या बावीसच कशा ? या शंकेचे निराकरण करण्यासाठी सांगतात :- **स्वरमण्डलस्य** इ. म्हणजे स्वरसमूह जे सप्तक त्याच्या श्रुतींची सिद्धी बावीसच होते. त्यामुळेच निरनिराळया स्थानांत स्वरमण्डळ म्हणजे (एक-एक) चक्र म्हटले जाते. स्वरांचे हे परिमंडल **आंगिरस, काश्यप** वगैरे मुनींनीहि सांगितले आहे. ध्वनिद्वारा जेवढे वैलक्षण्य (= निराळेपणा, फरक) कानांनी ओळखण्यासारखे असते, ती श्रुति होय.

(शंका :-) पण कालांश (= ध्वनि अमुक इतका वेळ राहणे) म्हणजे श्रुती (असे कोणी म्हणतात); परंतु बिन्दु वगैरे अलंकरांत चतुःश्रुतिक स्वर थोडा वेळ घेतो तर स्थायिवर्णाच्या प्रयोगात द्विश्रुतिक स्वर बराच वेळ चालतो; शिवाय घंटा, शंख वैंगरेची श्रुति फार वेळ टिकते, हे कसे ?

(निरसन :-) हे खरे नाही. शब्दावयव म्हणजे श्रुति नव्हे, हे आम्ही मागे सांगितलेच आहे.

जर प्रत्येक ग्रामात बावीस श्रुती आहेत, तर मग (प्रत्येक ग्रामात) त्यांची वाटणी कशी करावयाची, अशी शंका घेऊन उत्तर देतात - **तिस्रो द्वेच** इ.; त्यानंतर **विधिः** इ. म्हणजे श्रुतिविभाग असा अर्थ. ॥ २४ ॥

**चतुःश्रुतिर्भवेत् षड्ज ऋषभस्त्रिश्रुतिः स्मृतः।**
**द्विश्रुतिश्चैव गान्धारो मध्यमश्च चतुःश्रुतिः॥ २५॥**

**पञ्चमस्तद्वदेव स्यात् त्रिश्रुतिर्धैवतो मतः।**
**द्विश्रुतिश्च निषादः स्यात् षड्जाग्रामे विधिर्भवेत्॥ २६॥**

षड्जग्रामातील व्यवस्था अशी असते - षड्ज चार श्रुतींचा असतो; ऋषभ तीन श्रुतींचा मानला आहे; गान्धार दोन श्रुतींचा व मध्यम चार श्रुतींचा (असतो); पञ्चम त्या (मध्यमा -) प्रमाणेच (चार श्रुतींचा) असतो. धैवत तीन श्रुतींचा मानला आहे; आणि निषाद दोन श्रुतींचा असतो. (मध्यमग्रामात पंचम तीन श्रुतींचा व धैवत चार श्रुतींचा असून बाकीच्या स्वरांच्या श्रुती षड्जग्रामातल्या प्रमाणेच असतात.) ॥ २५-२६॥

अ. भा.- आता प्रत्येक स्वरात श्रुतींचा विनियोग **चतुःश्रुतिः स्यात् षड्जः** इ. पासून स्मृतः येथपर्यंत सांगतात ॥ २५ ॥

स्वरांची नावे आप्तप्रसिद्धीच्या आधारे सांगितली आहेत हे दर्शवितात. **धैवतो मतः** ह्यातील 'मतः' वरून समजायचे की धैवताचा लोप षड्जग्रामात कधीहि होत नाही.

गांन्धर्व संगीतात आपापल्या अन्त्य श्रुतीवर स्वर स्पष्ट होतो, असे विशाखिलाचार्य वगैरेंनी सांगितले आहे. उदा. 'श्रुतयः स्वरान्तरगताः' (= दोन स्वरांच्या मधल्या श्रुती); 'सप्ताश्रयतया स्वरगताः' (= स्वरांच्या आश्रयाने स्वरगत सात श्रुती); व 'अन्तरगतास्त्वन्याः' (म्हणजे अंतरगत बाकीच्या). गानामध्ये श्रोत्यांना सुखावह होण्याकरिता (श्रुतींच्या) ह्या विभागांचे प्रयोजन आहे. ह्या विषयी **मातृगुप्ताने** म्हटले आहे :- "एका स्वरावरून दुसऱ्या स्वरावर जात असता क्रमाने व थोडा थोडा चढत जाणारा किंवा उतरत जाणारा(= 'अणुशः क्रमः स्वरे हीयमाने') आणि अशा तऱ्हेने श्रोत्याकडून ऐकिला जाणारा नाद हा एक, आद्य व रंजित असा असतो". त्यामुळे गानामध्ये मुख्यतः चतुःश्रुति ही सर्वसामान्य उक्ति असून ती गान्धर्वपक्षालाहि लागू पडते. तीन श्रुती, चार श्रुती वगैरे ह्या (स्वरस्थानाच्या) आश्रयाच्या किंवा मधल्या किंवा उभयात्मक अशा त्या त्या स्वराच्या होत (असा अर्थ समजावा.) ॥ २६ ॥

**मध्यमग्रामे नु पञ्चमः श्रुत्यपकृष्टः कार्यः। एवं श्रुत्युत्कर्षादपकर्षाद्वा यदन्तरं**
**मार्दवादायतत्वाद्वा तत्प्रमाणं श्रुतिः। निदर्शनं त्वासामभिव्याख्यास्यामः।**
**यथा –– द्वे वीणे तुल्य - प्रमाण - तन्त्र्युपवादन - दण्ड - मूर्छने कृत्वा**
**षड्जग्रामाश्रिते कार्ये। तयोरन्यतरस्यां पञ्चमस्यापकर्षे श्रुतिं मध्यमग्रामिकीं**
**कृत्वा तामेव च पञ्चमस्य च श्रुत्युत्कर्षवशात् षड्जग्रामिकीं कुर्यात्।**
**एक - श्रुतिरपकृष्टा भवति।**

**पुनरपि तद्वदेवापकर्षेत्, यथा गान्धार - निषादवन्ता - वितरस्यामृषभधैवतौ प्रवेक्ष्यतः द्विश्रुत्यधिकत्वात् । पुनरपि तद्वदेवापकृष्टायां धैवतर्षभावितरस्यां पञ्चम - षड्जौ प्रवेक्ष्यतः त्रिश्रुत्यधिकत्वात् । तद्वत्पुनरपकृष्टायां पञ्चम - मध्यम - षड्जा इतरस्यां मध्यम - गान्धार - निषादवन्तः प्रवेक्ष्यन्ति चतुःश्रुत्य - भ्यधिकत्वात् । एवमेतेन श्रुति - निदर्शनेन द्वै - ग्रामिक्यो द्वाविंशति - श्रुतयः प्रत्यवगन्तव्याः ।**

**अथ मूर्च्छनाः द्वैग्रामिक्यश्यतुर्दश - आदावुत्तरमन्द्रा स्याद्रजनी चोत्तरायता ।**
**चतुर्थी शुद्धषड्जा तु पञ्चमी मत्सरीकृता ॥ २७ ॥**

**अश्वक्रान्ता तथा षष्ठी सप्तमी चाभिरुद्गता ।**
**षड्जग्रामाश्रिता स्येता विज्ञेयाः सप्तमूर्च्छनाः ॥ २८ ॥**

मध्यमग्रामात पंचम स्वर एक श्रुति उतरा योजावा. ह्याप्रमाणे (पंचमाच्या) एक श्रुतीच्या उतरण्याने किंवा (षड्ज ग्रामात तो पंचम एक श्रुति) चढविण्याने (अर्थात पंचमाच्या) मार्दवामुळे किंवा आयतत्वामुळे (उत्पन्न होणारे) जे (सूक्ष्म स्वरांतराचे) प्रमाण ते म्हणजे श्रुति होय. आता या (बावीस श्रुती) सिद्ध करण्याचा प्रयोग (= श्रुतिनिदर्शन) स्पष्ट करून सांगतो, तो असा :-

ज्यांची लांबीरुंदी, दांडी, खुंट्या, तारा व मूर्च्छना (अगदी) एकसारख्या आहेत, अशा दोन वीणा षड्जग्रामिक सप्तकात जुळवून घ्या. नंतर त्यापैकी एका वीणेवरील पंचम (एक श्रुति एवढा) उतरवून तिला मध्यमग्रामिक करा. नंतर हा पंचम चढा (= षड्जग्रामिक चार श्रुतींचा) आहे असे मानून (= **पञ्चमस्य श्रुत्युत्कर्षवशात्**) याच (वीणेला) पुन्हा षड्जग्रामिक करा. (= म्हणजे पंचमाखेरीज बाकीचे सर्व स्वर पंचमाच्या अनुरोधाने एक एक श्रुति उतरा.) असे केल्याने, ह्या (चलवीणेवरील सर्व स्वर) एक श्रुति उतरलेले असे होतील. पुन्हा (ह्या चलवीणेवरील सर्व स्वर त्याचप्रमाणे (म्हणजे अगोदरच्या प्रमाणे एक श्रुति) उतरवा; मग त्यामुळे (ह्या चलवीणेवरील) गान्धार व निषाद हे स्वर दुसऱ्या (म्हणजे ध्रुव किंवा अचल वीणेवरील) अनुक्रमे ऋषभ व धैवत या स्वरांत प्रवेश करतील (= मिळालेले दिसतील); कारण (गांन्धार व निषाद हे अनुक्रमे ऋषभ आणि धैवत यांपेक्षा) दोन श्रुतींनी अधिक आहेत. पुन्हा त्याचप्रमाणे (ही चलवीणा एक श्रुति) उतरविल्यावर, (ह्या वीणेवरील) ऋषभ आणि धैवत दुसऱ्या (म्हणजे अचलवीणेच्या) अनुक्रमे षड्ज व पंचम या स्वरांत प्रवेश करतील, कारण ते तीन श्रुतींनी अधिक आहेत. पुन्हा आणखी एकदा पूर्वीप्रमाणेच (चलवीणेवरील स्वर) उतरविल्यावर (तीवरील) षड्ज, मध्यम व पंचम दुसऱ्या (अचल वीणेवरील) अनुक्रमे निषाद, गान्धार व मध्यम ह्या स्वरांत मिळून जातील; कारण (षड्ज, मध्यम व पंचम हे स्वर अनुक्रमे निषाद, गान्धार व मध्यम ह्या स्वरांपेक्षा) चार श्रुतींनी अधिक आहेत. ह्याप्रमाणे या श्रुतिनिदर्शनाने दोन्ही ग्रामांतील (प्रत्येकी) बावीस श्रुती जाणून घ्याव्या.

आता मूर्च्छना (सांगतो). या दोन्ही ग्रामांत मिळून चौदा आहेत, त्या अशा :-

पहिली उत्तरमन्द्रा होय; दुसरी रजनी, तिसरी उत्तरायता, चौथी शुद्धषड्जा, पाचवी मत्सरीकृता, सहावी अश्वक्रान्ता तसेच सातवी अभिरुद्गता, अशा या षड्जग्रामातील सात मूर्च्छना जाणाव्या ॥ २७-२८ ॥

अ. भा. - आता मध्यमग्रामाचे वर्णन करतात :- **मध्यमग्रामे तु** इ. (षड्जग्रामात) चतुःश्रुतिक पंचम असल्यामुळे षड्जाचे मध्यम व पंचम हे दोन स्वर अमात्यरूप संवादी असतात. मध्यमाच्या संवादींचाहि निर्देश या वाक्याने सुचविला गेला आहे, परंतु (मध्यमग्रामात) पंचम एका श्रुतीने न्यून असल्यामुळे मध्यमाचा षड्ज हा एकच संवादी असतो. (सप्तस्वरांत) मध्यमाचे प्राधान्य आहे; (ते असो,) पण मध्यमग्रामातील त्रिश्रुतिक (पंचमाचा नियम हिशेबात न धरता पंचम हा स्वर वास्तविक चतुःश्रुतिक) आहे, असे मानून चालल्यास त्याचीहि प्रधानता असावयास पाहिजे; पण तसे नाही, कारण (षड्ज व मध्यम) हे दोनच स्वर पूर्ण (चतुःश्रुति) असतात, परंतु पंचम हा स्वर आपले चतुःश्रुतिकत्व (मध्यमग्रामात का होइना, पण) सोडतो. तसेच काकली व अन्तर हे स्वर चतुःश्रुतिक असतात खरे, पण तो त्यांचा स्वभाव नसून विकार मात्र आहे. (षड्ज व मध्यम यांचे) अनाशित्व असल्यामुळे ग्राम दोनच आहेत. षड्जग्रामातल्या चौथ्या श्रुतीतून ज्या प्रकारची अनुकरणानात्मक नादनिष्पत्ति होईल, त्या प्रकारची नादनिष्पत्ति मध्यमग्रामाच्या तिसऱ्या श्रुतीतून होणार नाही. तिचे स्थान नीच असल्यामुळे ती नीच राहील. अर्थात एक श्रुति उतरा असा हा पंचम आहे. म्हणजे त्या श्रुतीचा (स्वराचा) कंप होतो, असे येथे समजावे. ह्याविषयी (एक विद्वान) म्हणतात :- 'थोड्याशा वाऱ्यासमोर असलेल्या, पिकलेल्या कवठाच्या फळाप्रमाणे असलेला चतुःश्रुतिक स्वर त्रिश्रुतिक होऊन कंप पावल्यासारखा वाटतो.' किंवा या प्रकारचा स्वर (मध्यमग्रामिक) रागांना आवश्यक असा असतो. त्रिश्रुतीचा प्रयोग कंपित, कुहरित व रेचित या अलंकरांत होतो. अशा रीतीने **श्रुत्यपकृष्टः पञ्चमः** असे हे मध्यमग्रामाचे लक्षण सांगितले. ह्या ग्रामात पंचम (सुद्धा) प्रधान स्वर समजायचा आहे, कारण मध्यमग्रामात त्याचा कधीहि लोप होत नाही. दुसऱ्याच्या मते धैवत व पंचम हे स्वर अनुक्रमे षड्जग्राम व मध्यमग्राम यांत अलोप्य आहेत. या मताचा आश्रय करून 'मध्यम गतीच्या' (पंचमाचा) असे येथे म्हटले आहे.

आता ही श्रुति म्हणजे काय (किंवा केवढी) आहे या प्रश्नाला उत्तर देतात :- **एवं श्रुत्युत्कर्षापकर्षाच्च** इ. मार्दव म्हणजे तारेला शिथिल करणे (= तार उतरविणे), आयतत्व म्हणजे याच्या उलट करणे (= तार चढविणे), असे स्पष्टीकरण देतात. कर्णग्राह्य अशा श्रुतीचा म्हणजे ध्वनीचा (सूक्ष्म) उत्कर्ष अर्थात तीव्रता आणि अपकर्ष म्हणजे मंदता, ह्या दोन क्रियांना आयतत्व व मार्दव ह्या दोन संज्ञा केल्या आहेत.

याप्रमाणे चढविणे व उतरविणे अर्थात मार्दव व आयतत्व या दोहोंमधले जे अंतर म्हणजे (त्या दोहोंमधल्या सूक्ष्म ध्वन्यन्तराचा जो) विशेष बोध, तो प्रमाण म्हणजे निर्णायक आहे जिचा (= ज्या ध्वनीचा) ती (= तो ध्वनि म्हणजे) श्रुति. अर्थात वर सांगितलेल्या ध्वनींची (म्हणजे दोन्ही ध्वनींमधली) जी विलक्षणता (= फरक) म्हणजे कमी किंवा जास्ती अगर तीव्र आणि मंद अशा रूपाने (जो ध्वनि) ओळखला जातो, ती श्रुति होय. जरी परमाणुरूपाने (स्वराचा) उत्कर्षापकर्ष करता येईल व त्यामुळे ध्वनीमध्ये (अत्यंत सूक्ष्म) फरक (= 'विशेष') पडेल, तथापि (कानांनी) तो ग्राह्य करणे शक्य होणार नाही. त्यामुळेच ज्या कोणत्या तरी ध्वनीचा उत्कर्षापकर्ष जाणता येत नाही, त्याला 'एकश्रुति' ध्वनि असे नाव दिले जाते, जसे परमाचार्यांनी (पाणिनीने) म्हटले आहे :- ''एकश्रुतिदूरात्सम्बुद्धौ''[१] म्हणजे कोणाच्या नावाने दुरून हाक मारतात, त्यावेळी (तो स्वर) 'एकश्रुति' असतो.

(शंका :-) पण अलाबूवीणेवरील (निरनिराळ्या स्वरांच्या) तथाभूत श्रुतींची कमीजास्त (संख्यावाली) अंतरे अनियत दिसतात, तर मग नियत असा श्रुतिविभाग कसा सांगितला? कारण वीणेवर तो नक्की करता येत नाही. (निराकरण :-) तसे नाही. वीणेवर सुद्धा हा श्रुतिविभाग नियतच असतो, पण अनन्तपुरूष आणि वामनपुरूष अशा ( प्रकारे लहान मोठ्या) विभाग विशेषांच्या उपलक्षणाने लक्षणीय अशी श्रुति वीणेवरहि . . . . ( त्या दृष्टीने मापून पाहिल्यास दृष्टोत्पत्तीस येऊ शकते.) मग विरोध तो कसा? म्हणूनच लक्षणीय अशा (ध्वनि-) विशेषाचे श्रुति हें रूप असते. त्याचे ग्रहण करण्यासाठी 'उत्कर्ष' हा शब्द येथे वापरला आहे. उत्कर्ष शब्दाने अपकर्षहि ध्यानात येतो. दोन वीणा घेतल्या आणि त्यांतल्या एका वीणेची तार (किंचित) चढविली असता त्या स्वराचा उत्कर्ष होतो, त्याच वेळी दुसऱ्या स्थिर वीणेवरील (त्याच स्वराच्या) तारेच्या स्वराचा अपकर्ष (तो स्वर न उतरताहि कमी आहे हा बनाव) ओळखण्यात येतो. आणि ह्या वीणेवरील स्वराचा अपकर्ष ऐकला असता दुसऱ्या वीणेवरील (त्याच) स्वराचा उत्कर्ष ओळखता येतो. अर्थात आयतत्वाने उत्कर्ष आणि अपकर्ष दोन्ही ध्यानात येतात. (तसेच दोहोंपैकी एका वीणेवरील एका स्वराच्या तारेच्या मार्दवाने दुसऱ्या वीणेवरील त्या स्वराची तार चढी आहे ही गोष्ट म्हणजेच त्या तारेचा उत्कर्षहि आपोआप ध्यानात येतो.) याप्रमाणे मार्दवाने सुद्धा दोन्ही वीणांवर होणारे उत्कर्षापकर्ष दाखविण्यासाठी ( व या बाबतची) यथासंख्य (असण्याची) शंका निरसन करण्यासाठी **मार्दवादायतत्वाद्वा** असे शब्द येथे वापरले आहेत. तसे नसते तर 'उत्कर्षायतत्व-मार्दवाभ्याम्' असे ग्रंथकार म्हणाले असते. **प्रमाणम्** या शब्दाने, श्रुति म्हणजे कालविभाग नव्हे, नादांश नव्हे, स्वराची दीर्घता (= 'आयुः') नव्हे, स्थान नव्हे, कारणहि नव्हे, तर पुढे सांगण्यात येणारा (स्वराचा) उच्चनीच-विभाग असा ध्वनि म्हणजेच एक श्रुति हे दाखवितात. तर याप्रमाणे एका श्रुतीचे स्वरूप दाखवून त्याद्वारे श्रुतिसंख्येचे स्वरूप ध्यानात

येईल अशा रीतीने ते दाखविण्याचा उपक्रम करतात :- **निदर्शनं त्वासाम्** इ.= **आसाम्** म्हणजे अनेकांचे, **निदर्शनम्** म्हणजे ज्या उपायाने त्या खात्रीने दिसण्यात येतील, तो उपाय; अर्थात प्रथम दर्शनाने रंजक अशा दोन (स्वरांच्या) उत्कर्षापकर्षयुक्त अशा श्रुतींमधील विशेष (फरक ग्रहण करण्याची युक्ति). (दोन्ही ग्रामातील दोन पंचमांमधला.) परस्पर विशेष (=फरक) अवधानाने व प्रयत्नबलाने पहावा, असे सांगतात. कसा? तर दुसऱ्या वीणेवरचा (उतरलेला स्वर) पहावयाचा, पुन्हा पहिल्या वीणेवरील पहावयाचा, पुन्हा दुसऱ्या वीणेवरील पहावयाचा आणि याप्रमाणे अनुसंधानबलाने निश्चित अशा फरकाचा अनुभव घेऊन म्हणावयाचे की (ह्या वीणेवरील अमुक हा) स्वर चढा आहे. दोन्ही (वीणांच्या) दोन तारांचा उत्कर्षापकर्ष केला असता जो ध्वनि (फरक) अनुभवास येईल, त्याची परस्पर तुलना (='विवेक') करून हिंदोळ्याप्रमाणे त्या तारांचे पुनः पुनः आकर्षण केले असता अनुसंधानबलाने प्रत्यय येईल व त्यांतील विशेष (=फरक) स्पष्ट होईल. ह्या (क्रियेला) निदर्शन असे म्हटले आहे. या क्रियेत पहिली सारणा म्हणजे ध्रुववीणेला नीट स्वरांत लावून घेण्यास सांगतात, दुसऱ्या सारणेत श्रुतीची इयत्ता (= परिमाण) निश्चित करून देतात, तिसऱ्या सारणेत श्रुतिचतुष्काचा बोध करून देतात,चवथ्या सारणेत सहा श्रुती आणि पाचव्या सारणेत बारा श्रुती दाखवून देतात, हे या पाच सारणांचे तात्पर्य आहे. आता ग्रथंवचनाची व्याख्या करतो :- **प्रमाणं** या शब्दाचा अर्थ (वीणांची) लांबीरुंदी असा होतो. तारांची जाडी व संख्या यांची समानता असा अर्थ कित्येक करतात. या वाक्यात दंड शब्द पुनरुक्त आहे, त्याचा विग्रह असा करावयाचा :- ज्या वीणांच्या तारा बांधण्याची स्थाने व स्वरक्षेत्र (= 'मूर्च्छना' = compass) समान आहेत अशा दोन वीणा घ्याव्या. मूर्च्छना या प्रमाण व संख्या यांनी समाजावयाच्या आहेत. (दोन्ही वीणांच्या) तारा, दंड वगैरेंचे साम्य अशा तऱ्हेने केले पाहिजे की दोन्ही वीणांच्या स्वरस्वरूपात कोणत्याहि अंशाने भिन्नत्व राहू नये (= किंचितहि फरक राहू नये), ज्यामुळे या दोन्ही वीणा अगदी एक असल्याप्रमाणे भासतील. आता एका वीणेवरील स्थिर स्वरांशी तुलना केल्याने (स्वरांमधील) फरक समजण्यात येणार आहे, म्हणून तिला अचलसारणा (= स्थिर स्वरूपाची) ठेवायची आहे आणि दुसऱ्या वीणेवरील पंचमाची तार एक श्रुति एवढी उतरावयाची आहे. असे केल्याने (ह्या दुसऱ्या चलवीणेवर) मध्यमग्राम उत्पन्न होईल. त्यानंतर या वीणेवरील मध्यम वगैरे (बाकीच्या सर्व) स्वरांचीहि (त्या उतऱ्या पंचमाच्या प्रमाणात) एक श्रुति उतरावयाची आहे, ज्यामुळे (ह्या वीणेवर एक श्रुति उतरा असा) षड्जग्रामच होईल. असे केल्याने ध्रुव व चल वीणेवरील स्वर वाजविले असता (एक) श्रुति अधिक किंवा कमी याचा प्रत्यक्ष अनुभव अनुसंधानबलाने येईल. तेच सांगतात :- **एकश्रुतिरपकृष्टा भवति** = (पहिल्या ध्रुव वीणेवरील) सर्वस्वरांपेक्षा, हे शेष. ह्या श्रुतीचा हा गुण प्रत्यक्ष गम्य आहे असा भावार्थ. (दोन्ही वीणांवरील) स्वरस्थानांमधील हा परमाणुमात्र फरक एखाद्या योग्याला

समाधि अवस्थेच्या जोरावर आकलन होण्यासारखा (सूक्ष्म) असतो, तरी त्याच फरकाला श्रुति ही संज्ञा लावली आहे, असे म्हणून श्रुतींची (बावीस ही) संख्या पटविण्यासाठी श्रुतिचतुष्टय कसे प्राप्त होते ते दाखविण्यासाठी म्हणतात :- तद्वदेवापकर्षेत् इ. म्हणजे चलवीणेवरील पंचमाच्या आधारे (= पुन्हा पंचम स्वर एक श्रुति उतरवून त्यानुसार ह्या वीणेवरील) सर्व स्वर एक श्रुतीने पुन्हा उतरावयाचे. ह्या अपकर्षाच्या क्रियेमुळे चलवीणेवरील गान्धार-निषाद ध्रुववीणेवरील ऋषभ-धैवतांत मिळालेले दिसतील व आता (ग-रि आणि नि-ध) यांची स्थाने समान होतील, कारण ध्रुववीणेवरील सर्व स्वर (चलवीणेवरील सर्व स्वरां पेक्षा) दोन श्रुतींनी अधिक आहेत. अशा प्रकारे ध्वनीत (दोन श्रुतींचा) फरक उत्पन्न झाल्यामुळे (चलवीणेवरील) गान्धार-निषादांचे अन्य (ध्रुव-) वीणेवरील ऋषभ-धैवताशी साम्य होईल. ह्याच कारणामुळे (अशा प्रकारच्या सूक्ष्म फरकाला) 'श्रुति' असे नाव दिले गेले. म्हणून प्रचारात श्रुति वगैरेंचा जो व्यवहार दिसण्यात येतो तो निर्मूल नाही. तसेच न्यूनाधिकत्वामुळे स्वरात फरक (= 'विनाशः') पडतो, त्याचा विशिष्ट उपयोग असल्यामुळे त्याला श्रुति असे म्हणतात. (एक श्रुति वगैरे तार उतरण्याच्या) प्रथमच्या क्रियेमुळे (स्वरात असा फरक पडला) नव्हता तर ह्यामुळे श्रुतीचे स्वरूप (आपल्याला) माहीत झाले. गान्धार-निषादाच्या प्रत्येकाच्या ज्या दोन श्रुती, त्या ऋषभ-धैवतांत मिळून गेल्याचा अनुभव आल्यामुळे त्या (दोन श्रुती) अगदी स्पष्टपणे उपलब्ध झाल्या आणि अशा प्रकारे (त्या सर्व बावीस) श्रुती प्रत्यक्षीभूत झाल्या. आणखी पुन्हा चलवीणेवरील सर्व स्वरांची एक श्रुति जेव्हा उतरली जाईल तेव्हा (त्या चल-) वीणेवरील ऋषभ-धैवत, ध्रुववीणेवरील (षड्ज-पंचमांशी अनुक्रमे साम्य पावतील; कारण ध्रुववीणेवरील) सर्व स्वर तीन श्रुतींनी (यावेळी) अधिक होते. ह्याप्रमाणे या दोन्ही स्वरांच्या मिळून सहा श्रुती स्पष्ट होऊन उपलब्ध झाल्या. त्यानंतर (पुन्हा) चलवीणेवरील सर्व स्वरांतून एक श्रुतीचा अप्कर्ष केल्याने तीवरील षड्ज, मध्यम व पंचम हे स्वर ध्रुववीणेवरील अनुक्रमे निषाद, गान्धार व मध्यम या स्वरांच्या स्थानांशी समान होऊन मिळतील, कारण ध्रुववीणेवरील सर्व स्वर (या वेळी चलवीणेच्या सर्व स्वरांपेक्षा) चार श्रुतींनी अधिक आहेत. तर ह्या प्रमाणे या तिन्ही स्वरांच्या प्रत्येकी चार श्रुती स्पष्ट झाल्या व (या सारणेमुळे) एकूण बारा श्रुती उपलब्ध झाल्या. ह्याप्रमाणे (सर्व सारणांतील अनुक्रमे) एकूण बारा श्रुती मिळून एकूण बावीस श्रुती मिळाल्या. ऋषभ-धैवत हे गान्धार-निषादांपेक्षा दोन श्रुतींनी अधिक असतात, त्यामुळे त्यांच्या दोन श्रुती कमी केल्यावर गान्धार-निषादांत त्यांचा अवश्य प्रवेश होतो. रि-ध हे स-प पेक्षा तीन श्रुतींनी अधिक असतात आणि स-म-प हे नि-ग-म पेक्षा चार श्रुतींनी अधिक असतात व होते, त्यामुळे (स-म-पांच्या) तेवढ्या श्रुती कमी केल्यामुळे त्यांचा प्रवेश पुढच्या(= खालच्या) स्वरांत (आपोआपच) झाला. अशा तऱ्हेने 'द्विश्रुत्यधिकत्वात्' इत्यादी शब्दांनी ग्रंथकारांनी प्रवेशनीय स्वरांची कारणे

दाखविली. तो (प्रवेश कसा होतो) त्याचेहि स्पष्टीकरण आम्ही केले. या ठिकाणी ग्रंथकार म्हणतात :- **एवमेतेन श्रुतिनिदर्शनेन** इ. = तर ह्या रीतीने श्रुतींचे स्वरूप उपलब्ध झाले आणि ध्रुववीणेवर श्रुतीची इयत्ताहि (= मापहि) स्पष्ट झाले. द्विश्रुतिक, त्रिश्रुतिक व चतुःश्रुतिक स्वरांचे स्वरूप व श्रुतीची इयत्ता प्रस्ताराने (-हि) स्पष्ट होते. कोणी (ग्रंथकार) दंड प्रस्ताराने बावीस रेषा काढून त्याद्वारे दाखवितात तर दुसरे (ग्रंथकार) मंडळ प्रस्तार सांगतात. आडव्या पाच व उभ्या सहा रेषा ह्याप्रमाणे दोन्ही बाजूंनी (त्यांची टोके) बावीस होतात.

ह्या प्रमाणे दोन्ही ग्राम, व त्यांना उपयोगी असे श्रुतींच्या अस्तित्वाच्या आधारे (= 'श्रुतिसद्भावे') स्वरांच्या श्रुतिनियमाचे प्रामाण्य सांगून क्रमप्राप्त अशा मूर्च्छनांचा विषय आता सांगतात :- **अथेति सम्यक्** इ. अर्थात क्रमाने एका पुढील एक स्वर घ्यावयाचे व त्यानंतर त्याखालील (= 'अवरोहणं') (स्वरावरून सुरवात करून त्यापुढील स्वर घेत जावयाचे) अशा तऱ्हेने स्वरसप्तकाचे स्वरूप घेणारी (= 'वहः') ती मूर्च्छना होय. मूर्च्छना शब्दाचा अर्थ समुच्छ्राय असा होतो. त्या कारणाने उपसंहारात **क्रमयुक्ताः स्वराः** असा हिचा विशेष सांगतात. (स्वरांचा) क्रम नसल्यास ती मूर्च्छना होणार नाही. त्याप्रमाणे षड्जापासून निषादा पर्यंत आरोह करावयाचा, (नंतर) धैवतापासून पंचमापर्यंत, (मग) पंचमापासून मध्यमापर्यंत, (नंतर) मध्यमापासून गान्धारापर्यंत, (मग) गान्धारापासून ऋषभापर्यंत. हा षड्ज द्वितीय सप्तकाचा म्हणजे तार सप्तकाला स्पर्श करणारा होतो.

(शंका :-) तर मग काय एवढ्या सातच मूर्च्छना?

(उत्तर :-) खरे आहे; (सातच, पण) पंचमाच्या (एक श्रुति एवढ्या) अपकर्षाने (मध्यमग्रामाच्या) अन्य सात मूर्च्छना होतात. त्याबद्दल सांगतात :- द्वैग्रामिक्यः इ. (मध्यमग्रामात) पंचम उतरा झाल्यामुळे संवादी-अनुवादींची व्यवस्था व स्वरव्यवस्था ह्यांचा लोप होतो, (त्यामुळे) वेगळीच स्वरव्यवस्था तयार होते, अशी पुष्कळ भिन्नता उत्पन्न होते. मध्यम ग्रामातील सात मूर्च्छना (अशा)- मध्यमापासून गान्धारा पर्यंत, गान्धारापासून ऋषभापर्यंत, ऋषभापासून पड्जापर्यंत, षड्जापासून निषादापर्यंत, निषादापासून धैवतापर्यंत, धैवतापासून पंचमापर्यंत पंचमापासून मध्यमापर्यंत. यांचा नामनिर्देश केला आहे तो वैदिककर्माचे अंग आहे, असे दाखविले आहे. या विषयी एक वाक्य आहे 'उत्तरमन्द्रया स्वत्वं संहतास्तिस्त्रो गाथा गायेत्' (उत्तरमंद्रेने तीन गाथा मिळून गाव्या); 'ताः पत्यो वा पाटलिकाभिरुपगायन्ति' (पत्न्या त्यांचे पाटलिकांनी (पाठभेट - घाटलिका) उपगान करतात) इ. षड्जग्राम इ. ॥ २७-२८ ॥

**आसां षड्ज-निषाद-धैवत-पञ्चम-मध्यम-गान्धारर्षभा आनुपूर्व्या आद्याः स्वराः ।**
**षड्जे चोत्तरमन्द्रा स्यादृषभे चाभिरुद्गता ।**
**अश्वक्रान्ता तु गान्धारे मध्यमे मत्सरीकृता ॥ २९ ॥**

**पञ्चमे शुद्धषड्जा स्याद्धैवते चोत्तरायता ।**
**निषादे रजनी च स्यादित्येताः षड्जमूर्च्छनाः ॥ ३० ॥**

**अथ मध्यमग्रामे - सौवीरी हरिणाश्वा च स्यात्कलोपनता तथा ।**
**शुध्दमध्या तथा मार्गी पौरवी ह्रष्यका तथा ।**
**मध्यमग्रामजा ह्येता विज्ञेयाः सप्तमूर्च्छनाः ॥ ३१ ॥**

ह्या ( मूर्च्छनांचे ) आरंभीचे स्वर अनुक्रमे षड्ज, निषाद, धैवत, पंचम, मध्यम, गान्धार व ऋषभ असे आहेत.

षड्जापासून ( आरंभ होणारी ती ) उत्तरमन्द्रा, ऋषभापासूनची अभिरुद्गता, गान्धारापासूनची अश्वक्रान्ता, मध्यमापासूनची मत्सरीकृता,पंचमापासूनची शुध्दषड्जा, धैवतापासूनची उत्तरायता व निषादापासूनची रजनी ह्याप्रमाणे या षड्जग्रामातील मूर्च्छना होत. ॥ २९-३० ॥

आता मध्यमग्रामातील ( मूर्च्छना ) -

सौवीरी, हरिणाश्वा, कलोपनता, शुध्दमध्या, मार्गी, पौरवी तसेच ह्रष्यका या मध्यमग्रामात उत्पन्न होणाऱ्या सात मूर्च्छना जाणाव्या. ॥ ३१ ॥

**आसां मध्यम - गान्धारर्षभ - षड्ज - निषाद - धैवत - पञ्चमा आनुपूर्व्या आद्याः स्वराः ।**
**मध्यमेन सौवीरी, गान्धारेण हरिणाश्वा, ऋषभेण कलोपनता, षड्जेन शुध्दमध्यमा, निषादेन मार्गी, धैवतेन पौरवी, पञ्चमेन हृष्यकेति ।**
**एवमेताः स्वर - क्रम - युक्ताः सम्पूर्णाः षाडवौडुवी - कृताः स्वर - साधारण - कृताश्चेति मूर्च्छनाश्चतुर्दश भवन्ति । अपि - च -**
**क्रम - युक्ताः स्वराः सप्त मूर्च्छनेत्यभिसंज्ञिताः ।**
**षट् - पञ्च - स्वरकास्तानाः षाडवौडुविताश्रयाः ॥ ३२ ॥**
**साधारण - कृताश्चैव काकली - समलङ्कृताः ।**
**अन्तर - स्वर- संयुक्ता मूर्च्छना ग्रामयोर्द्वयोः ॥ ३३ ॥**

या ( मध्यमग्रामातील मूर्च्छनांचे ) आरंभीचे स्वर अनुक्रमे मध्यम, गान्धार,ऋषभ, षड्ज, निषाद, धैवत आणि पंचम हे होत. मध्यमाने ( आरंभ होणारी ) ती सौवारी, गान्धाराने, हरिणाश्वा, ऋषभाने कलोपनता, षड्जाने शुध्दमध्यमा, निषादाने मार्गी, धैवताने पौरवी, पंचमाने हृष्यका होय. ह्याप्रमाणे स्वरक्रमयुक्त या चौदा मूर्च्छनांचे संपूर्ण, षाडव, ओडव व साधारणकृत असे (प्रत्येकी चार) प्रकार होतात.

आणि -

क्रमयुक्त सात स्वरांना मूर्च्छना असे म्हणतात. (मूर्च्छना) सहा व पाच स्वरांच्या अर्थात षाडव व ओडव होतात तेव्हा त्यांना ताना ( हे नांव दिले जाते. ) ॥ ३२ ॥

दोन्ही ग्रामांत पुन्हा अंतरगान्धार व काकलीनिषाद ह्यांच्या योगाने साधारणकृत नावाच्या मूर्च्छना होतात. ॥ ३३ ॥

अ. भा. - ह्याप्रमाणे मध्यमग्रामाच्याहि सात मूर्च्छना आहेत.

ह्या प्रत्येक मूर्च्छनेचे चार प्रकार आहेत :- षड्जादि सात स्वरांनी युक्त त्या पूर्ण; आणि स्वरांच्या त्या षाडव प्रयोगाचे रक्षण जे सहा (स्वर) करतात ते षाडव व त्यांनी होणारा प्रयोग तो षाडव होय. पाच स्वरांनी प्रयोग हातो त्या औडुवित होत. 'उडवः' म्हणजे नक्षत्रे; ती ज्याच्यात 'वान्ति' म्हणजे जातात (= चालतात) ते 'उडुवं' म्हणजे आकाश होय. या शब्दाने पाच ही संख्या व्यक्त होते आणि त्या संख्येने पाच स्वर निर्दिष्ट केले जातात. (किंवा) पाचवे महाभूत (आकाश), त्यामुळे ही संख्या (= औडुव संज्ञा) मानली गेली आहे. ज्यांच्यामध्ये स्वर औडुवित केले गेले आहेत त्यांच्यामध्ये होणारा प्रयोग तो औडुवित आणि त्याच्या योगे ती मूर्च्छना औडुवित होय. किंवा (वैशेषिकांची जी) नऊ (द्रव्ये), त्यांच्यात मधले म्हणजे पाचवे आकाश होय, असेहि जुळते आणि तशीहि व्युत्पत्ति सांगतात. केव्हा तरी कोणती तरी जाती स्वरलोपामुळे ओडव होते ही गोष्ट एकदेशी आहे; तसे असूनहि मूर्च्छनेचा तसला (ओडव हा स्वतंत्र) प्रकार सांगितला आहे. गान्धार-निषाद अल्प असलेल्या प्रयोगात काकली व अन्तर या स्वरांच्या योगाने मूर्च्छना साधारण म्हणविली जाते, ही गोष्ट **क्रमयुक्ताः स्वराः सप्त** इत्यादी दोन कारिकांनी सांगितली आहे.

**सप्त** इ. म्हणजे पूर्ण (मूर्च्छना) ; **क्रमयुक्ताः** म्हणजे क्रमाने आरोह करावयाचा आणि त्याप्रमाणे स्वरांच्या अवरोहाने पुन्हा आरोह करावयाचा असा क्रम होय. ('समाहिताः') म्हणजे क्रमाने युक्त अशा सांगितलेल्या. **तानाः** = 'तन्यते' म्हणजे ज्यांनी प्रयोगाचा विस्तार सुंदर (= ' विचित्र ') केला जातो, त्या (ताना हे) मूर्च्छनांचेच एक विशिष्ट नांव समजावे.तर ह्याप्रमाणे मूर्च्छनांचे तीन प्रकार दाखवून आता चौथा प्रकार सांगतातः- **साधारणकृताश्च** इ.यातील ' एव ' शब्दाने विकृतत्वाने अनंत प्रकार होतात, असे व्यक्त करतात. च - कार पुढच्या शब्दाशी संबंधित आहे. हेच स्पष्ट करतात :- **काकलीसमलङ्कृताः** अन्तरस्वरसंयुक्ताः इ.(मागचा च - कार हा या शब्दांच्या पुढे समजावा. उपसंहार करतात :- **मूर्च्छना ग्रामयोः** इ. ॥ ३२-३३ ॥

**द्विविधैक - मूर्छना - सिध्दिः । तत्र षड्जग्रामे द्विश्रुत्युत्कर्षाद् धैवतीकृते गान्धारे मूर्च्छना - ग्रामयोरन्यत्वम् । तद्वशान्मध्यमादयो यथा - संख्येन निषाददित्वं प्रतिपद्यन्ते । तद्वन्मध्यमग्रामे धैवत - मार्दवाद् द्वैविध्यं, तुल्य - श्रुत्यन्तरत्वाच्च संज्ञान्यत्वम् । मध्यमग्रामे हि चतुःश्रुतिकमन्तरं पञ्चम - धैवतयोः तद्गांधारोत्कर्षाच्चतुःश्रुतिकमेव भवति । शेषाश्चापि मध्यम-पंचम-धैवत -निषाद - षड्जर्षभा -**

निषादषड्जर्षभ - गांन्धार- मध्यम- पञ्चमत्वं प्राप्नुवन्ति तुल्यश्रुत्यन्तरत्वात् ।
अन्तरनिदर्शनमपि श्रुतिनिदर्शने प्रोक्तम् ।
तत्र मूर्छनाश्रितास्तानाश्चतुरशीतिः।
तत्रैकोन-पञ्चाशत् षट्स्वराः पञ्चत्रिशत्
पञ्च-स्वराः। लक्षणं तु षट्-स्वराणां सप्त-विधं
षड्जर्षभ- निषाद- पञ्चमहीनाश्चत्वारः षड्जग्रामे।
मध्यमग्रामे तु षड्जर्षभगान्धार - हीनास्त्रयः ।
एवमेते षट्-स्वराः सर्वासु मूर्छनासु क्रियमाणा
भवन्त्येकोनपञ्चाशत्तानाः । पञ्च-स्वराणां तु
पञ्च-विधत्वमेव । लक्षणं-षड्जग्रामे षड्ज-पञ्चम-
हीनः, ऋषभ-पञ्चम-हीनः, निषाद-वद्गान्धार-हीन इति त्रयः ।
मध्यमग्रामे तु गान्धार-निषादवद्धीनः, ऋषभ-धैवत-हीन इति द्वौ ।
एवमेते पञ्च-स्वराः, सर्वासु मूर्छनासु क्रियमाणास्तानाः पञ्चत्रिंशद् भवन्ति ।
द्विविधा च तान - क्रिया, तन्त्र्यां प्रवेशान्निग्रहाच्च।
तत्र प्रवेशनम् अधर - स्वर- विप्रकर्षादुत्तरमार्दवाद्वा ।
निग्रहस्त्वसंस्पर्शः । मध्यम - स्वरेणैव तु मूर्छना - निर्देशः
कार्यो भवति अनाशित्वान्मध्यमस्य निग्रहे पर्यग्रहे वा ।
इंद च प्रयोक्त - श्रोतृसुखार्थं च मूर्छना-तान-नानात्वम् ।
मूर्छना - तान - प्रयोजनमपि स्थानप्राप्त्यर्थम् ।
स्थानं तु त्रिविधं पूर्वोक्त - लक्षणं काकुविधाविति ।

**दोन** प्रकारच्या (= दोन्ही ग्रामांतील ) मूर्छना एकत्र ( = एकाच ग्रामावर) सिध्द करण्याची रीत **(अशी आहे.)** :- षड्जग्रामाच्या गान्धाराला दोन श्रुती चढवून धैवत केला असता दुसरा ग्राम (=**मध्यमग्राम**) व त्याच्या मूर्छना (आपोआपच) निघू शकतात. त्यायोगे मध्यम इत्यादी स्वर अनुक्रमे **निषाद इत्यादींचे** स्वरूप प्राप्त करून घेतात. त्याचप्रमाणे मध्यमग्रामाचा धैवत (दोन श्रुतींनी) उतरला असता द्विविध स्वरूप (मिळते) (अर्थात षड्जग्राम व त्याच्या मूर्च्छना मिळू शकतात.) (ह्या क्रियेने) **श्रुत्यन्तरे** समान होत असल्याने (ग्रामांच्या, स्वरांच्या व मूर्च्छनांच्या फक्त ) संज्ञा बदलाव्या लागतात. **(कसे ते पहा:-)** मध्यमग्रामात पंचम व धैवत या दोन स्वरांमध्ये चार श्रुतींचे अंतर असते. (षड्जग्रामिक) **गान्धाराचा** (वर दर्शविल्याप्रमाणे दोन श्रुती) उत्कर्ष केल्यामुळे तो (मध्यग्रामासाठी पाहिजे असलेला ) **चतुःश्रुतिक** (धैवत) होतो. (व षड्जग्रामाचे बाकीचे स्वर म्हणजे मध्यम, पंचम धैवत, निषाद,षड्ज व **ऋषभ हे** (या क्रियेत) अनुक्रमे (मध्यमग्रामाचे) निषाद, षड्ज, ऋषभ, गान्धार, मध्यम व पंचम बनतात **कारण** श्रुत्यन्तरे समान असतात. (मागल्या) श्रुतिनिदर्शनात (श्रुतींच्या) अंतरांचे निदर्शन आम्ही केलेच

आहे. त्यात मूर्च्छनाश्रित ताना चौऱ्याऐंशी आहेत. त्यापैकी एकुणपन्नास षाडव ताना असून पस्तीस ओडव ताना होतात. (एकूण सात स्वर वर्ज्य होतात, त्यावरून) षाडव तानांचे लक्षण सात प्रकारचे आहे, षड्ज, ऋषभ, पंचम व निषाद हे स्वर (एका वेळी एक असे) वर्ज्य केल्याने षड्जग्रामात चार ताना आणि षड्ज, ऋषभ व गान्धार हे (एका वेळी एक असे) वर्ज्य करीत गेल्याने मध्यमग्रामात तीन ताना होतात. ह्याप्रमाणे (दोन्ही ग्रामांच्या) सर्व (= चौदा) मूर्च्छनांतून षाडव ताना एकुणपन्नास उत्पन्न होतात. पाच स्वरांच्या (ओडव ताना पाच प्रकारेच होतात. त्यांचे लक्षण (असे)- षड्जग्रामात षड्ज-पंचमहीन, ऋषभ - पंचमहीन, गांधार - निषादहीन याप्रमाणे तीन आणि मध्यमग्रामात गान्धार - निषादहीन व ऋषभ - धैवतहीन ह्या दोन. याप्रमाणे ह्या पाच स्वरांच्या (ओडव ताना) सर्व मूर्च्छनांमध्ये योजल्या असता (उपरोक्त वर्जित पाच जोड्यांमुळे) पस्तीस होतात.

(वीणेवर) ताना उत्पन्न करण्याची रीत दोन प्रकारची आहे. (स्वरांच्या) तारेमध्ये प्रवेश करून अथवा निग्रह करून. त्यातील (वर्ज्य करावयाच्या) खालच्या स्वराला (= स्वराची तार) (वरच्या स्वरात) चढवून किंवा वरच्या स्वराला (= स्वराची तार) खालच्या स्वरात उतरून प्रवेश ही क्रिया होते. निग्रह म्हणजे (वर्जित स्वराच्या तारेला) स्पर्श न करणे.

मूर्च्छनांचा निर्देश मध्यमस्वराने केला जातो, कारण निग्रह किंवा पर्यग्रह या क्रियेत मध्यम हा अविनाशी असतो. मूर्च्छना व तानांचे अनेक प्रकार हे प्रयोक्ता व श्रोता यांच्या सुखासाठी आहेत आणि स्थानप्राप्तीसाठीहि मूर्च्छना तानांचे प्रयोजन आहे. स्थान हे तीन प्रकारचे आहे त्याचे लक्षण काकुविधानामध्ये (अ. १९मध्ये) मागे सांगितलेच आहे.

अ. भा. आता वैणिकांना उपदेशार्थ सांगतात :- **द्विविधैकमूर्च्छना** इ. म्हणजे षड्जग्रामिक मूर्च्छनेच्या दोन प्रकारांपैकी दुसऱ्या प्रकाराने मध्यमग्रामिक मूर्च्छनेची कशी सिध्दी होते ते दाखवितात. एका स्वराच्या विविध उत्कर्षापकर्षामुळे (दोन्ही ग्रामातल्या मूर्च्छनांची उत्पत्ति वीणेवर एकाच ग्रामातून) विलक्षण रितीने होते. म्हणजे षड्जग्रामाची ज्या क्रमांकाची मूर्च्छना असते, तेवढ्याच क्रमांकाची मध्यमग्रामाची मूर्च्छना ज्या रीतीने प्राप्त करता येते, ती रीत दाखवितात, ती अशी :- **तत्र षड्जग्रामे द्विश्रुत्युत्कर्षाद्‌ धैवतीकृते गान्धारे** इ. = गान्धाराची तार दोन श्रुतीपर्यंत चढवावी, त्यामुळे सर्व (= षड्जग्रामाला मध्यमग्राम करण्याचे कार्य) संपूर्ण साध्य होते, कारण तो (चढा) गान्धार (षड्जाला मध्यम मानले असता) मध्यमग्रामिक धैवत होईल. (अर्थात) स-रि-ग-म-प-ध-नि हे (षड्जग्रामिक स्वर अनुक्रमे) म-प-ध-नि -स-रि-ग असे होतील. (षड्जग्रामातील) मध्यम (आता) द्विश्रुतिक होईल, तोच मध्यम ग्रामातील निषाद होईल. (षड्जग्रामाचा) त्रिश्रुतिक ऋषभ हा (मध्यमग्रामिक) पंचम होईल. गान्धाराचा धैवत होईल. त्यामुळे षड्ज अदि स्वर अनुक्रमे (मध्यमग्रामाचे) म-प-ध-नि-स-रि-ग हे रूप धारण करतील. याला कारण सांगतात. **तुल्यश्रुत्यन्तरत्वात्** इ. **संज्ञान्यत्वम्** ह्या शब्दाने दर्शवितात की, या (परिवर्तना-)साठी किंचितहि प्रयत्न करावे लागत नाहीत. (ह्या रीतीने तयार होणाऱ्या) मूर्च्छनांचे तुल्यश्रुत्यन्तर स्वरात व ग्रामात (ठीक) असते, ही गोष्ट स्पष्ट करतात :- अन्तरनिदर्शनमपि इ. हे वक्तव्य सत्य असल्याचे **अपि** या शब्दाने व्यक्त करतात.

श्रुतिनिदर्शने इ. अर्थात मागे द्वे वीणे इ. वचनाने मूर्च्छनांची पूर्णावस्था (स्वरांची श्रुत्यन्तरे) सांगितलीच आहे. आता पुढे तानांचे विवेचन करतात :- **तत्र मूर्च्छनाश्रिताः** इ. =

मूर्च्छनांच्या आश्रित अर्थात मूर्च्छनांच्याच विशेष अवस्था (त्या ताना) होत. या प्रमाणे :- स,रि,नि,प यांच्यापैकी कोणता तरी स्वर वर्ज्य असलेल्या सहा स्वरी मूर्च्छना सात, यांचे वर दाखविलेले प्रत्येकी चार प्रकार होता अठ्ठावीस ताना (षड्जग्रामाच्या) होतात. मध्यमग्रामात स,रि,ग यापैकी कोणता तरी एक स्वर वर्ज्य केल्याने एकवीस ताना होतात. याप्रमाणे सर्व मिळून सहास्वरी ताना एकुणपन्नास होतात. औडव ताना षड्जग्रामाच्या एकवीस व मध्यग्रामाच्या चौदा मिळून पस्तीस होतात. सर्व मिळून चौऱ्याऐंशी होतात. वीणेवर तानक्रिया करावयाची असते. तेव्हा वर्ज्य स्वराच्या तारेला स्पर्श करावयाचा नसतो. तेवढे कौशल्य नसल्यास वर्ज्य स्वराची तार उतरवून किंवा चढवून मागच्या किंवा पुढच्या स्वरांशी मिळवून घ्यावी. ह्या विषयाला अनुलक्षून म्हणतात :- **द्विविध** इ. (तीन क्रिया) म्हणजे तानार्थक्रिया अर्थात (वीणेवर ताना करण्याचा ) उपाय - ( षड्ज वर्ज्य करावयाचा असल्यास) वरच्या ऋषभाच्या अपेक्षेने षड्जाचा विप्रकर्ष करावा. म्हणजे (षड्जाची तार) चढवून षड्जाला ऋषभ करावा. उतरमंद्रा मूर्च्छनेच्या षड्जाला निषादाच्या अपेक्षेने (षड्जाची तार उतरवून) निषाद करून घ्यावा. अर्थात त्या त्या प्रयोगात जो स्वर बलवान असेल त्याच्यात लोप्य स्वराचा अन्तर्भाव करावा म्हणजे तो स्वर जोरदारहि होइल.

काकुविधानाच्या अध्यायात सप्तस्वर तीन स्थानांत असल्याचे सांगितले होते. तर मग त्यांपैकी कोणत्या सप्तकाला धरून मूर्च्छना कराव्या? असा प्रश्न जे करतात, त्यांना उतर देतात :- **मध्यमस्वरेणतु** इ. येथे (स्वरांची) जात निर्देश करण्यासाठी एकवचन वापरले आहे. मध्य स्वरांनी (मध्यम सप्तकातील स्वरांनी असा अर्थ आहे. 'वैण' शब्द शारीर स्वरांसाठी अयोग्य असताहि स्थान समजविण्यासाठी तो येथे वापरला आहे. वीणेवर .................. स्वर बांधलेले असल्यामुळे वीणेवरील मूर्च्छनांच्या (स्वरस्थानात बेसुरपणाचा) दोष उत्पन्न होणार, म्हणून मूर्च्छना करण्यासाठी वीणा ही उपयुक्त नाही असे मानणारे अन्य विद्वान या वाक्याचा **बैणवेन** असा पाठ स्वीकारतात.

**कार्य** :- करणांश होतो, असा अर्थ. **अनाशित्वान्मध्यमस्य** = स्वरस्वरसप्तकाचा हा विशेष अर्थ समजावा. निग्रह मंद्रक्रिया आणि पर्यग्रह म्हणजे तारक्रिया अर्थात मंद्रतारक्रिया असा या शब्दांचा अर्थ कित्येक करतात. अर्थात अशी क्रिया मध्यमाच्या (म्हणजे मध्यमसप्तकाच्या) अपेक्षेने शक्य आहे, अन्यथा नाही, असे म्हटले आहे.( निग्रहः) निःशेष ग्रह म्हणजे स्थानप्राप्ति, (पर्यग्रहः =) 'परितः' म्हणजे सर्व बाजूंनी अग्रह म्हणजे ( सर्व स्थानांची ) अप्राप्ति ( असा अर्थ समजल्यास ) त्यामुळे पूर्ण शारीरवाल्याच्या (= आवाज तिन्ही स्थानांत फिरणाऱ्या) किंवा अपूर्ण शरीरवाल्या (गायकाच्या कंठात) मध्यसप्तक हे तर अवश्य असतेच. कंठातील चतुर्थ स्वर हा मध्यम असा अर्थ दुसरे करतात. वीणा अपूर्ण स्वरांची असली तरी तिच्यावर मध्यमसप्तक खात्रीनेच असते. (दुसरा अर्थ) षड्जग्रामात षड्जाचा लोप करून तानक्रिया केली असता त्या मूर्च्छनेच्या क्रमांकाचे ज्ञान कसे होऊ शकते, अशी शंका घेऊन म्हणतात. **मध्यमस्वेरण** इ. **निग्रहे** स्पर्श न केला असता, किंवा **पर्यग्रहे** प्रवेश केला असताहि (दोन्ही क्रियांत) मध्यम हा स्वर

(मूर्च्छनेत) अविनाशी असल्यामुळे त्याच्या अपेक्षेने (ही मूर्च्छना अमुक क्रमांकाची आहे.असे) जाणता येते. कुठल्या तरी (मध्य, तार आदि ) स्थानाचा षड्ज लुप्त झाला (तरच तान उत्पन्न होते.) मध्य किंवा तार ( = द्विचतुर्थ) षड्ज कायम असता ती (षड्जलोपाची) तान होणारच नाही. म्हणून त्याबाबत दत्तिल म्हणतात. -

" असे केल्यावर तानेमधील लुप्त स्वराचा क्रमांक मोजला असता ती मूर्च्छना अमुक क्रमांकाची आहे असे विद्वानांनी ओळखावे. (द. ३७) (शंका :- ) (षडजग्रामाच्या) पहिल्या व सातव्या मूर्च्छनेत षड्ज लुप्त असला तर त्या दोन्ही मूर्च्छनांचे स्वरूप ' रि-ग-म-प-ध-नि' असे होते,ज्याचा विशेष (म्हणजे मूर्च्छना पहिली की, सातवी) हा समजण्यास कठीण जातो. (निराकरण :-) खरे आहे. अशा तऱ्हेने मांडल्या गेलेल्या दोन्ही मूर्च्छनांत भेद दिसत नाहीत. परंतु वास्तविक पाहिले तर त्या दोघांत भेद आहे. ( कसा? तर) स-रि-ग-म-प-ध-नि' ह्या मूर्च्छनेनंतर ' नि-स-रि-ग-म-प-ध ' अशी मूर्च्छना निषाद आरंभक मानून केली तर तिच्यात दुसऱ्या (तार) सप्तकाचा स्वर येत नाही; त्यामुळे अशा मूर्च्छनेत जर षड्जाचा लोप असला तर, त्या दोन्हीत भिन्नता दिसणार नाही. परंतु अशा स्थितीत दत्तिलाचार्यांनी सांगितलेले क्रमरूपत्व कामालाहि येणार नाही. अशा मूर्च्छनेच्या तानेत ( वर्ज्य स्वरामुळे) अशा अडचणी पुष्कळच येणार. पण वास्तविक मूर्च्छना (षड्जग्रामात) अशा असावयाला पाहिजेत. प्रथम मूर्च्छना 'सारेगमपधनि' अशी करून दुसरी मूर्च्छना षड्जाखालील मंद्र सप्तकातल्या निषादाने आरंभ करावयाची असते, त्याप्रमाणे ती निसरिगमपध अशी होते. त्यानंतरची मूर्च्छना पुन्हा निषादाखालच्या धैवतावरून, त्यानंतरची त्याच्या खालील पंचमावरून याप्रमाणे शेवटची मूर्च्छना ऋषभावरून घेतली जाईल. याप्रमाणे मूर्च्छना मंद्रसप्तकाचे क्रमाने आक्रमण करीत जाईल व तेवढी मध्यसप्तकातून हटत जाईल. तर असे झाले असता मंद्र षड्ज, ऋषभ आदि स्वरांच्या मूर्च्छनांच्या अंती ऐकू आल्यामुळे सातवी मूर्च्छना लुप्त मूर्च्छना आहे हे कळून येते. प्रथम तारसप्तकात सुरूवात करून क्रमाक्रमाणे अवरोह करीत मध्यसप्तकात ज्या सहा मूर्च्छना तयार होतील त्यांतहि वरीलप्रमाणेच क्रम राहील.म्हणजे ' सरिगमपधनि ' ह्याप्रमाणे सुरूवात होऊन पुढे अवरोहाने (तार) षड्जाखालील निषादावरून नंतर धैवतावरून, पुढे पंचमावरून, मग मध्यमावरून नंतर गान्धारावरून व शेवटी ऋषभावरून अशा प्रकारे यांचा क्रम राहील. त्यामुळे (पहिल्या म्हणजे षड्जाच्या मूर्च्छनेत ) जरी सप्तकान्तराचा (तार षड्जाचा) स्पर्श नसतो, तरीसुध्दा षड्जाच्या स्थिर स्थानानंतरच्या ऋषभाचा प्रयोग होऊन रिगमपधनि ही मूर्च्छना ऐकावयास आल्यानंतर ही प्रथम मूर्च्छना (उतरमंद्रा) आहे व तीत षड्ज लुप्त आहे, ही गोष्ट सहज समजण्यात येते. (मूर्च्छना करण्याच्या दुसऱ्या विधींप्रमाणे) षड्जाचे स्थान ऋषभाने आक्रांत केले असता (ऋषभाची मूर्च्छना षड्जाच्या स्थानावरून सुरू केली असता) आधारवर्ती अशा षड्जाचा संभवच राहात नाही.म्हणून ' रिगमपधनि ' असे स्वर ऐकल्यावर सहज कळून येते की, तारषड्ज या मूर्च्छनात असावयास पाहिजे होता. तो ऐकावयास आला नाही म्हणून ही मूर्च्छना लुप्त षड्जा आहे.अशाप्रकारे (मूर्च्छना स्थापन करण्याच्या ) दोन्ही पक्षांतहि क्रमरूपतेमुळे सिध्द होणारी स्थानप्राप्ति स्पष्टच होते. 'निग्रह' म्हणजे मध्यमग्रामात पंचमाची (एक) श्रुति कमी होणे, अशाप्रकारे

पंचमाचा ऋषभाशी संवाद न होणे ते पर्यग्रहण होय. षड्जग्रामात व मध्यग्रामात मध्यमाचा नाश (= लोप) होत नाही. मध्यमाच्या पुढे या पंचमाची प्राप्ति व्हायची असते, त्याच। मध्यग्रामात 'निग्रह ' म्हणजे (एका श्रुतीचा) नाश होतो. त्याचप्रमाणे षडजग्रामात ह्या पर्यग्रहाचा म्हणजे प-रि यांच्यातील संवादी नसण्याच्या स्वरूपाचा नाश नसतो.अति उंच नाही आणि अति न्यून नाही असा जो मध्यमगतीचा त्रिश्रुतिक (पंचम) त्याचा षड्जग्रामात नाश होतो, असे समजावयाचे आहे. तर मग ऋषभाचे सुध्दा अनाशित्व असावयास पाहिजे अशी शंका घेऊन तिचे निराकरण करण्यासाठी सांगतात - निग्रहे [१०] म्हणजे निषादाचे ग्रहण करावयाचे असता जो त्रिश्रुतिक असा धैवत आहे, तेथपर्यंत करावे ? ही गोष्ट दत्तिलाचार्यांनी अशी सांगितली आहे. -

" मध्यमग्रामात पंचम आणि षड्जग्रामात धैवत अनाशी जाणावा आणि मध्यम हा स्वर सर्वत्र अनाशी समजावा (द्-२०) (शंका :-) रि हे व्यंजन असता ते स्वराचा अनुकार कसा करते? त्याचप्रमाणे सकारादिहीकाय रूपाने आहेत? ( रि हे) ऋषभ या शब्दाचे आद्याक्षर नाही, तसेच सकार हा षड्ज या शब्दाचे पहिले अक्षरही नाही. (निराकरण :-) हे नुसते संकेत आहेत, रि किंवा ऋ दोन्हीं निर्दोष आहेत. दुसरे (विद्वान मानतात की,) दत्तिलाचे मत भरतमुनींना इष्ट नाही. मध्यम हा एकच स्वर अलोप्य मानून तसे त्यांनी सांगितले आहे. (शंका=) जाति, राग व भाषाराग हे प्रयोगाला उपयोगी असतात, तशा मूर्च्छना ह्या उपयोगी नसतात. (मग त्या येथे का सांगितल्या?) तानांचा उपयोग (फक्त) कुतपामध्ये आहे. (त्यामुळे त्यांचे येथे प्रयोजन काय? जातींतील स्वरांचा लोप समजण्यासाठी तानांचा उपयोग आहे असे म्हणावे तर ) तानांना सांगितलेल्या (लोप्य) स्वरांहून निराळ्या स्वरांचा लोप जातीमध्ये होत असलेला आढळून येतो. उदाहरणार्थ :- षड्जग्रामिक षड्जमध्या ह्या जातीचे षाड्वरूप गान्धार वर्ज्य झाल्यामुळे होते, पण षड्जग्रामाच्या तानात गान्धारवर्जित तान सांगितलेली नाही.

स-रि-प-नि एवढयाच स्वरांचा लोप सांगितला आहे. तानांची गणना करताना मध्यमग्रामात पंचमाचा अलोप, षडजग्रामात धैवताचा अलोप, आणि दोन्ही ग्रामांत मध्यमाचा अलोप पुन्हा काय कारणाने सांगितला आहे? (निराकरण :-) पूर्वी पाच हजार तेहतीस एवढ्या ज्या कूटताना दाखविल्या आहेत, त्यांचा त्याप्रमाणे प्रस्तार, नष्टोद्दिष्ट व संख्या आचार्यांनी विस्ताराने सांगितली आहे. नष्टोद्दिष्ट व संख्या यांचे पूर्ण ज्ञान होण्याचे साधनहि तेथेच सांगितले आहे. त्याचे लक्षण :- " अन्त्यस्यैकान्त्याद्भेदसंख्याम् " हे होय. (ज्या तानांचा) संकर होतो त्या ताना 'साधारण' म्हणून टीकाकारांनी दर्शविल्या आहेत.

(तानांच्या विषयासंबधी) पूर्वी निर्देश केलेल्या नष्टोद्दिष्टाच्या माहितीसाठीचे श्लोक येथे पहिल्याने देतो :-

" उद्दिष्टः-(मूलक्रमाच्या अन्त्य स्वराच्या मागे मोजीत गेल्यावर उद्दिष्टाच्या शेवटच्या स्वराच्या जो क्रमांक असेल'त्या क्रमांकाने युक्त अशा खालच्या कोष्टकात लोष्ट टाकावे. (नंतर ज्याची संख्या निघाली आहे, तो स्वर सोडून देऊन पुन्हा मूलक्रमाच्या मागे मोजीत जाऊन उपरिनिर्दिष्ट रीतीप्रमाणे (लोष्टचालन

करावे. याप्रमाणे लोष्ट ज्या कोष्टकात गेले असेल त्या सर्व कोष्टकातील संख्यांची जी **बेरीज होईल, ती)** उद्दिष्टांची संख्या जाणावी.

(नष्ट :-) मौल (= शून्ययुक्त पहिल्या पंक्तीतील एक) या संख्येसहित खालच्या (दरेक **ओळीतील)** एकेका कोष्टकात जेवढी संख्या असेल तेवढ्या संख्येचा तो प्रत्येक स्वर (अपेक्षित तानेतील) **समजावा.** (नंतर दरएक वेळी मिळालेला स्वर सोडून) पुन्हा दुसऱ्या संख्येचा स्वर निश्चित करावा. **याप्रमाणे त्या** अनेक कोष्टकांतील निरनिराळया संख्यांवरून (अपेक्षित तानेतील सर्व स्वरांचा) बोध होईल.'' **ही माहिती** येथे न देता ह्या सर्वांचे सार मुनी सामान्यतः एका वाक्यात सांगतात :- **प्रयोक्तुः श्रोतृसुखार्थं च मूर्च्छनातानानानात्वम्** इ.. म्हणजे मूर्च्छना व ताना सांगितल्या त्यांचा उपयोग कोणत्या प्रसंगी **करावयाचा** त्याबद्दल खुलासा करतात की, तानांचे रूप हे मूर्च्छनासाठी आहे, जे प्रयोक्त्यांच्या सुखासाठी **सांगितले** आहे, आणि श्रोते आगमाचा अर्थ जाणणारे असले तर त्यांनाहि त्यांचा उपयोग आहे. यासंबधीचा **खुलासा** असा :- ह्या शास्त्रात यद्यपि मूर्च्छनांचा उपयोग नाही, तथापि सामक्रियेमध्ये त्यांचा उघडच **उपयोग केला** जातो. शास्त्रात तसे सांगितले ही आहे :- **उत्तरमन्द्रया तिस्त्रो गाथा** इ . शिवाय **अग्निष्टोमीयमाद्यं स्याद् द्वितीयं वाजपेयिकम्** इत्यादि. ह्याप्रमाणे त्यांच्या नावांचा उल्लेख करून **वायुपुराण** वगैरे ग्रंथात **यज्ञोपयोगी** साम, ऋक्, व गाथा यांच्यासाठी या तानांचा उपयोग दाखविला आहे. (शिवाय **शास्त्रपुराणात)** 'अग्निष्टोमिकसामेन शिवं स्तुत्वाऽथ तत्फलम्'' (म्हणजे अग्निष्टोमिकसामाने शंकराची स्तुति **करून मग** त्याचे फळ मिळते. इत्यादी वचनाने (मूर्च्छना वा ताना) गाणाऱ्याला अदृष्ट फळ मिळते, **असे सांगितले** आहे. त्याचप्रमाणे ' सदस्यमग्निष्टोमसाम शृण्वतः (शृण्वन् ?) पातकैर्मुच्यते, लोकान्जयति **(म्हणजे सद्स** मधील अग्निष्टोमसाम ऐकणारा पातकांपासून मुक्त होतो व (देव) लोक जिंकतो.)इत्यादी **म्हटले आहे.** (याविषयी आणखी एक श्लोक प्रसिध्दच आहे तो असा- '' दक्षप्रोक्तं पठेद्यश्च '' इ. **म्हणजे ''दक्षाने** म्हटलेले ( मंत्र) जो कोणी रोज सकाळ संध्याकाळी शुध्दषड्जा (मूर्च्छनेने) म्हणेल किंवा **जो ऐकेल, ते** दोघेही रुद्रलोकाला पावतील.''

ह्याप्रमाणे प्रयोगकर्त्यांना अद्दष्टाद्वारे सुखोत्पादक अशा मंत्र-गायनाचा उपयोग दाखविला **आहे.** त्याचप्रमाणे ऋक् ,गाथा आणि साम यांना उपयोगी असल्यामुळेच **नारदीय शिक्षा,व पुराणे इत्यादींत** तानांपर्यंतच स्वरमण्डल सांगितले आहे.उपनियमाद्वारे मूर्च्छनांचे जे नानात्व सांगितले आहे, **ते श्रोत्यांच्या** (धार्मिक) सुखासाठी व प्रयोगकर्त्याचे (धार्मिक) कर्म म्हणून सांगितले आहे. याचा सारांश **हा की जातींचे** षाडव-ओडव प्रकार जरी नियमित असे सांगितले आहेत, तरी राग व भाषाराग यांत **(याबाबतचे)** वैविध्य व स्वातंत्र्य हे श्रोत्यांना सुखजनक होण्यासाठी ठेवले आहे. अर्थात एक मध्यम **तेवढा सोडून** त्यात अन्य कोणताहि स्वर वर्ज्य होऊ शकतो.

कूटताना का सांगितल्या नाहीत असे कोणी विचारील, तर (त्याचे उत्तर असे की. -) मूर्च्छना-तानांप्रमाणे तानांचे कूटत्व हे प्रयोगकर्त्याला सुखकारक असे नाही. केवळ त्यांची गणना चौऱ्याऐंशी अशी सांगितली आहे. विशिष्ट देवतांना संतुष्ट करण्यासाठी त्यांचा उपयोग ठराविक धर्मकृत्यात मात्र होतो, तथापि असा विशेष उपयोग न मानला तरी त्यांचा सामान्य असा उपयोगहि दृष्टीस पडतो.

या कूटतानांची गणना (ग्रंथकारांनी) केलेली नाही असे (आम्ही म्हटले आहे, त्याचे कारण) ह्या ताना अनंत असल्यामुळे त्यांची गणना कशी करता येईल? जसे **माघकवीने** म्हटले आहे की :- अनन्ता वाङ्मयस्याहो गेयमध्ये च चित्रतां (चित्रता?) (**माघ** २।७२ ) म्हणजे ' गानामध्ये वाङ्मयाचे वैचित्र्य अनंत प्रकारचे आहे.' ) एकमेकांशी मिळवून बत्तीस वगैरे केल्या असता( पुढे त्यांची संख्या भरमसाठ वाढत असल्यामुळे) त्यांची गणना खुद्द वाचस्पतीलासुध्दा करणे अशक्यच आहे. (आक्षेप :-) असे आहे तर मग त्यांचा उपयोगच काय? (उत्तर :-) तसे नव्हे, कारण जर योग्य प्रयोगकर्ता असेल तर (मूर्च्छनाताना) श्रोत्यांना सुखदायकच होतील, म्हणून त्या योग्यच आंहेत असे दाखविण्यासाठी म्हणतात :- **मूर्च्छनातान-प्रयोजनमपि** इ. ऋक्, गाथा व साम यांच्या गायनात मूर्च्छनातानाची प्रकर्षाने योजना विशेष रंजक स्थानाच्या प्राप्तीसाठी करावयाची असते. .......... (मूर्च्छनातानामुळे) षड्जस्थानात संचरण होऊन (प्रयोगकर्त्याला ठराविक स्वरसमुदायात फिरत करण्याच्या) स्वातंत्र्याचा लाभ होतो आणि त्यामुळे उत्पन्न होणारा स्वरप्रयोग श्रोत्यांना अतिशय रंजक होतो. शिवाय प्रयोगकर्त्याने स्वतः श्रवण केल्या असता त्यालाहि सुख मिळते. श्रुतींचा लाभ झाल्यामुळे ............ ग्रामराग व भाषाराग यांचे गायनवादन करण्याचीहि चांगली सोय होते. जाति किंवा राग हा संपूर्ण असल्यास संपूर्ण अशा क्रमाक्रमयुक्त मूर्च्छनेच्या प्रयोगामुळे रागप्राप्ती चटकन होऊ शकते. राग अपूर्ण (=षाड्व-ओडव) असल्यास तानप्रयोगामुळे (स्वरांचे) वर्ज्यत्व (आपोआपच) होऊ शकते. ग्रामराग इत्यादींत सर्व मूर्च्छनादिकांचा निरनिराळ्या रीतीने प्रयोग (होत असल्यामुळे ) मूर्च्छना अनेक असणे योग्यच आहे. त्यांची इयत्ता अशी नाही, हे तर स्पष्टच आहे.

**स्थानप्राप्त्यर्थं** असे म्हटले आहे, तर मग हे स्थान तरी कोणते? अशी शंका घेऊन म्हणतात.- **स्थानं तु** इ. **पूर्वोक्तं** म्हणजे पूर्वी सांगितलेले, याचा अर्थ स्पष्टच आहे. काकुविधानामध्ये त्रिविध (स्थान ) म्हणून अगोदरच सांगितले आहे. त्याप्रमाणे (तिन्ही स्थाने) सहासष्ट श्रुतींनी युक्त होतात. (याप्रमाणे स्थान) संक्षेपाने तीन प्रकारचे असून त्यांत वर्णालंकाराचा उपयोग करण्यात येतो.

**साधारणमिदानीं व्याख्यास्यामः ।**
**तत्र साधारणं नामान्तर - स्वरता, कस्मात् ?**
**द्वयोरन्तरे भवति यत्तत्साधारणम् । यथा -**
**छायासु भवति शीतं प्रस्वेदो भवति चातपस्थस्य ।**
**न च नागतो वसन्तो न च निःशेषः शिशिर - कालः ॥ ३४ ॥**
**इति काल - साधारणता ।**

आता साधारणाचे व्याख्यान करतो :-

साधारण म्हणजे अन्तरस्वरता, ती कशी? तर दोहोंच्या मध्ये जे असते ते साधारण, उदाहरणार्थ :- छायेत (गेले) तर थंडी लागते आणि उन्हात गेले तर घाम येतो. (त्यामुळे असे वाटते की,) वसंत ऋतु लागला नाही असे नाही. आणि शिशिरकाल पूर्णपणे संपला नाही असेही नाही. ॥ ३४ ॥

ही झाली कालसाधारणता.

अ.भा. याप्रमाणे तानांच्या स्थानाची व्याख्या केल्यानंतर साधारणकृत असा जो (मूर्च्छनांचा) चौथा भेद त्याचे व्याख्यान करण्याचा उपक्रम करतात. **साधारण** इ. (दोन्हींच्या) अंतरात (=मध्ये) असलेला तो अंतर, म्हणजे स्वतःच्या स्थानापासून च्युत होऊन परस्थानाचे ज्याने आक्रमण केले आहे, तो (स्वर). ह्याला स्वतःला रक्ति नाही आणि हा विस्वरहि नाही, त्याचा हा जो भाव ते साधारण होय. हा साधारण्य असा भावप्रधान निर्देश समजावयाचा आहे. जातींच्या बाबतीतहि, 'अन्तरे भवं' ह्या स्पष्टीकरणानुसार जातींच्या विभागाच्या समानतेमुळे (समान) स्वरसमुदाय ज्या प्रयोगात येतो, त्याचा भाव ते जातिसाधारण होय. हे त्याचे सामान्य लक्षण समजावे. कस्मात् इ. म्हणजे लौकिकात ह्या (साधारण्या-)चे उदाहरण आहे किंवा नाही, या प्रश्नाला उत्तर देण्यासाठी सांगतात की, **द्वयोरन्तरे** इ. = छायेत गेले तर थंडी लागते आणि उन्हात गेले तर घाम येतो, त्यामुळे असे वाटते की, वसंत ऋतु आला आहे असेहि नाही आणि शिशिर ऋतु संपला आहे असेहि नाही. हीच गोष्ट सांगतात - **न च नागतः** इ म्हणजे (वसंत ऋतूचे) आगमन न होणे, एवढेच निराकरण; पूर्णता नव्हे हा अर्थ. **निःशेषः** म्हणजे नष्ट झाला नाही, किंवा संपूर्ण झाला नाही. तर वरील दोन अर्थांच्या मधल्या अर्थाने मध्यवर्ती असा जो काल तो साधारण. ह्या उदाहरणानुसार दोन स्वरांचा मध्यवर्ती असा जो काल तो साधारण. ह्या उदाहरणानुसार दोन स्वरांचा मध्यवर्ती जो स्वर तो साधारण स्वर होय. ॥ ३४ ॥

**तत्र द्वे साधारणे जाति - साधारणं स्वर - साधारणं च ।**
**स्वर-साधारणं काकल्यन्तर- स्वरौ । तत्र द्वि - श्रुत्युत्कृष्टो निषादः काकली- संज्ञो भवति ।**
**तद्वद्गान्धारोऽन्तर स्वर-संज्ञो भवति ।**

**जाति - साधारणमेकांशानामविशेषाज्जातीनां तु समवायात् प्रत्यंश-लक्षण-संज्ञानमिति ।**
**न्यासान्तर-भागौ(मार्गौ?) तु विशेषकौ।**
**स्वर-साधारणं द्विविधं द्वै - ग्रामिक्यम्, कस्मात् ?**
**साधारणमत्र स्वर-विशेष इति कृत्वा षड्जसाधारणमुच्यते ।**
**एवं मध्यमेऽपि । अस्य तु प्रयोगसौक्ष्म्यात्कैशिकमिति द्वितीयं नाम निष्पद्यते ।**
**कलत्वाच्च काकली - संज्ञो भवति, विकृतत्वाच्चानंशः ।**
**आप्तोपदेशाच्च सप्तभ्यो नान्यो, निषादवानेव ।**
**यथा हि षण्णां रसानामन्यतमः क्षार - संज्ञितस्तथा निषादः**
**काकली संज्ञो गान्धारश्चान्तर - स्वर-संज्ञो भवति ।**

(गांधर्वसंगीतात) दोन साधारणे आहेत, एक जातिसाधारण व दुसरे स्वरसाधारण. स्वरसाधारण म्हणजे काकली व अन्तर हे दोन स्वर. निषादाला दोन श्रुतींनी चढविला असता त्याला काकली ही संज्ञा (दिली जाते.) त्याचप्रमाणे (गान्धार दोन श्रुतींनी चढविला म्हणजे त्या) गान्धाराला अन्तरस्वर हे नांव (देण्यात येते.)

ज्या जातींचे अंशस्वर एकच आहेत, त्यांचे वैशिष्ट्य न दाखविता (प्रयोग केला असता त्या जातींची परस्पर समानता दिसते, अशावेळी) जातिसाधारण होते. (अनेक जातींच्या समान) अंशस्वरांच्या लक्षणा-मुळे त्या जातींत थोडेसे परस्पर साम्य दिसत असले तरी त्या त्या जातीच्या ग्रहन्यासादि अन्य विशेष लक्ष णांच्या समवायामुळे ( त्या त्या जाति एकमेकाहून भिन्न होतात.) कारण न्यास व अन्तरमार्ग हे (दरेक जातीचे) विशेष आहेत. (= वैशिष्ट्य आहे.) स्वरसाधारण हे दोन प्रकारचे असून दोन ग्रामांत होणारे असे आहे.' साधारण ' हा येथे एक स्वरविशेष असल्यामुळे त्याला (षड्जग्रामात) षड्जसाधारण म्हटले जाते. याचप्रमाणे मध्यग्रामातहि (मध्यमसाधारण होते असे समजावे.) ह्याच्या प्रयोगाच्या सूक्ष्मतेमुळे याला कैशिक हे दुसरे नांव दिले जाते. 'कलत्वा'- (तीव्रत्वा-) मुळे काकली ही संज्ञा स्वरांना देण्यात येते. हे (अंतर- काकली दोन्ही स्वर) विकृत असल्यामुळे अनंश आहेत. (म्हणजे जाती किंवा राग यामध्ये अंश होऊ शकत नाहीत. शिवाय) आप्तोपदेशामुळे सातांपेक्षा जास्त स्वर असू शकत नाहीत, त्यामुळे (काकली) हा निषादच म्हटला जातो. (स्वादाचे) रस सहाच असता त्यापैकी कोणा एका रसाला क्षार ही संज्ञा दिली जाते, त्याचप्रमाणे येथे निषादाला काकली व गान्धाराला अन्तरस्वर या संज्ञा देण्यात येतात.

अ. भा. - ह्याचे विभाग दाखवितातः **द्वे.** इ. याचे कोणी आणखी प्रकार तानसाधारण, श्रुतिसाधारण वगैरे सांगतात ते योग्य नाही. षड्जग्रामात षाडुवौडुवित प्रकारात निषादाचा लोप होतो. औडुवितत्वाने गान्धाराचा लोप होतो. मध्यमग्रामात ह्या स्वरांचे लोप विपर्ययाने होतात. कारण ह्या ग्रामातील स्वरांचा लोप करण्याचे नियम विशेष रूपाने आहेत. त्यामुळे कोणी एकाने म्हटले आहे, ते तानसाधारण होऊ

शकत नाही. त्याच प्रमाणे श्रुतिसाधारणहि होत नाही. कारण निषाद-गान्धारांशिवाय दुसऱ्या कोणत्याही स्वराचा लोपदशेमुळे श्रुत्युत्कर्ष होत नाही.

आता प्रथमतः सांगतात :- **तत्र साधारणम्** इ. नंतर ह्या दोन साधारण स्वरांचे लक्षण सांगतात :- **द्विश्रुत्युत्कृष्टो निषादः** इ ह्या दोन साधारण स्वरांची (काकली ही एकच) संज्ञा करण्यात एक हेतु आहे. तो हा की, व्यवहारासाठी ह्या दोन स्वरांना भिन्न संज्ञा दिल्या जातात, परंतु परमार्थतः दोन्ही स्वरांचे तीव्रतरत्व असल्यामुळे त्यांचे काकलीत्वच आहे. ते असे सांगतात :- **कलत्वाच्च काकलीसंज्ञः** इ. त्याचप्रमाणे ह्या दोन्हींचे अंतरस्वरत्वहि आहे, ते जसे :- **साधारणं नामान्तरस्वरता** इ. आता दुसरे (जाति-) साधारण त्याचे लक्षण सांगतात :- **जातिसाधारणमेकांशानामविशेषाद्** इ. अनेक जातींचा वैशिष्ट्यहीन प्रयोग केला गेला,तर तो केवळ वादीरूप अंशाला प्रदर्शित करणाऱ्या अंतरमार्गाच्या स्वरूपाचा होत असल्यामुळे त्या जाती समान वाटतात. (हे जातिसाधारण होय. ) कोणत्या एका भागावर जातिसाधारण अवलंबित असले आणि त्या तेवढ्या भागांमुळे त्या जातींचा अभेद दिसला तरी पण त्या जातींचा कोणता तरी भाग (त्यांचे परस्पर भिन्नत्व दाखविणारा) असाधारण असा असावयास पाहिजे,. या शंकेला उत्तर देतातः- **जातींना तु समवायात्प्रत्यंशलक्षणसंज्ञानम्** इ. = समान अंशामुळे जातींचे विलक्षण साम्य (किंचित्काळ) होत असले, तरी ग्रहन्यासादि दहा लक्षणांच्या समवायामुळे त्या त्या जातीचे असाधारण लक्षण (=स्वरूप) जाणता येणे शक्य होते. हीच गोष्ट स्पष्ट करतात :- **न्यासान्तरभागौ (मार्गौ ?) तु विशेषकौ** इ. या वाक्यातील तु शब्द व्यतिरेक दाखवितो, त्यामुळे अशा जातींचे अभिन्नत्व होत नाही. तात्पर्य, **स्वरसाधारणं द्विविधं** इत्यादि ग्रंथवाक्याचा अर्थ ग्रहादि भागांच्या लक्षणाचे ज्ञान ते जातिसाधारण' असा कित्येकांनी आपल्या टीकेत केला आहे; त्याचप्रमाणे ग्रामद्वयात काकल्यन्तरांचा प्रयोग सांगितला आहे आणि गान्धार निषादांचे अल्पत्व असते अशा स्थितीत (वापरले जाणारे काकल्यन्तरांचेच) दुसरे नाव भरतमुनींनी षड्जग्रामात षड्जसाधारण आणि मध्यमग्रामात मध्यमसाधारण असे दिले आहे(असा खुलासा हे टीकाकार करतात.) यांचे हे म्हणणे आम्हांला निरर्थक वाटते. कारण मूर्च्छनाच स्वरसाधारणकृता होते, हे सांगितल्यावर, पुन्हा (स्वरसाधारणं द्विविधं) असे म्हणतात, त्याने अधिक ते काय सांगितले जाते ? (दुसरे टीकाकार म्हणतात की, ग्रामद्वयात (साधारण स्वरांची ) व्यवस्था दाखविण्यासाठी असे सांगितले आहे. जसे की, - षड्जग्रामात (जाति) षाडव करावयाची त्यावेळी निषाद काकली घ्यावयाचा आणि (जाति) ओडव करावयाची असता गांन्धार हा अंतर घ्यावयाचा याचे नाव षड्जसाधारण. याच्या विपरीत मध्यमग्रामात करावयाचे असते, ( ते मध्यमसाधारणं होय) पण यांच्या या कथनाचा विशेष आशय काय तो निघतो ? कैशिक (नावाचे साधारण)म्हणजे जर अंतर - काकली स्वरच आहेत आणि ते ग्रामभेदाने निषाद-गान्धाराच्या वर्ज्यत्वामुळे होणाऱ्या षाडव - ओडव प्रकारात उपयुक्त आहे, तर मग संपूर्ण षड्जकैशिकी जातीत आणि ऋषभ धैवताच्या लोपामुळे षाडव - ओडव होणाऱ्या कैशकी जातीत अशा प्रकारच्या साधारणाची व्यवस्था दृष्टोत्पत्तीस येत नाही, (ते का ? ) तसेच शुध्द व भिन्न गौडमालव आणि षड्जकैशिक या रागांची उत्पत्ति **काश्यपमुनी वगैरेनीं कैशिक जातीतून सांगितली आहे.** ( तेहि मग असंगत दिसेल). या विषयाची फोड

आमचे परमगुरू उत्पलदेवपाद अशी करतात :- " तीन,दोन, चार वगैरे (श्रुतींच्या द्वारे) स्वरांचे स्वस्थानरूप सांगितले आहे, जे प्राकृत आणि पारमार्थिक रूप आहे. षड्ज चतुःश्रुतिक इत्यादि ते निषाद द्विश्रुतिक इथपर्यंतचे स्वरांचे हे रूप म्हणजे जसे प्राण्यांचे सर्व अवयवांनी युक्त असे रूप असते, त्याप्रकारचे समजावे. पण या रूपात दोन प्रकारे फरक पडू शकतो. जसे की कुत्रा हा छिन्नपुच्छ तरी असतो, हे एक रूप मानता येईल; किंवा एक कुत्रा दोन शेपट्यांचा असतो. तर गान्धारनिषादांच्या विवादित्वाच्यासंबंधाने जी विकृति ग्रंथकर्त्याने (कैशिक या नावाने ) सांगितली आहे, त्या विकृतीमुळे षड्जमध्यमहि विकृत होतात आणि पंचमाच्या (मध्यम ग्रामिक) त्रिश्रुतिक स्वरूपालाहि विकृति होते. शिवाय त्यामुळे ऋषभाची व धैवताचीहि विकृति होते. **स्वरसाधारणं द्विविधं द्वैग्रामिक्यम्** ह्या वाक्याने ग्रंथकारांनी हीच गोष्ट प्रदर्शित केली आहे. म्हणजे हे जे काकल्यन्तर लक्षणाने दोन ग्रामांचे स्वरसाधारण सांगितले ते दोन प्रकारचे आहे. येथे पृच्छा करतात. कोणत्या कारणाने? (याचे उतर अर्थात) भावार्थ असा :- काकल्यन्तरभेदामुळेच जर (साधारणाचे) द्विविधत्व होते, ते पूर्वी सांगितलेच आहे, मग पुनरुक्ति का केली? म्हणून ही द्विविधता अन्य प्रकारची आहे आणि ती आता सांगावयाची होती,यासाठी (साधारणाचा) तो अन्य प्रकार सांगतात :- **स्वरसाधारणमत्र स्वरविशेष इति कृत्वा स्वरसाधारणमुच्यते** इ. म्हणजे जेव्हा निषाद आणि ऋषभ हे (षड्जाची प्रत्येकी एक) एक श्रुति आकृष्ट करतात, तेव्हा निषाद त्रिश्रुतिक, षड्ज द्विश्रुतिक आणि ऋषभ चतुःश्रुतिक होतो. षड्जाली साधारण (=निकट) असा ऋषभ व निषाद हया दोन स्वरांच्या आश्रयाने हे संपन्न होते, म्हणून याला षड्जसाधारण म्हणावयाचे. गान्धार जेव्हा (मध्यमाची) एक श्रुती खेचून घेतो आणि मध्यमग्रामिक पंचम जेव्हा मध्यमाची एक श्रुती ग्रहण करतो, तेव्हा धैवत चतुःश्रुतिक असतोच आणि त्यामुळे मध्यमग्रामिक स्वरांत फरक (= हानि) पडतो. मध्यमाच्या आश्रयाने हे घडते म्हणून याला मध्यम साधारण असे नांव दिले जाते. पण निषाद-गान्धारांच्या दोन श्रुती चढण्याने साधारण होते, असे पुन्हा कसे सांगितले? अशी शंका घेऊन तिचे (निराकरण करण्यासाठी ) म्हणतात. **साधारणमत्र** इ. = पूर्वी सांगितलेल्या स्वरांच्या स्वरूपापेक्षा आताच्या या स्वरांचे स्वरूप विशेष व विलक्षण आहे. आणि याच स्वरूपाच्या स्वरांचा प्रयोग साधारणतेत होतो. ह्या वचनाने ग्रंथकार असे सुचवितात की, सर्वच स्वरांच्या उच्चनीचत्वाने (त्यांच्या स्वरूपात) वैचित्र्य उत्पन्न केले जाते, असे (इतर ग्रंथकारांचे) कथन आहे; परंतु गान्धर्वसंगीतासाठीचा (फक्त तसा) नियम सिध्द करण्यासाठी येथे स्वरांचे एकश्रुतित्व (= एक श्रुति चढणे - उतरणे) दाखविले आहे. स्वरांची याहून निराळी रूपे (= वैचित्र्यान्तर) राग भाषा इत्यादींत दिसून येतातच; जसे **वृध्दकाश्यपाने** म्हटले आहे.

" काकल्यन्तर स्वरांच्या योगे करून चार, तीन, दोन व एक श्रुतीच्या सर्व स्वरांचा प्रयोग राग-भाषांमध्ये सर्वथा करावा. षड्जादि सात स्वर,उत्कृष्ट पंचम, अन्य धैवत, काकली व अन्तर, पुन्हा षड्ज, मध्यम, गान्धार( व निषाद हे ) चार याप्रमाणे सर्व मिळून ( एका सप्तकात शुध्द व विकृत एकूण) पंधरा स्वर होतात. त्यांचा प्रयोग जातींमध्ये करावा. याचा (= कैशिक साधारणाचा ) लक्ष्य संगीतात असंभव असल्याचे दर्शविण्यासाठी संज्ञा करतात :- **अस्य तु प्रयोगस्य सौक्ष्म्यात्** इ. या वाक्यात तु हा शब्द मर्यादा

या अर्थाने आला आहे. अस्य म्हणजे षड्ज-मध्यम- साधारणाचा असा अर्थ. हे (= कैशिक) स्वर लावण्यासाठी सूक्ष्मत्व व वैचित्र्य या गुणांची निपुणता साध्य करावी लागते. **कैशिकं** = सुकुमार व हृद्य अशा स्वरूपाचा प्रयोग ती कैशिकी, अर्थात कैशिकी प्रयोगात्मता ज्यात आहे ते कैशिक. या अर्थी त्याला ' अ ' प्रत्यय लावून त्याचे कैशिक हे रूप केले आहे किंवा केसाप्रमाणे (बारीक) ते कैशिक. स्वराच्या अवसानाच्या सूक्ष्मत्वामुळे (= 'पाताग्रसौक्ष्म्यात्') हे पृथक् मानले गेले आहे.

(आता आम्ही या कैशिक स्वरांचा उपयोग सांगतो. तो असाः) षड्जकैशिकी ही जाती षाड्जी व गान्धारी या दोन जातींच्या मिश्रणाने उत्पन्न झाली आहे. हिचे स्वरूप मध्यमग्रामभेदावर अवलंबून आहे. त्यामुळे ह्या जातीत ( धैवत चतुःश्रुतिक घ्यावयाचा आहे. ह्या जातीत) ऋषभधैवत चतुःश्रुतिक असून ते दुर्बल असल्यामुळे यथायोग्य(= कैशिक) निषाद - गान्धारांचा प्रयोग करावयाचा आहे. त्याबद्दल म्हटले आहे की :- **दौर्बल्यं चात्र कर्तव्यं धैवतस्यर्षभस्यच** इ. (२८.१०५) ही जाती स्वतः षाड्जग्रामिक असल्यामुळे तिचा पंचम चतुःश्रुतिक असणे योग्यच आहे. त्यामुळे ह्या षड्जकैशिकी जातीत षड्जसाधारणाचा योग होऊन कैशिक स्वरांचा प्रयोग होतो. त्याचप्रमाणे कैशिकी ही जाति स्वयं मध्यमग्रामिक आहे. त्यामुळे तिचा धैवत चतुःश्रुतिक आहे व ऋषभहि चतुःश्रुति आहे. शिवाय तिच्यामधील ऋषभाचे दौर्बल्य सांगितले आहे. ह्या जातीत ऋषभ-धैवताचा लोप सांगितला आहे. तोहि त्यांच्या चतुःश्रुतिकत्वामुळेच समजावा. आर्षभी व धैवती ह्या सोडून अन्य सर्व जाती ह्या असाधारण (?) असून त्यांचा समावेश षड्जग्रामात होत असल्यामुळे त्यांच्या पंचमाचे चतुःश्रुतिकत्व आपोआपच असते आणि त्यामुळे त्या जातींत पर्यायी मध्यमसाधारण म्हणजे कैशिक त्याचेहि स्थान असते. ह्या जातींपासून उत्पन्न होणाऱ्या कैशिक, भिन्नकैशिक आदि ग्रामरागांतहि कैशिकाचा प्रयोग व्हावा, हे सर्व योग्यच आहे. ह्यालाच **मतंगाचार्य** आदींनी ग्रामसाधारण असे म्हटले आहे.

श्रुतिसाधारण म्हणजे सर्व स्वरांच्या ठराविक श्रुती नसणे. (शंका :-) पण निषादाचे काकली हे नांव काय कारणाने ठेवले गेले? (निराकरण) सांगतात :- **कलत्वाश्च** इ. यातील च-कार हा थोडासा या अर्थी आहे. ' इषत्कलः ' म्हणजे थोडा तीव्रभाव ज्याच्यात आहे तो काकली, किंवा 'गौरा''दित्वात्' या सूत्रानुसार ' ई ' प्रत्यय समजावा. 'काकलीसंज्ञे ' असा दुसरा पाठ आहे; त्याचा अर्थ काकली निषाद हा निषादच आहे, कारण तो (चढा असला तरी) षड्जत्वाला प्राप्त होत नाही, त्यामुळे छिन्नपुच्छ श्वानाप्रमाणे समजावयाचा आहे. विकृतत्वाच्या कारणाने त्याच्या प्राधान्याचा अभाव होत असल्यामुळे तो अनंश आहे. (आक्षेपः-) परंतु हा सातवा स्वर (निषाद) न झाला पाहिजे, कारण हा विकृत असल्यामुळे निषादापेक्षा निराळा आहे.आणि तो षड्जहि नाही, मग याला निषाद मानण्याचे कारण काय? (उत्तरः-) तेच सांगतात- **आप्तोपदेशाच्च** इ. यातील च-कार दुसरे कारण सूचित करणारा आहे, (ते असे) निषाद (या शब्दावर लोकांची) बुध्दी पूर्वीच स्थिर असल्यामुळे, त्या प्राथम्यामुळे तसा निर्देश केला गेला. याला दृष्टान्त देतात :- लवणरसालाच तीव्र क्षार असे म्हणतात आणि चरकादिकांनी त्याला मधुररस म्हटले आहे,

त्याचप्रमाणे हे समजावयाचे आहे; म्हणजे मध्यमाकडून ऋषभाकडे जाताना मधल्या अंतरात याचा प्रयोग होत असतो, त्यामुळे याचे आन्तरस्वरत्व सांगितले आहे.

**भवतश्चात्र ( श्लोकौ )--**

**अन्तर - स्वर- संयोगो नित्यमारोहि - संश्रयः ।**
**कार्यो ह्यल्पो विशेषेण नावरोही कदाचन ॥ ३५ ॥**
**क्रियामाणोऽवरोही स्यादल्पोवा यदि वा बहुः ।**
**जातिरागं श्रुतिं चैव नयते[१२] चान्तरस्वरः ॥ ३६ ॥**

(या दोन्ही स्वरांचा प्रयोगाच्या नियमाबाबत) दोन श्लोक असे आहेत :-

"अन्तर- स्वरांचा प्रयोग सदोदित आरोही करावा व तोहि अल्प करावा; विशेषतः अवरोही तर कधीच करू नये. ॥ ३५ ॥

थोड्या किंवा जास्त प्रमाणात अवरोही प्रयोग केला असता अन्तरस्वर जातींची स्वरव्यवस्था (=श्रुतिं) व रंजकता यांचा नाश करतो. ॥ ३६ ॥

अ. भा. - ह्याप्रमाणे दोन्ही साधारणे सांगितल्यावर राहिलेला विषय कारिकांद्वारे सांगतात :- **भवत-श्चात्र** इ. = साधारण- क्रिया करावयाची असता अंतर स्वरापासून आरोही जो मध्यम त्याचा आश्रय करून त्यानंतर ऋषभाकडे जावयाचे असल्यास जर अंतरस्वराचा प्रयोग केला तर तो सुरेलपणाच्या दृष्टीने चांगला योग होतो. सदोदित अल्पकार्य अशा विषयात त्याचा विनियोग करावयाचा असतो. **नावरोही** या वचनाने 'तस्यादौ' हे शेष शब्द समजावे. त्यामुळे अंतरस्वराचा प्रयोग करून अवरोहाने ऋषभ घेऊ नये, अंतरस्वर मध्यमाबरोबर योजावा, असा अर्थ. मध्यमाच्यासह जेव्हा अंतरस्वराचा प्रयोग करावयाचा असतो,तेव्हा तो आरोहानेच घ्यावयाचा असतो. मध्यमानंतर अंतरस्वराचा प्रयोग करावयाचा असता पुन्हा मध्यम अगर अन्य स्वर घेऊन आरोहच केला पाहिजे ॥ ३५ ॥

आरोहानेच अंतरस्वर घ्यावा, कधीहि अवरोही घेऊ नये, हा जो नियम सांगितला तो पुन्हा दृढ करतात :- **क्रियमाणोऽवरोही स्यात्** इ. व **अल्पो वा यदि वा बहुः** इ. ........... विपुल म्हणजे पुष्कळ वेळ चालू ठेवणे. ...... 'जाति' म्हणजे अदृष्ट (फल); 'राग' म्हणजे रक्ति हे दृष्ट फल; श्रुति इ. = रंजकतेचा विरस करतो(=प्रत्युपकारवैरस्यं नयते) म्हणजे नाश करतो. अन्तरस्वर ह्या शब्दाने येथे काकलीहि गृहीत आहे, असा हा क्रम समजावा. ॥ ३६ ॥

**जातीरिदानीं वक्ष्यामः ।**
**स्वरसाधारण - गतास्तिस्त्रो ज्ञेयास्तु जातयः ।**
**मध्यमा पञ्चमी चैव षड्जमध्या तथैव च ॥ ३७ ॥**

आसामंशास्तु विजेयाः षड्ज-मध्यम-पञ्चमाः ।
यथा [१३]- स्वं दुर्बलतरं व्यत्यासात्पञ्चमे तथा ॥ ३८ ॥

जातयोऽष्टादशेत्येवं ब्रह्मणाभिहितं पुरा ।
तास्त्वहं वर्तयिष्यमि ग्रहांशादि - विभागतः ॥ ३९ ॥

षाड्जी चैवार्षभी चैव धैवत्यथ निषादिनी ।
षड्जोदीच्यवती चैव तथा वै षड्जकैशिकी ॥ ४० ॥

षड्जमध्या तथा चैव षड्जग्राम - समाश्रयाः ।
अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि मध्यमग्राम - संश्रिताः ॥ ४१ ॥

गान्धारी मध्यमा चैव गान्धारोदीच्यवा तथा।
पञ्चमी रक्तगान्धारी तथा गान्धारपञ्चमी ॥ ४२ ॥

मध्यमोदीच्यवा चैव नन्दयन्ती तथैव च ।
कार्मारवी च विज्ञेया तथान्ध्री कैशिकी मता ॥ ४३ ॥

[स्वरसाधारण - गतास्तिस्त्रो ज्ञेयास्तु जातयः ।
मध्यमा षड्जमध्या च पञ्चमी चैव सूरिभिः ॥ ४४ ॥

आसामंशास्तु विज्ञेयाः षड्ज - मध्यम - पञ्चमाः ।
यथास्वं दुर्बलतरं व्यत्यासात्त्वत्र पञ्चमी ॥ ४५ ॥ ]

आता जाती सांगतो :-

ज्यांच्यांत स्वरसाधारणाचा प्रयोग होतो अशा जाती तीन आहेत -

त्या मध्यमा, पंचमी तसेच षड्जमध्या या (होत) ॥ ३७ ॥

या जातींचे अंश स्वर ( अंतर- काकलींच्या प्रयोगाच्या प्रसंगी) त्या त्या जातीत षड्ज, मध्यम व पंचम हे जाणावे. पंचम (अंश) असता व्यत्यासाने(= गान्धारनिषादाच्या जागी अंतर - काकली स्वर) दुर्बलतर असे वापरावे. ॥ ३८ ॥

ब्रह्म्याने पूर्वी अठरा जाती सांगितल्या होत्या. ग्रहांशादि विभागांनी त्यांचे आता वर्णन करतो.॥३९॥

षड्जग्रामातील जाती, षाड्जी, आर्षभी, धैवती, निषादिनी, षड्जोदीच्यवती, षड्जकैशिकी व षड्जमध्या (या होत) आता पुढे मध्यमग्रामातील जाती सांगतो. ॥ ४० - ४१ ॥

(त्या अशा) गान्धारी, मध्यमा, गान्धारोदीच्यवा, पंचमी, रक्तगान्धारी, गान्धारपंचमी, मध्यमोदीच्यवा, नन्दयन्ती, कार्माखी, आन्ध्री व कैशिकी. ॥ ४२ - ४३ ॥

[ स्वरसाधारण असलेल्या तीन जाती ज्ञात्यांनी जाणाव्या. त्या मध्यमा षड्जमध्या आणि पंचमी (या होत). ॥ ४४ ॥

यांचे अंश षड्ज, मध्यम व पंचम हे जाणावे. यातील पंचमी ही व्यत्यासामुळे त्या जातीनुसार दुर्बलतर (प्रयोग असणारी अशी असते.)] ॥ ४५ ॥

अ .भा. - **तिस्त्रः** म्हणजे साधारण स्वरांना घेणाऱ्या तीन जाती. ह्या तीन जातींत गान्धार-निषादांचा लोप होऊन त्या षाडव ओडव होतात तेव्हा, त्याचप्रमाणे त्यांच्या संपूर्ण अवस्थेतहि गान्धार - निषाद वक्र असून दुर्बल असतात तेव्हा त्या काकल्यन्तरात्मक असतात. त्या कारणाने स्वरसाधारणाच्या व्यापक नियमाप्रमाणे या जातींतहि त्याचा प्रयोग (आवश्यक) असतो. तसे पाहिले तर शुध्दषाड्जी जातीतहि काकलीचा प्रयोग करण्यात येतो आणि गान्धार - निषाद हे स्वर अनंश असल्यामुळे (एरवीहि) दुर्बलच असतात, त्यामुळे ह्या साधारणक्रियेसाठी कोणत्या ( विशिष्ट ) अंशाची आवश्यकता असते? (त्याचा खुलासा करण्यासाठी) म्हणतात :- **आसामंशा** इ. **यथास्वं** इ. = षड्जमध्यमा ह्या जातीत सात (स्वर) अंश असतात, त्यामुळे गान्धार - निषाद तिचे अंश असता साधारण होत नाही; स-म-प हे अंश असता साधारणाचा अतिशय प्रयोग होतो. मध्यमाजातीतहि हाच विधी समजावा, कारण ह्या जातीतहि द्विश्रुतिक वर्ज्य असून अन्य पाच स्वर तिचे अंश आहेत. पंचमी जातीचे अंश ऋषभ आणि पंचम (हे असतात.) पैकी पहिला म्हणजे ऋषभ अंश असता औडुवित रूप होत नाही, त्यामुळे पंचम अंश असतानाच ह्या जातीत काकल्यन्तर वापरण्याचा प्रसंग येतो. ही गोष्ट स्पष्ट करण्यासाठी म्हणतात :- **दुर्बलतरं व्यत्यासे** = दुर्बलमात्र करावे. अर्थात षाडवकारी गान्धाराच्या स्थानी दुर्बल अंतरस्वरांची योजना करावी व तोहि दुर्बलतर करावा. औडुवित करणाऱ्या निषादाच्या जागी दुर्बल अर्थात काकलीचा प्रयोग करावा. ॥३७-३८॥

षड्ज व काकली यांचा प्रयोग करून त्याच स्वरान्तराचा आरोहाने उच्चार करावा..... असे सांगितले. त्याचा खुलासा करण्यासाठी म्हणतात :- **जातीरिदानीं** इ. म्हणजे शुध्द-भिन्न - गौड - साधारण - भाषा-विभाषा इत्यादि रूपाने जे व्यवस्थित स्वरसप्तक असते त्याच्या योगे अनुभवास येणारी सिध्दि म्हणजे भाव व रस यांचे उपरंजन ज्या करतात, त्यांना जाती म्हणावयाचे. **ब्रह्मणा** या शब्दाने आप्तरूप शास्त्राचा आधार दाखविला आहे. याचा पुन्हा त्याच प्रकारचा भाव व्यक्त करतात. :- **वर्तयिष्यमि** = हृदयात वर्तमान म्हणजे प्रवेश करणाऱ्या ग्रह, अंश, तार, मंद्र, षाडव, ओडव इत्यादी विभागांनी वर्णन करून स्पष्ट करतो, असा अर्थ - ' षड्जग्रामसमाश्रयाः' म्हणजे षड्जग्रामाच्या श्रुति विभागाला धारण करून ज्या चालतात त्या, अर्थात षड्जग्रामाच्या आश्रयाने राहणाऱ्या जाती त्याचप्रमाणे मध्यमग्रामाच्या आश्रयाने राहिलेल्या, त्याहि (ह्या सांगितल्या). ॥ ३९-४३ ॥, ॥ ४४-४५ ॥

**स्वर - जातयः शुद्धा विकृताश्च । तत्र शुद्धाः षाड्जी,**
**आर्षभी, धैवती, निषादिनी च षड्जग्रामे । गान्धारी मध्यमा पञ्चमीति मध्यमग्रामे।**
**एताश्चान्यूनस्वराः स्व-स्वरांश - ग्रह-न्यासापन्यासाश्च ।**
**विकृता लक्ष्यन्ते । एभ्यो[१४]ऽन्यतमेन द्वाभ्यां बहुभिर्वा लक्षणैर्विक्रियामुपगता न्यास-वर्जं विकृत - संज्ञा भवन्ति । न्यासविधावप्यासां मन्द्रो नियमः विकृतास्वनियमः । तत्रैकादश संसर्गजा विकृता अपरस्पर - संसर्गादिकादश निर्वर्तयन्ति । यथा शुध्दा विकृताश्चैव हि**
**समवायाज्जातयस्तु जायन्ते ।**
**पुनरेवाशुध्दकृता भवन्तत्यथैकादशान्यास्तु ॥ ४६ ॥**
**तासां यन्निर्वृत्ता स्वरेष्वथांशेषु[१५] हानिषु च जातिः ।**
**तद्वक्ष्यामि यथावत्संक्षेपेण क्रमेणेह ॥ ४७ ॥**

**स्वरजाती** ( म्हणजे ज्यांची नावे षड्ज आदि स्वरांवरून ठेवण्यात आली आहेत त्या ) शुध्द व विकृत अशा दोन प्रकारच्या आहेत. पैकी शुध्द जाती, षाड्जी, आर्षभी, धैवती व नैषादी ह्या षड्जग्रामातील होत. गान्धारी मध्यमा व पंचमी ह्या मध्यमग्रामातील समजाव्या. ह्या स्वरजाती संपूर्ण असतात व त्यांचे नामस्वर हेच त्यांचे अंश, ग्रह, न्यास, आणि अपन्यास असतात.

विकृत जातींची लक्षणे अशी आहेत :-

वर स्वरजातींची जी लक्षणे सांगितली, त्यापैकी न्यास हे एक लक्षण खेरीज करून बाकीच्या लक्षणांपैकी एक , दोन व अधिक लक्षणांत फेरफार केला जातो, तेव्हा त्या जातींना विकृत ही संज्ञा देण्यात येते. स्वरनामक जातींचा न्यासस्वर मंद्र असावा असा नियम आहे, पण विकृत जातींना हा नियम नाही.

परस्परांच्या मिश्रणाने होणाऱ्या संसर्गज विकृत जातींची संख्या अकरा आहे. या विषयीचा श्लोक असा आहे.

" (ग्रहांशादि लक्षणांच्या) समवायाने शुध्द व विकृत जातींची उत्पत्ति होते. पुन्हा या विकृत जातींपासून अन्य अकरा जाती उत्पन्न होतात. " ॥ ४६ ॥

त्या (अकरा विकृत) जातींपैकी प्रत्येक जातीचे अंश (वगैरे) स्वर व षाडव - ओडव प्रकार यांचे वर्णन आता यथायोग्य, संक्षेपाने आणि क्रमाने करतो. ॥ ४७ ॥

अ. भा. - आता या जातींचा विभाग सांगतात :- **स्वरजातयः** इ. = ज्या जातींना स्वरांचे नांव आहे त्या. त्यांचा ग्रामविभाग स्पष्ट करतात = **तत्र शुध्दाः षाड्जी** इ. शुध्द जातींचे लक्षण सांगतात :- **एताः** इ; **अन्यूनस्वराः** = पूर्णस्वरयुक्त. **स्वस्वरांश** इ.जो अंशादिरूप स्वर असतो, तोच नामकारी असतो ज्यांचा,

त्या. येथे **च** - कार समुच्चय या अर्थी आहे. हे लक्षण विकृत जातींना लागू पडत नाही, म्हणून म्हणतात :- **विकृता लक्ष्यन्ते, एभ्यः** इ. = संपूर्णत्व, ग्रह, अपन्यास यांच्यापैकी ( एक वा सर्व लक्षणे विकृत होणे.) हीच गोष्ट स्पष्ट करतात :- **न्यासवर्जम्** इ. **विकृत संज्ञाः** इ. = संज्ञा म्हणजे सम्यग्ज्ञान, ते विशेषतः ज्यांचे त्या. या व्याख्येप्रमाणे षाडवविकृत, (ओडवविकृत), ग्रहविकृत, अंशविकृत व ग्रहांशापन्यासविकृत असे या विकृत जातींचे भेद समजावे.

ग्रह, अंश,अपन्यास ही लक्षणे बदलत असतील तर (एकाच जातीचे प्रकार) शुध्द व विकृत हे कसे ओळखता येतील ? ( या शंकेचे निराकरण करण्यासाठी सांगतात :- **न्यासविधावपि** इ. = ह्या जातीं-पैकी ज्या शुध्द जाती आहेत, त्यांचा न्यास स्वर नियमाने नामकारी आणि तोहि मंद्र असतो, विकृत जातींना हा नियम नाही. त्यांचा न्यास व अंतरमार्ग या लक्षणांमुळे........ ( शुध्द जातींच्या छायेच्या रूपाने विकृत जाती असल्यामुळे, मूळ जातींच्या) रूपाचा भास हा होतोच. हा सात जातींचा विभाग सांगितला, पण ज्या अठरा जाती म्हटल्या त्यांचे काय ? या प्रश्नाचे उत्तर देतात :- **तत्र** इ. = या रीतीने (बाकीच्या अकराहि जाती) मूळ सात (शुध्द- विकृत जातींमध्येच ) राहिलेल्या आहेत. ( कशा ? तर) त्या मूळ सात (विकृत) जातींच्या संसर्गानेच **विकृता** = विकृत ( अकरा) जाती पैदा होतात, अर्थात त्या शुध्द नसून विकृत असतात. यातील **एकादश** हे कर्मपद समजावे. हाच विषय संक्षेपाने एका आर्येत सांगतात :-

**शुध्दा विकृताश्चैव हि समवायाज्जातयस्तु जायन्ते** इ. = श्रुति - स्वर- ग्रह समूहादि कारणांच्या समवायाने उत्पन्न होणाऱ्या त्या जाती, अशी निरुक्ति समजावी. त्यांचे विभाग शुध्द व विकृत असे दोन. शुध्द जातीचेच विकृतत्व आहे असे **एव** या शब्दाने दर्शविले आहे, अर्थात निराळ्या जाती असे म्हटले नाही. **पुनरेव** =शुध्दांपासून विकृत केलेल्या अशा जातींपासून अकरा (संसर्गज) जाती होतात. यातील पुनः शब्द व्यतिरेकार्थी आहे. अर्थात फक्त अकराच होतात. त्याहून अधिक नव्हें. पुढे तु हा शब्दहि व्यतिरेक या अर्थी आहे. त्यामुळे (पूर्वीच्या शुध्दादि जातींहून) यांना भिन्न म्हणावयाचे आहे. अर्थात या शुध्द नव्हत, तर पूर्वीच विकृत होऊन त्या कारणरूप विकृतींची नावे ज्यांना दिली गेली आहेत, अशा समजावयाच्या आहेत. **अथ** शब्द समुच्चयार्थी आहे. अर्थात कारणरूप जातींच्या ज्ञात अशा अंशाची ही समुच्चिति समजावी. उदाहरणार्थ :- षाड्जी व मध्यमा यांच्या संसर्गाने झालेली म्हणून त्या जातीला षड्जमध्यमा असे म्हणायचे. 'अन्यास्तु'- इतर जाती होतात. ग्रामराग, विभाषा, वगैरे मार्ग व देशी संगीतातील प्रधानभूत अशा अन्तरमार्ग, न्यास वगैरेंच्या ज्ञानाच्या जोरावर प्रत्ययाला येत असलेले अठरा प्रकारचे अन्तर - मार्ग न्यास असा अर्थ. दुसरे विद्वान 'जाति' हिची व्याख्या अंशग्रहादि दहा प्रकारच्या योजनेमुळे उत्पन्न होणारी ती जाति' अशी करतात. ' जिच्यामुळे रसप्रतीतीचा आरंभ होतो ती' किंवा ' सकल रागादिकांच्या जन्माचे कारण, ती जाति' अशी निरुक्ति टीकाकाराने दिली आहे. ॥ ४६ ॥

आता कोणत्या विकृत जातींपासून कोणती (संसर्गज) जाति उत्पन्न होते, या शंकेच्या प्रसंगाने जातींबद्दलची आणखी काही माहिती देण्याच्या हेतूने प्रतिज्ञा करतात :-

**तासां यन्निर्वृत्ता** इ.=(त्या दोन शुध्द जातींची जी विकृत रूपे उत्पन्न झाली, त्यापासून उत्पन्न झालेली अर्थात )त्या दोघांपासून उत्पन्न झालेल्या अशा दोघां (वगैरे) पासून (किंवा) तिच्यापासून ही उत्पन्न झालेली, असा हा पंचमी तत्पुरूष किंवा कर्मधारय समास समजावा. येथे ' निर्वृत्त ' या एका शब्दाचा अध्याहार आहे. म्हणजे एकशेष आहे. **स्वरेषु** = ग्रह, अपन्यास वगैरे स्वरांनी ज्या प्रकारचे यथावत् स्वरूप ( या जातींचे)असते, ते आता सांगतो ( असे ग्रंथकार म्हणतात). **अंशेषु** = मागल्या **स्वरेषु** शब्दाने अंशाची उपलब्धी होतेच, तरी पण अंश हे मुख्य म्हणून त्यांचा येथे निराळा उल्लेख केला आहे. हानिषु = (जातींच्या) षाडव - ओडव रूपांपैकी ज्यांची जशी होतात, त्यांची तशा प्रकारची रूपे त्या क्रमाने, इह = उद्देशक्रम सोडून आता याच प्रसंगी जातिनिर्णयाच्या.अनुरोधाने सांगतो, (असे म्हणतात). ॥ ४७ ॥

**षाड्जी - मध्यमाभ्यां निर्वृत्ता ज्ञेया षड्जमध्यमा,**
**षाड्जी - गान्धारीभ्यां षड्जकैशिकी, गान्धारी - षड्ज -**
**- धैवतीभिः षड्जोदीच्यवा, षड्जा- गान्धारी - मध्यमा -**
**- धैवतीभिर्गान्धारोदीच्यवा, धैवती - पञ्चमी - मध्यमा -**
**- गान्धारीभिर्मध्यमोदीच्यवा, गान्धारी - मध्यमा - पञ्चमी -**
**- निषादवतीभी रक्तगान्धारी, गान्धार्यार्षभीभ्यामान्ध्री,**
**पञ्चम्यार्षभी - गान्धारीभिर्नन्दयन्ती, निषादवत्यार्षभी - पञ्चमीभिः**
**कार्मारवी, पञ्चमी-गान्धारीभ्यां गान्धारपञ्चमी,**
**धैवत्यार्षभी - वर्जाभिः कैशिकी ।**
**[ स्यात्षड्जमध्यमाभ्यां निर्वृत्ता षड्जमध्यमा जातिः ।**
**गान्धारी - षाड्जीभ्यां संयोगात्षड्जकैशिकी चापि ॥**
**षाड्जी - गान्धारीभ्यां, धैवत्या चापि या विनिष्पन्ना ।**
**संसर्गाद्विज्ञेया सा षड्जोदीच्यवा जातिः ॥**
**षाड्जी गान्धारी पञ्चमी तथा धैवती च खलु जातिः ।**
**गान्धारोदीच्यवतीं जातिं निर्वर्तयन्त्येताः ॥**
**गान्धारी - पञ्चमीभ्यां मध्यमया विरचिता च धैवत्या ।**
**जातिस्तु मध्यमोदीच्यवेति सद्भिः सदा ज्ञेया ॥**
**गान्धारी - पञ्चमीभ्यां सप्तम्याश्चैव रक्तगान्धारी ।**
**गान्धार्यार्षभिकाभ्यामान्ध्री संजायते जातिः ॥**
**योनिस्तु नन्दयन्त्यास्त्वार्षभिका पञ्चमी सगान्धारी ।**
**कार्मारवीं निषादी सार्षभिका पञ्चमी कुर्युः ।**

**धैवत्यार्षभिकाभ्यां हीनां खलु कैशिकी कुर्युः ॥ ]**
**परस्पर - विनिष्पन्ना ज्ञेया ह्येवं तु जातयः ।**
**पृथग्लक्षण - संयुक्ता द्वै - ग्रामिक्यः स्वराश्रयाः ॥ ४८ ॥**

(१) षाड्जी व मध्यमा ह्या जातींपासून षड्जमध्यमा ही जाति उत्पन्न झाली आहेअसे जाणावे. (ह्याचप्रमाणे) (२) षाड्जी व गान्धारी यापासून षड्जकैशिकी; (३) षाड्जी, गान्धारी व धैवती यांचेपासून षड्जोदीच्यवा;(४) षाड्जी, गान्धारी, मध्यमा व धैवती यांच्यापासून गान्धारोदीच्यवा; (५) गान्धारी, मध्यमा, पंचमी व धैवती यांचेपासून मध्यमोदीच्यवा; (६) गान्धारी, मध्यमा, पंचमी व नैषादी यांचेपासून रक्तगंधारी, (७) आर्षभी व गान्धारी यांचेपासून आन्ध्री; (८) आर्षभी, गान्धारी व पंचमी यांच्यापासून नन्दयन्ती, (९) आर्षभी, पंचमी व नैषादी यांचेपासून कार्मारवी; (१०) गान्धारी व पंचमी यांचेपासून गान्धारपंचमी, (११) आणि आर्षभी व धैवती ह्या (दोन जाती) सोडून बाकी राहिलेल्या (पाच) जातींपासून कैशिकी जाति उत्पन्न झाली आहे.

[(एतद्विषयक श्लोक :-) षाड्जी व मध्यमा या जातींपासून षड्जमध्यमा जाती उत्पन्न होते.गांधारी व षाड्जी यांच्या संयोगाने षड्जकैशिकी (उत्पन्न होते.) ॥

जी षाड्जी, गांधारी व धैवती यांच्या मिश्रणाने उत्पन्न होते ती षड्जोदीच्यवा जाति जाणावी.

षाड्जी, गांधारी, पंचमी व धैवती या जाती गांधारोदीच्यवती जाति निष्पन्न करतात. ॥

गांधारी, पंचमी, मध्यमा व धैवती यांनी विरचित ती सज्जनांनी नेहमी मध्यमोदीच्यवा जाति जाणावी. ॥

गांधारी, पंचमी, व सातवी (म्हणजे निषादिनी) यांच्यापासून रक्तगांधारी आणि गांधारी व आर्षभी यांच्यापासून आंध्री उत्पन्न होते. ॥

आर्षभी, पंचमी व गांधारी या नन्दयन्तीला उत्पन्न करतात आणि निषादी, आर्षभी व पंचमी या कार्मारवी निष्पन्न करतात. धैवती व आर्षभी यांशिवायच्या (बाकीच्या) कैशिकी उत्पन्न करतात. ॥ ]

ह्याप्रमाणे परस्परविनिष्पन्न अशा ह्या (संसर्गज) अकरा जाती जाणाव्या. ह्यांची लक्षणे वेगवेगळी असून ह्या दोन्ही ग्रामांच्या स्वरांच्या आश्रयाने राहिलेल्या आहेत. ॥ ४८ ॥

अ.भा. **षाड्जीमध्यमाभ्यां** येथपासून **धैवत्यार्षभीवर्जाभिः** येथपर्यंत संसर्गज जातींची उत्पत्ति सांगतात. यापैकी पहिल्या तीन जाती षड्जग्रामातील आहेत, ही गोष्ट 'षड्ज' ह्या पहिल्या शब्दानेच स्पष्ट होते. ग्रहादि स्वरांचा (ह्या जातींत) संसर्ग होतो. तरी पण दोन्ही ग्रामांचा मात्र संकर होत नाही. ह्या जातींत कैशिक या ग्रामसाधारणाचा पुष्कळ प्रयोग होतो. बाकीचे स्पष्ट आहे.

ह्या विषयाचा उपसंहार करतातः- **अपरस्परनिष्पन्नाः इ.** = संसर्ग-जाती एकमेकांच्या मिश्रणाने उत्पन्न होतात. तर याप्रमाणे षड्जमध्यमेंचे निराळे लक्षण समजावतात. :- **पृथग्लक्षण. इ.** पण ही लक्षणे कशासाठी? (असा प्रश्न कोणी करील, तर त्याला उत्तर की -) त्या जातींना लावावयाचे जे ग्रहादिविभागरूपी स्वर त्यांच्या लक्षणांच्या जोरावर (ह्या जाती) दोन ग्रामांचा आश्रय करतात, त्या कारणाने तीन जाती षड्जग्रामात आणि आठ मध्यमग्रामात (अशी वाटणी होते.)असा अर्थ. दोन ग्रामांतील (निरनिराळ्या) जातींपासून ह्या (संसर्गज) जातींची अशा प्रकारे उत्पत्ति होते. ह्या संसर्गजाती व स्वराश्रित अर्थात स्वरनामक जाती ह्या अशा रितीने संबंधित असल्या तरी स्वरनामक जातींहून यांची लक्षणे ही वेगळीच आहेत. स्वरनामक जातींच्या अपेक्षेने ह्यांचे जातित्व मानावे लागते आणि संसर्गज जातींमुळे (स्वरनामक जातींना) जनकत्वाचा लाभ होतो. ॥ ४८ ॥

**चतस्रो जातयो नित्यं ज्ञेयाः सप्त-स्वरा बुधैः ।**
**चतस्रः षट्-स्वरा ज्ञेयाः , स्मृताः पञ्च-स्वरा दश ॥ ४९ ॥**

**मध्यमोदीच्यवा चैव तथा वै षड्जकैशिकी ।**
**कार्मारवी च सम्पूर्णा तथा गान्धारपञ्चमी ॥ ५० ॥**

**षाड्ज्यान्ध्री नन्दयन्ती च गान्धारोदीच्यवा तथा ।**
**चतस्रः षट्-स्वरा ह्येताः ज्ञेयाः पञ्च-स्वरा दश ॥ ५१ ॥**

**नैषादी चार्षभी चैव धैवती षड्जमध्यमा ।**
**षड्जोदीच्यवती चैव पञ्च षड्जाश्रिताः स्मृताः ॥ ५२ ॥**

**गान्धारी रक्तगान्धारी मध्यमा पञ्चमी तथा ।**
**कैशिकी चैव पञ्चैता मध्यमग्राम-संश्रयाः ॥ ५३ ॥**

(या अठरा जातींपैकी) चार जाती नित्य सातस्वरयुक्त (म्हणजे संपूर्ण ), आणि चार जाती सहा स्वरांच्या (= षाडव) अशा ज्ञात्यांनी जाणाव्या; दहा जाती पांच स्वरांच्या (= ओडव) म्हटल्या आहेत. ॥ ४९ ॥

(त्या प्रमाणेः-) मध्यमोदीच्यवा, षड्जकैशिकी, कार्मारवी तसेच गांधारपंचमी ह्या संपूर्ण होत. ॥ ५० ॥

षाड्जी, आन्ध्री, नन्दयन्ती व गान्धारोदीच्यवा ह्या चार जाती सहा स्वरांनी युक्त समजाव्या. पाच स्वरांनी युक्त दहा जाती (अशा) -- ॥ ५१ ॥

नैषादी, आर्षभी, धैवती, षड्जमध्यमा आणि षड्जोदीच्यवती या पाच षड्जग्रामाचा आश्रय करणाऱ्या सांगितल्या आहेत. ॥ ५२ ॥

गान्धारी, रक्तगान्धारी, मध्यमा, तसेच पंचमी आणि कैशिकी या पाच मध्यमग्रामाचा आश्रय करणाऱ्या होत. ॥ ५३ ॥

अ. भा. - आता हानिप्रकार म्हणजे षाडवौडुविक विभाग, तो सांगण्यासाठी अगोदर जातींच्या संपूर्णत्वाचा नियम सांगतात :- **चतस्त्रः** इ = **मध्यमोदीच्यवा** इत्यादी चार जाती संपूर्ण आहेत. 'षाड्जी' इ. वाक्याने षाडव जाती सांगतात.पुढे यांच्याखेरीज बाकीच्या दहा पाच स्वरी असल्याचे दर्शवितात :- **ज्ञेयाः पञ्चस्वरा दश इ.** ॥ ४९-५१ ॥

आता पाचस्वरी जातींचे विभाग असे सांगतात :- **निषादिन्यार्षभीच** इ. पुढे **षड्जाश्रिताः** = षड्ज-ग्रामाश्रित जाती (सांगितल्या असून) त्यानंतर मध्यमग्रामातील जाती सांगितल्या आहेत ॥ ५२-५३ ॥

**यास्ताः सप्त-स्वरा ज्ञेया याश्चैताः षट्-स्वराः स्मृताः ।**
**कदाचित् षाडवीभूताः कदाचिच्चौडुवे मताः ॥ ५४ ॥**

ज्या जाती सप्तस्वरी (= संपूर्ण) सांगितल्या, त्या (नियमाने तशाच राहत असल्याच्या ) जाणाव्या; ज्या सहा स्वरी (त्या केव्हा संपूर्णहि असतात); व पाच स्वरी सांगितल्या त्या (अपवादे करून) केव्हा षाडव आणि केव्हा संपूर्णहि असतात. ॥ ५४ ॥

अ. भा. - आता या जातींच्या (षाडव-ओडव) स्वरूपांची स्पष्टता करतात. **यास्ताः सप्तस्वराः** इ. = ज्या मध्यमोदीच्यवा वगैरे चार जाती सांगितल्या त्या सातस्वरी जाणाव्या. या वाक्यात 'नियमाने' हा शेष शब्द समजावा. त्यामुळे या जातींत कोणताहि स्वर कधीहि वर्ज्य होत नाही. षाड्जी इत्यादी ज्या चार जाती सांगितल्या त्या षाडव आहेत, तथापी केव्हा केव्हा संपूर्णहि असतात, या अर्थी ग्रंथातील या वाक्यात 'च'- कार वापरला आहे. पाचस्वरी म्हणजे ओडव प्रयोगाच्या दहा जाती सांगितल्या आहेत, त्या क्वचित षाडव होतात आणि 'च' काराने दर्शविल्याप्रमाणे केव्हा संपूर्णहि होतात. या श्लोकातील मताः, हा शब्द छन्दोभंग न व्हावा एवढ्याचसाठी म्हणजे पादपूरणार्थ आलेला आहे. ॥ ५४ ॥

**षड्जग्रामे तु सम्पूर्णा विज्ञेया षड्जकैशिकी ।**
**षट्स्वरा चैव विज्ञेया षाड्जी गान्धार - योगतः ॥ ५५ ॥**

**संपूर्णा मध्यमग्रामे ज्ञेया कार्मारवी तथा ।**
**गान्धारपञ्चमी चैव मध्यमोदीच्यवा तथा ।**
**पुनश्च षट्-स्वरा ज्ञेया गान्धारोदीच्यवा बुधैः ॥ ५६ ॥**

**आन्ध्री च नन्दयन्ती च मध्यमग्राम-संश्रयाः ।**
**एवमेता बुधैर्ज्ञेया द्वै-ग्रामिक्योऽपि जातयः ॥ ५७ ॥**

षड्जग्रामात षड्ंजकैशिकी (ही जाति) संपूर्ण जाणावी. षाडव असणारी षाड्जी गांधार (या अंशाच्या) योगाने (संपूर्ण) जाणावी. ।। ५५ ।।

मध्यमग्रामात कार्मारवी, गान्धारपंचमी व मध्यमोदीच्यवा (ह्या तीन जाती) [नित्य] संपूर्ण जाणाव्या. गांधारोदीच्यवा, आन्ध्री व नंदयंती ह्या मध्यमग्रामिक जाती ज्ञात्यांनी [नित्य] षाडव जाणाव्या. ह्याप्रमाणे या दोन्ही ग्रामांतील जाती ज्ञात्यांनी जाणाव्या. ।। ५६-५७ ।।

अ. भा. - संपूर्ण तसेच षाडव जातींचे ग्रामभेदाने स्वरूप सांगतात :- **षड्जग्रामे तु इ. गान्धारयोगतः** इ. = षाड्जी ही सहा स्वरी सांगितली आहे; तथापि ज्यावेळी गान्धाराचे प्राधान्य असते म्हणजे गांधार तिचा अंश असतो, त्यावेळी ती संपूर्ण असते असे समजावे, कारण निषाद वर्ज्य झाल्याने हिचे षाडव रूप होते; परंतु गांधार हिचा अंश झाल्यावेळी त्या अंशरूप गांधाराचा निषाद हा संवादी स्वर असल्यामुळे (तशा प्रसंगी) निषादाचा लोप होऊ शकत नाही. ह्याच अर्थी श्लोकात 'च' कार आला असून (त्याच्यापुढचा) 'एव' हा शब्द 'सम्पूर्णा' ह्या शब्दानंतर घ्यावयाचा आहे. कार्मारवी इत्यादी मध्यमग्रामातील तीन जाती संपूर्णच जाणाव्या; त्याचप्रमाणे गान्धोरोदीच्यवा आदि तीन जाती षाडव समजाव्या. ह्या[१६] कधीही ओडव होत नाहीत. ।। ५५- ५७ ।।

**अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि तासामंश - विकल्पनम् ।**
**षट्-स्वराः सप्तमे ह्यंशे नेष्यन्ते षड्जमध्यमा ॥ ५८ ॥**

**संवाद्यलोपाद्गान्धारे तद्वदेव हि नेष्यते ।**
**गान्धारी - रक्तगान्धारी - कैशिकीनां तु पञ्चमः ॥ ५९ ॥**

**षड्जाया चैव गान्धारमंशकं विध्दि षाडवम् ।**
**षाडवं धैवते नास्ति षड्जोदीच्यामथांशके ॥ ६० ॥**

**संवाद्यलोपात्सप्तैताः षाट्स्वर्येण विवर्जिताः ।**
**गान्धारी- रक्तगान्धार्योः षड्ज - मध्यम - पञ्चमाः ॥ ६१ ॥**

**सप्तमश्चैव विज्ञेयो येषु नौडुवितं भवेत् ।**
**द्वौ षड्ज - मध्यमांशौ तु गान्धारो ऽ थ निषाधवान् ॥ ६२ ॥**

**ऋषभश्चैव पञ्चम्यां कैशिक्यां चैव धैवतः ।**
**एवं तु द्वादशैवेह वर्ज्याः पञ्च - स्वराः सदा ॥**
**तास्त्वनौडुविता नित्यं कर्तव्या हि स्वराश्रयाः ॥ ६३ ॥**

यानंतर त्या (जातींच्या) अंशारून (त्यांच्या षाडव -ओडव रूपांबाबतचे) अपवाद (= 'विकल्पनम्') सांगतो :-

षड्जमध्यमा जातीचा सातवा स्वर (=निषाद हा) ज्यावेळी अंश म्हणून योजण्यात येतो, त्यावेळी तिचे षाडव हे रूप इच्छिले जात नाही, (म्हणजेच ती संपूर्ण होते). ।। ५८ ।।

त्याचप्रमाणे (या जातीत) गांधार अंश असता त्याच्या संवादी स्वराचा (म्हणजे निषादाचा) लोप होत नसल्याने ( तिचे षाडव रूप ) इष्ट ठरत नाही, (अर्थात ती संपूर्ण होते) गान्धारी, रक्तगान्धारी कैशिकी ह्या जातीत पंचम हा अंश स्वर असता (त्यांचे षाडव रूप होत नाही). ।। ५९ ।।

षाडजी जातीत गान्धार हा अंश म्हणून योजला जातो, तेव्हा तिचे षाडव रूप होत नाही. त्याचप्रमाणे षड्जोदीच्यवा जातीत धैवत अंश असता तिचे षाडव रूप होत नाही. ।। ६० ।।

संवादी स्वराचा लोप होत नसल्याने उपरोक्त सात जातींचे षाडव रूप वर्जित आहे. गान्धारी व रक्तगांधारी या दोन जातींचा अंश स्वर जेव्हा षड्ज, मध्यम, पंचम किंवा निषाद यांपैकी (कोणता तरी एक ) असतो, तेव्हा त्यांचे ओडव रूप होत नाही. षड्जमध्यमा जातीत गांधार किंवा निषाद हा अंश होतो, त्यावेळी तिचे (ओडव रूप होऊ शकत नाही). ।। ६१ - ६२ ।।

पंचमी जातीत ऋषभ हा अंश असता आणि कैशिकी जातीत धैवत हा अंश असता (त्यांचे ओडव रूप होत नसते). याप्रमाणे हे एकूण बारा स्वर (अंश) असता, त्या त्या जातींचे पाचस्वरी रूप वर्ज्य समजावे. ह्याप्रमाणे (अंश) स्वरांचा आश्रय करणाऱ्या या (वर सांगितलेल्या) जाती कधीही ओडव करू नयेत. ।। ६३ ।।

अ. भा.- **अंशविकल्पनम्** इ. = अंशस्वरांचे विकल्प केले जातात, कसे ? तर ह्या जातीत हा अंश (असेल, तेव्हा ह्याप्रमाणे होते.) म्हणजे अमुक हे अंश (अमुक ह्या जातींत असल्यावेळी त्यांचे) षाडव - ओडव रूप होत नाही, या गोष्टीचा विचार या श्लोकात सांगितला आहे, तो स्पष्ट करतो. दुसरा पाठ अङ्गविकल्पनम् इ. आहे. त्या पाठाप्रमाणे ( जातींच्या) अंगाच्या षाडव-ओडव रूपांचे विकल्प सांगतो. म्हणजे ह्या अंगात ते नाही असा अर्थ करावा. **सप्तमे** इ. = (श्लो. ५८) गान्धार किंवा निषाद अंश असता (षड्जमध्यमाजाति) सहास्वरी होणे इष्ट नाही, असा अर्थ. याचे कारण असे आहे :- अंशाच्या संवादी स्वराचा लोप होत नाही. (ह्या नियमान्वये) षाड्जी जातीत गांधार अंश केल्यावेळी निषादाचा लोप होत नाही व षाडव रूप होत नाही, कारण तो त्या गान्धाराचा संवादी आहे. गांधारी वगैरे तीन जातींचे षाडव रूप ऋषभ वर्ज्य झाल्याने होते, असे सांगितले आहे. पण तो ऋषभ मध्यमग्रामात पंचमाचा संवादी आहे. म्हणून गान्धारी जातीत पंचम अंश केला जातो, त्यावेळी तिचे षाडव रूप होत नाही. त्याचप्रमाणे षडजोदीच्यवा जातीत धैवत अंश केला असता ती षाडव होत नाही. कारण ह्या जातीचे षाडव रूप

फक्त ऋषभ वर्ज्य करण्याने होते, पण धैवत अंश केला असता त्याचा संवादी ऋषभ वर्ज्य करता येत नाही, कारण षड्जग्रामात ऋषभ - धैवत यांचा संवाद आहे. (तसा तो मध्यमग्रामात नाही.) या बाबतचे सर्व नियम एकत्र करून उपसंहार करतात :-

**सप्तैता** : इ. = षड्जमध्यमा जातीपासून षडजोदीच्यवा जातीपर्यंत षाडव रूपाला अपवाद करणारे असे सात अंश - नि, ग, प, प, प, ग, ध हे आहेत. त्यानंतर ओडव रूपांना अपवाद करणारे अंश सांगतातः- **गान्धारी-रक्तगान्धार्योः इ. सप्तमः** इ. = सप्तम म्हणजे निषाद. षड्जमध्यमेचे गान्धार व निषाद हे दोन स्वर अंश असता तिचे ओडव रूप होत नाही. या प्रकरणाचा शेवट करतात :- **एवं तु द्वादशैव** इ. = गान्धारी व रक्तगान्धारी यांच्या ओडव रूपांना अपवाद करणारे अंश आठ आहेत, षड्जमध्यमा जातीचे दोन आहेत, पंचमी जातीत एक आहे. व कैशिकी जातीचा एक आहे. अंशाच्या संवादीचा लोप करुन जातीची षाडव-ओडव रूपे बनू शकत नाहीत, ह्या नियमाचे विवेचन करण्याचा येथे ( ग्रंथकाराचा ) हेतु आहे. अंशाची एवढी संख्या होते हे दाखविण्यासाठी सांगतात की :- ( अठरा जातींच्या) अंशांची एकूण संख्या त्रेसष्ट होते. ( पहा श्लो. ७८) त्यातून अषाडव अर्थात नित्य संपूर्ण जातींचे अंश नऊ होतात. ते काढून टाकले असता बाकी चौपन्न राहतात. त्यातून षाडव जातींचे अपवादरूप सात अंश वजा केले असता बाकी सत्तेचाळीस शिल्लक राहिलेले अंश षाडव जातींचे होतात. संपूर्ण चार जाती ( अठरा जातींतून काढल्या असता ) बाकीच्या चौदापैकी चार जाती ओडव होत नाहीत. त्यांचे बारा अंश चौपनांतून वजा केले असता शिल्लक बेचाळिस राहतात, त्यापैकी ओडव जातींचे अपवादरूप बारा अंश काढून टाकले असता बाकी तीस अंश उरतात. ह्याप्रमाणे दोन्ही ग्रामांच्या विकृत व संसर्गज जातींचे मिळून एकूण एकशेचाळीस अंश झाले. पुन्हा स्वरनामधेयक (सात) जातींचे सात अंश होतात, ते धरून दोन्ही ग्रामातील (सर्व जातींचे) एकूण अंश एकशेसत्तेचाळीस झाले. लोकांत जी गीते (= गीतयः) षड्जग्रामात व मध्यमग्रामात आहेत, (असे म्हणतात) ते (वास्तविक) ग्राम नसून नुसतेच नामसादृश्यमात्र असते. 'श्रुतींमुळे व जातींमुळे स्वर हे ग्रामत्वाला प्राप्त करतात' असे म्हटले आहे. विशिष्ट - श्रुतिक अशा स्वरांचा समूह तसेच मूर्च्छनात्मक आणि पूर्णापूर्ण अशा स्वरांच्या ग्रह - अंशादि विशेष स्वरूपाने युक्त अशा जातींचा समुदाय तो ग्राम होय. म्हणून म्हटले आहे की, त्या त्या ग्रामाच्या उचित श्रुतींनी युक्त असा स्वर समुदाय त्यात दिसत असेल तरच आणि त्याप्रमाणे मुख्य (= शास्त्रोक्त) व लौकिक (दोन्ही प्रकारच्या) ग्रामरागांमुळे त्यांना ग्राम ( असे म्हणावयाचे). षड्ज व मध्यम यांची प्रधानता क्रमाने ध्यानात घेतली (म्हणजे समजेल की,) अमुक अमुक स्वरांमुळे (= श्रुतिविशेषस्य) जातींचे औडुवितत्व होऊ शकत नाही. पण ते असो. (**एवं तु द्वादशैवेह** =) यातील 'तु' हा हेतुदर्शक आहे. त्यामुळे हे बारा स्वर वर्ज्य करावयाचे आहेत. अर्थात रक्तगान्धारी वगैरे जातींचे हे स्वर मुख्य म्हणजे अंश असतात, तेव्हा त्या जाती कधीहि ओडव होत नाहीत, असा संदर्भ समजावा. ॥ ५८ - ५३ ॥

**सर्व - स्वराणां नाशस्तु विहितस्त्वथ जातिषु ।**
**न मध्यमस्य नाशस्तु कर्तव्यो हि कदाचन ॥ ६४ ॥**

**सर्व स्वराणां प्रवरो ह्यनाशी मध्यमः स्मृतः ।**
**गान्धर्व - कल्पे विहितः सामस्वपि च मध्यमः ॥ ६५ ॥**

( निरनिराळया ) जातींत ( मिळून इतर ) सर्व स्वर वर्ज्य होऊ शकतात, पण मध्यम स्वराला कधीच वर्ज्य करू नये. ॥ ६४ ॥

(कारण) मध्यम हा सर्व स्वरांत श्रेष्ठ व अनाशी म्हटला आहे.

(शिवाय) तो गान्धर्वकल्पात विहित असून सामांतहि (प्रमुख) स्वर आहे. ॥ ६५ ॥

अ. भा. - आता ( गान्धर्वाची) विलक्षणता दाखविण्याच्या हेतूने प्रयोगासाठीचा नियम सांगतात :- **सर्वस्वराणाम्** इ. व **जातिषु** इ. यांत (स्वरांच्या) समुदायाच्या अपेक्षेने 'सर्वस्वराणाम्' असे शब्द योजले आहेत. कोणत्या जातीत कोणता स्वर वर्ज्य (=नाश) होतो. हे आतापर्यंत सांगितले. (त्याचप्रमाणे) षड्जग्राम व मध्यमग्राम यांत क्रमशः धैवत व पंचम हे अलोप्य म्हणून जरी म्हटले असले, तरी त्यांचा अन्य ग्रामात (= षड्ज - ग्रामात पंचमाचा व मध्यमग्रामात धैवताचा) लोप होऊ शकतो. म्हणून ( दोन्ही ग्रामात) मध्यमांखेरीज बाकीचे सर्व स्वर वर्ज्य होऊ शकतात. अर्थात मध्यम या स्वराचा मात्र कधीहि नाश होत नाही. **विशाखिलाचार्य** वगैरे दुसऱ्या ग्रंथकारांनी पंचम-धैवतांचे अनाशित्व ग्रामभेदाने सांगितले आहे, ते **भरतमुनींना** संमत नाही. त्यामुळे त्यांनी मध्यम हा एकच स्वर अविनाशी असल्याचे सांगितले आहे.

श्रीमत् - उत्पलदेव म्हणतात :- पुढे जातींची लक्षणे सांगितली आहेत, त्यांत मध्यमाचा लोप (कोणत्याहि जातीत) सांगितलेला नाही; तर मग मध्यमाच्या लोपाचा निषेध करण्याचे कारण काय ? त्यामुळे (विशेष) काही लाभ होत नाही. सर्व स्वरांचा नाश (= वर्ज्यत्व) होतो, असे म्हटल्यानेहि काही साध्य झाले नाही. कारण त्या त्या जातीत नियमित स्वरांचा लोप सांगण्यात येणारच आहे. म्हणून या कथनाचा असा भावार्थ समजावा :- वैचित्र्य आणि रंजकता (= 'राग') यांनी ग्रामरागत्व उत्पन्न करावयाचे असते; तेव्हा सहाहि स्वर षाडव-औडुविताच्या विधीप्रमाणे सर्व जातींमध्ये स्वबुध्दीने ग्रामविभागाचा विचार करुन क्रमाने लुप्त करावयाचे असतात. मध्यमाचा लोप कधीही करू नये, या कथनाने ग्रामरागाचे वैचित्र्य येथे सूचित केले आहे. **यातील रहस्य ( ='युक्ति' ) असे आहे. - सर्वस्वराणाम् इ. = मध्यमाच्या गुणामुळेच सर्व स्वर तुल्य स्थानांवर स्थित असतात, उच्च व नीच स्वरांच्या व्यवस्थेचे कारण मध्यम स्वर असतो., त्यामुळे दुसऱ्या अर्थाने मध्यम (=मधला) हे त्याचे नांव सार्थ होते. गान्धर्वशास्त्रानुसार गान्धर्व संगीताची सीमा ग्रामराग ही होय, त्यामुळे भाषाराग व देशी राग यांच्यामध्ये मध्यम स्वराचाहि नाश (= लोप ) होतो, असे दृष्टोत्पत्तीस येते. विहितः इ. = ( मध्यम स्वराच्या) मंगलत्वामुळे - मातृगुप्ताने असेच**

म्हटले आहे :- सर्व मनुष्यांची वाणी मध्यमापासून प्रथम आरंभ होते, म्हणून मांगल्यार्थी, तो मध्यम अंश असणारा चोक्षषाडवराग आरंभी गावा. '' **सामस्वपि** इ. सामगायनातहि मध्यमाचे प्रथमत्व समजून नियत प्रयोग होतो. जसे नारदमुनीने म्हटले आहे.'' सामगायकांचा प्रथम स्वर हा (संगीताच्या सप्तकातील) मध्यम स्वर समजावा. '' या श्लोकातील ' विशेत् ' या शब्दाचा दुसरा पाठ अन्य विद्वान वेणोः असा घेतात. दुसरे कित्येक विद्वान 'जातिवाचक एकवचन' हा नियम स्वीकारतात व मध्यम म्हणजे कंठस्थानीय स्वरसप्तक अर्थात मध्यसप्तक असा अर्थ करतात, कारण मध्यसप्तकाचा सर्वत्र संभव असल्यामुळे ते अविनाशी असते. शिर व वक्ष ही पित्त व कफ यांनी पीडित असल्यामुळे तार व मन्द्र स्वरांचा प्रयोग (सर्वांनाच) सुलभ नसतो, असे स्पष्टीकरण ते याबाबतीत करतात.॥ ६४-६५ ॥

**दशकं जाति - लक्षणम् -**
**ग्रहांशौ तार - मन्द्रौ च न्यासोऽपन्यास एव च ।**
**अल्पत्वं च बहुत्वं च षाडवौडुविते तथा ॥ ६६ ॥**

जातिलक्षणांचे दशक : -

ग्रह, अंश, तार, मंद्र, न्यास, अपन्यास, अल्पत्व आणि बहुत्व तसेच षाडव व औडुवित ( ही जातींची दहा लक्षणे समजावी.) ॥ ६६ ॥

अ. भा. - येथे (श्लो. ६४ मध्ये) जातिषु = 'जातींमध्ये' असे म्हटले आहे. तर मग जाति ही काय वस्तु आहे ? आता तेच स्पष्ट करतात. अशा प्रकारचा विशिष्ट स्वरसंनिवेश की ज्याच्यामुळे रक्ति आणि अदृष्टाचा (= विशिष्ट परिणामाचा) उदय होतो, तिला जाति असे म्हणतात. हा संनिवेश कोणता ( याचा खुलासा करण्यासाठी) म्हणतात. :- **दशकं जातिलक्षणम्** इ. ग्रहांशौ इ. = या द्वन्द्व समासाने प्रायः अंशानेच ग्रहत्व व्यक्त केले आहे. तारमन्द्रस्वरौ. = हे अन्योन्य अपेक्षेने समजावयाचे आहेत. **षाडवौडुविते** ही लक्षणे जेथे संभव असेल तेथेच समजावयाची, सर्वत्र नव्हेत. तथा शब्दाने यथासंभव असा अर्थ घ्यायचा आहे. ह्या दहा लक्षणांपैकी आठ लक्षणे सर्वत्र अव्यभिचारी (=निरपवाद लागू होणारी) आहेत. त्याचप्रमाणे प्रथम, मध्यम ( व अन्तिम) यांच्या अस्तित्वाशिवाय संनिवेशच कसा होऊ शकेल? तर त्यासाठी ग्रह, अपन्यास व न्यास यांचा उल्लेख ( लक्षणांत ) केला आहे. गुणप्रधान वस्तूचा अभाव असल्यास रंजकता उत्पन्न होऊ शकणार नाही, म्हणून (या लक्षणांत) प्रधानभूत अंशाचा निर्देश आहे. त्याचे अमात्य रूप संवादी स्वर पर्यायांश होतात.............. (व त्यांचेमुळे होणारे) बहुत्त्व हे ( या स्वरसंनिवेशरूप जातीला) उपयोगी असते. अल्पत्व हे अल्पापेक्षी आहे. त्यामुळे विवादी व लोप्य स्वर हे अल्पत्वाला उत्पन्न करतात. मूर्च्छनेचा निर्देश फक्त मध्यसप्तकाच्या स्वरांनी केला जातो, त्यामुळे तोच - तो पणा उत्पन्न होऊन रंजकतेचा अभाव होईल, तो होऊ नये, यासाठी तारमन्द्राची आवश्यकता आहे. अशा प्रकारची ही आठ लक्षणे अव्यभिचारी समजावी. लोपयुक्त जातीसाठी स्वरलोप हेहि (आणखी) एक लक्षण मानावे लागेल.॥६६॥

**अथ ग्रहाः।**

**ग्रहास्तु सर्व - जातीनामंशवत्परिकीर्तिताः ।**
**यत्प्रवृत्तं भवेद्गेयमंशो ग्रह- विकल्पितः ॥ ६७ ॥**

आता ग्रहांचे (लक्षण सांगतो) :-

ग्रह हे सर्व जातींमध्ये अंशासमान सांगितले आहेत. गायन ज्या स्वरांपासून प्रवृत होते, (तो ग्रह). (जातींचा) अंशच (बहुतेक) ग्रह कल्पिला जातो. ॥ ६७ ॥

अ. भा. - (उपर्युक्त ) एवढ्या वस्तूंचे दशक सांगितल्यावर आता ग्रहांची संख्या व लक्षण सांगतात. ग्रहास्तु इ. = सर्व जातींचे ग्रह मिळून अंशाएवढे अर्थात त्रेसष्ट होतात.हा ग्रह तो कोणता ? उत्तर देतात - हे अंशाचेच दुसरे नांव आहे. ते कसे ? तर सांगतात- **यत्प्रवृत्तं भवेद्द गेयम्** इ. = ज्याच्यामुळे जातिप्रयोगाचा प्रारंभ केला जातो(पकडला जातो) तो ग्रह, त्यामुळे धर्मान्तरयोगे करुन हे अंशाचेच नामान्तर आहे.तेच सांगतात :- **ग्रहविकल्पितः** इ. अंशाला त्याप्रमाणे ग्रहधर्माने कल्पून द्विस्वभावी केला आहे. त्यामुळे ग्रहत्वाचे प्राधान्य दिसत नाही. पण ग्रह हा सामर्थ्यसिध्द आहे.(म्हणजे त्याला स्वतंत्र अस्तित्व आहे.) याबद्दलच्या शंकेचे निराकरण करण्याकरीता स्वमुखाने सांगतात :- **ग्रहविकल्पित** अर्थात अंश केव्हा केव्हा ग्रह नसतोहि - उदा. नंदयंती जातीत पंचम (अंश आहे.) पण स्वर गांधार आहे. त्यामुळे ग्रहाचे नाव निराळे सांगावे लागते. (आक्षेप) पण केवळ एक उदाहरण देण्याने ही गोष्ट सिध्द होत नाही. (निराकरण) ग्रामरागादिंकात अंशाव्यतिरिक्त ग्रह असल्याचे प्रत्ययास येते, त्याप्रमाणे प्रत्यक्षात हा भेद पुष्कळ (रागात) दिसून येतो. त्या कारणाने ग्रहाचे लक्षण पृथक् सांगण्याचे प्रयोजन सिध्द होते. उदा. मालव- कैशिक रागात जी रूपके (=चिजा) गायिली जातात. त्या सर्वांचा ग्रहस्वर नियमाने षड्ज असत नाही. याचप्रमाणे दुसऱ्या रागांबद्दलहि सांगता येईल. ॥ ६७ ॥

**तत्रांशो नाम-**

**यस्मिन् भवति रागश्च यस्माच्चैव प्रवर्तते ।**
**मन्द्रश्च तार - मन्द्रश्च योऽत्यर्थं चोपलभ्यते ॥ ६८ ॥**

**(अनेक स्वर - संयोगे योऽत्यर्थमुपलभ्यते ।**
**अन्ये[१७] च बलिनो यस्य संवादी चानुवाद्यपि ॥)**

**ग्रहापन्यास - विन्यास - संन्यास - न्यास गोचरः।**
**अनुवृत्तश्च यस्येह सोंऽशः स्यादश - लक्षणः ॥ ६९ ॥**

त्यातील **अंशाची** व्याख्या अशी आहे :-

राग ज्या स्वरामध्ये असतो, ज्या स्वरामुळे रागाचा विशेष उठाव होतो (=प्रवर्तते) जो तार व मन्द्र यांच्या प्रत नेणारा असतो, ( जो स्वर अनेक स्वरांच्या संयोगामध्ये जास्तीत जास्त उपलब्ध होतो, ज्या बलिष्ठ स्वराचे संवादी व अनुवादी अन्य स्वर असतात); जो स्वर (जाति व राग यांच्या ) ग्रह, अपन्यास, विन्यास, संन्यास व न्यास यांच्या रूपाने दृष्टिगोचर व पुनरावृत होतो, तो स्वर अंश होय. त्याची ही दहा लक्षणे (जाणावी.) ॥ ६८-६९)

अ.भा. - आता अंशाची व्याख्या करतात :-

**यस्मिन्भवति रागश्च** इ. जो विद्यमान असल्यामुळे रागाची रक्ति आणि जातीचे स्वरूप पैदा होते, ज्याप्रमाणे शिरामुळेच पुरुषाचे स्वरूप व्यक्त होते,त्याप्रमाणे ज्या स्वराचा आश्रय करुन (राग) प्रकर्ष पावतो; येथे **यस्मात्** ही ल्यब्लोपी पंचमी आहे. ग्रंथाचा आशय असाः- ज्या स्वराचे प्राधान्य उत्पन्न करण्यासाठी त्याचा संवादी किंवा अनुवादी स्वर वाजविला (घेतला)जातो जसा ग्रामाच्या संबंधाने मन्त्री त्यामुळे त्याचे (जातिरागांच्या दृष्टीने) अंशत्व नसताहि त्याच्या संवादि - अनुवादी स्वरांचा तो अंश असतो. पण येथे जातींच्या विवेचनाचा विषय आहे. त्यादृष्टीने तारावधि ध्यानात घेऊन पुढे सांगतील त्याप्रमाणे पंचमापर्यंत वगैरे तारमन्द्रांची स्थिति (= मर्यादा) समजावी. जो स्वर समस्त गीतात (इतर) सर्व स्वरांपेक्षा बहुल म्हणजे अधिक उच्चारला जातो, जो स्वतःच स्वतःच्या संवादि - अनुवादी रूपांना धारण करतो किंवा ग्रहादि पाच रूपे ग्रहण करतो, मात्र विवादीचे रूप धारण करीत नाही, आणि पूर्वी स्पष्ट झालेला व पुढे ज्याचे नियम सांगण्यात येतील तो ग्रहादि विषय ज्याचा आहे, तो अंश होय. जो स्वतः पराङ्.मुख व लपून राहून अन्य स्वरांना रंजक बनवून निवर्तन पावतो, तो अंश होय.( जाति व राग यांचा) तो मुख्य भाग असतो. (म्हणून त्याला अंश हे नांव दिले जाते.)

**दशलक्षणः** इ.= हे सर्व धर्म एकवटून अंशत्वाचे प्रयोजक होतात. त्याच कारणाने ग्रहाचे लक्षण अंशाच्या लक्षणापासून वेगळे सांगण्यात आले आहे. ॥६८-६९॥

**पञ्चस्वर-परा तार-गतिर्यथा -**
**अंशात्तार-गतिं विद्यादाचतुर्थ-स्वरादिह ।**
**आ पञ्चमात्पञ्चमाद्वा नातः परमिहेष्यते ॥ ७० ॥**
**( लोप्यस्वरोऽपि गण्यः स्याद्बुधैस्तारविधौ पुनः ।)**

**तारगति** (तारसप्तकाच्या) पाच स्वरांपर्यंत (मानली आहे),

ती अशी :-

अंशापासून (पुढे) चौथ्या स्वरापर्यंत, पाचव्या स्वरापर्यंत किंवा (जास्तीत जास्त) पाचवा स्वर धरून तेथपर्यंत असावी. मात्र त्याच्यापुढे इष्ट नाही. ॥ ७० ॥

(तारविधीमध्ये ज्ञात्यांनी लोप्य स्वराची सुद्धा गणना करावयाची असते.)

अ. भा. - पुढे (जातींच्या स्वर - चलनाची) तारसीमा स्पष्ट करतात :-

**पञ्चस्वरपरा तारगतिः** इ. [आक्षेप :-] या वचनावरून, अंशस्वरापासून आरोहक्रमाने फक्त पाचव्या संख्येच्या स्वरापर्यंत आरोह करावा, त्याच्या पुढे करू नये, असा नियम (ग्रंथकाराने सांगितलेला दिसतो.)

[निराकरण :] हे म्हणणे बरोबर नाही. (तुम्ही म्हणता तसा अर्थ केल्यास) मोठाच लक्ष्यविरोध होईल. (कसा तो पहा :-) षाड्जी जातीत षड्ज अंश असता पंचम स्वरांपर्यंतच आरोह करावा लागेल, परंतु प्रचारात (= 'लक्ष्ये') षाड्जीचे 'नि धा धा निस निध पा नि ध पा' ह्या प्रमाणे (स्वर-चलन असल्याचे दिसून येते. तुमच्या ह्या अर्थानुसार) आर्षभीचे चलन धैवतापर्यंतच व्हायला पाहिजे, पण ते (प्रत्यक्षात) 'निधरिनिमगम' ह्याप्रमाणे असल्याचे दृष्टोप्तत्तीस येते. तसेच नैषादी जातीचा आरोह पंचमान्त 'पापारिग' असा केला जातो. ह्याप्रमाणे आणखीही उदाहरणे देता येतील. त्यामुळे ह्याला व्याख्याप्रकार म्हणता येणार नाही. [आक्षेपकर्ता विचारतो :-] तर मग तुमचा अर्थ कोणता ? [उत्तर :-] बरे तर, ऐका! मध्य-सप्तकाने मूर्च्छनेचा निर्देश करावा, हे तर ग्रंथोक्तिवरून स्पष्टच होते; त्याप्रमाणे मध्यसप्तकातचे सर्व स्वर वापरावे, हे तर सिद्धच झाले. तेव्हा आता निराळ्या सप्तकातले किती स्वर प्रत्यक्षाप्रत्यक्षाच्या दृष्टीने वापरणे श्रेयस्कर होईल, ( हे दाखविण्यासाठी सध्या) मंद्रस्थानाचा विचार न करता औरस्य म्हणजे उरःस्थानाच्या (मध्यसप्तकाच्या) स्वरांना धरून शिरःस्थानातील अर्थात तारसप्तकातील स्वरांच्या प्रयोगाचे निरूपण येथे करीत आहेत.

[शंका :-] तर मग, मध्यसप्तकातील स्वरांचा प्रयोग केला गेल्यावर तारसप्तकातील सर्व स्वर घ्यावयाचे की काय ? [निराकरण :-] तारसप्तकातील सर्वच स्वर घ्यावयाचे नाहीत, हीच बाब येथे स्पष्ट करीत आहोत. ते याप्रमाणे :- जेव्हा षड्ज अंश असतो, तेव्हा तारसप्तकातील रि - ग - म - प एथपर्यंतचेच स्वर घ्यावयाचे आहेत आणि तेहि (गाण्याऱ्याची) कुवत असेल तरच. (गायक - वादकात तार पंचमाच्या पुढचे स्वर घेण्याची) शक्ति असली तरी त्यापुढचे स्वर त्याने घेऊ नयेत. (तारपंचमा-पेक्षा) कमी स्वर घेतले तर तो दोष होत नाही, ही गोष्ट 'पर' या शब्दाने दाखविली आहे. ऋषभ अंश असता तार सप्तकातील धैवतापर्यंतचे ग्राह्य होत. गांधार अंश असल्यावेळी तारनिषादापर्यंतचे सात स्वर घ्यावे. मध्यम, पंचम, धैवत व निषाद यापैकी कोणताहि अंश असता तारनिषादापर्यंतचे स्वर घ्यावयाचे

असतात. (तात्पर्य) गांधारादि पाच स्वरांपैकी (कोणताहि एक स्वर) अंश असता संपूर्ण एक तारसप्तक ग्राह्य असते. (अर्थात अशा वेळी तारनिषादापर्यंतचे स्वर घ्यावयाचे असतात.) पुन्हा ( गायक-वादकाची) शक्ति असल्यास त्या पुढच्या चार स्वरांपर्यंत आरोह करावा. नंदयंती जातीची सीमा तार (षड्जा-) पर्यंतच आहे, त्याद्दल (ग्रंथवचन-) **तारगत्या तु षड्जोऽपि कदाचिन्नातिवर्तते** असे आहे; त्याची व्याख्या त्या स्थानी केली जाईल. पुढे **आ चतुर्थात्** इ. अन्य व्याख्यात्यांनी नंदयंतीविषयी जे विवेचन केले आहे, ते योग्य नाही. ह्याच अर्थाची (ग्रंथोक्त) कारिका :- **अंशात्तारगतिं विद्यात् -- इह** इ. = मध्यसप्तकात मूर्च्छना करून ठेवली असता अंश स्वरांचे अवलंबन करून तारसप्तकाच्या स्वरापर्यंत तारगति किंवा आरोह सर्वत्र करावा, त्याच्यापुढे करू नये असे या वाक्याने सांगितले आहे. अंशाचे ग्रहण; **नेता च तारमन्द्राणाम्** ह्या अंशाच्या पूर्वोक्त लक्षणावरून करावयाचे आहे, ह्याचा विचार ह्या व्याख्यात्यांनी केलेला नाही. " ऋषभगान्धार अंश असता (तार सप्तकातील) धैवत - निषादाचा प्रयोग कन नये, कारण त्यात रंजकता नाही. तसे स्वर घेण्याला उपपत्तीचा आधार नाही, गायकात शक्तीचा अभाव असतो," इत्यादी कारणे या व्याख्यात्यांनी पुढे केली आहेत, ती खोटी आहेत.

परंतु अन्य विद्वानांनी याचे व्याख्यान केले आहे, ते असे :- " अंशस्वरासहित तार सप्तकातील पाच किंवा चार स्वर घ्यावेत. उदाहरणार्थ - षड्ज अंश असता तार सरिगमपं; ऋषभ अंश असल्या वेळी रि ग म प ध, गांधार अंश अंसता ग म प ध नि; मध्यम अंश असता म प ध नि स (?) ह्या प्रमाणे पुढे पंचम, धैवत व निषाद अंश असताना समजावयाचे आहे. तारगतीचे स्वर प्रचार पाहून ठरवायचे आहेत. उदारहरणार्थ :- नैषादीचा अंश स्वर निषाद असता तारषड्जापर्यंत (तारगति) प्रचारात दिसते. ह्या प्रमाणे अंशावरून तारगतीचा निश्चय करावयास पाहिजे." असो; तर (यांनी केलेली ही) व्याख्या येथे सांगितली, (ती) लक्षणाची (= शास्त्रनियमांची) संग्राहक अशी असल्यामुळे आदरणीय आहे.

**नातः परम्** इ. = कोणी तारगति आपल्या इच्छेनुसार (= 'कामचार') वाटल्यास कमीहि ठेवू शकतो अशी अनुमति देतात.

**इह** इ. = जाति व ग्रामरागांसाठी हा (अटळ) नियम नाही असा भावार्थ. **बुधैः** इ. = (ह्या जातीत) हा स्वर लोप्य आहे, असे जे बुद्धिमन्त समजतात, त्यांनी (पाच इत्यादी) पूर्ण गणना करताना त्यासाठी लोप्यस्वरसुद्धा हिशोबात धरला पाहिजे. **विशाखिलाचार्यांनीहि असेच सांगितले आहे.** :- 'नाशिस्वरस्तारविधौ संख्यायते', म्हणजे 'तारविधीत स्वरांची संख्या गणताना लोप्य स्वरहि धरावा.' तार या शब्दाची निरुक्ति :- जो तारतो किंवा तरंगवितो, तो तार. ॥ ७० ॥

**त्रिधा मन्द्र-गतिः । अंश-परा, न्यास-परा अपरन्यास-परा चेति ।**
**मन्द्रस्त्वंशपरो नास्ति न्यासौ तु द्वौ व्यवस्थितौ ।**
**गान्धार- न्यास-लिङ्गे तु दृष्टमार्षभसेवनम् (पाठभेद-दृष्टमृषभ-) ॥ ७१ ॥**

**मंद्र-गति** तीन प्रकारची आहे., अंशापर्यंत, न्यासापर्यंत किंवा त्याच्या पुढच्या स्वरापर्यंत.

मंद्र (गति ही) अंशाच्या पुढे असत नाही. (म्हणून मंद्र सप्तकातील) अंश हाच ( जाति आणि राग यांचा) मंद्र स्वर समजावा. किंवा न्यास स्वर अथवा त्याच्या खालचा स्वर मंद्रगतीसाठी घ्यावा. (कारण केव्हा केव्हा) गांधार स्वर न्यास असता ऋषभापर्यंत मंद्र गति घेतलेली दिसून येते. ॥ ७१ ॥

अ.भा.- आता मंद्रविधी सांगतात - **त्रिधा मन्द्रगति :** इ. मद् ह्या धातूचा अर्थ आनंदित होणे, मत्त होणे, अर्थात नम्रत्वामुळे ललित तो मन्द्र. मध्य सप्तकात जो स्वर अंश असतो तेथपर्यंत मंद्र सप्तकात जावे किंवा न्यास स्वरापर्यंत जावे.( **न्यासपरा इ.**) या वाक्यात एक 'पर' शब्द लुप्त आहे. म्हणजे न्यासस्वराचा जो पर त्याचाहि जो पर , असा अर्थ घ्यावा. ह्याहिपेक्षा कमी स्वर घेण्याची अनुज्ञा किंवा कामचार आहे, हे दर्शविण्यासाठी 'पर' शब्दाची योजना केली आहे. (शंकाः-) तर मग षाड्जी जातीत मंद्र धैवताचा प्रयोग कसा केला जातो ? (मंद्र) षड्जापर्यंत प्रयोग (करण्याची रीत) का नाही ? (निराकरण) येथे पूर्ण मंद्र सप्तक असताही कामचारामुळे मंद्रप्रयोग धैवतापर्यंतच केला जातो. षाड्जीचा ग्रहन्यासरूप षड्ज हा (मुळात) मंद्र सप्तकाचा असा नसतो, तर मध्यसप्तकगत असतो. तो मध्यसप्तगत असल्यामुळे येथे नियम सांगितला आहे की, मंद्रगतीत तो मंद्र घ्यावा. अर्थात हे वचन षाड्जी जातीच्या बाबतीत समजू नये; कारण त्या जातीत तिन्ही स्थानांत षड्ज ऐकावयास येतच असतो. (या विषयाची स्पष्टता करण्यासाठी) कारिका सांगतात :- **मन्द्रस्त्वंशात्परो नास्ति इ.** ह्या नियमाप्रमाणे नैषादी जातीत वास्तविक निषाद मंद्र घ्यावयास पाहिजे, पण तसा तो (घेतलेला) दिसत नाही, (म्हणून) अंशग्रहस्वर मध्य सप्तकात असता मंद्रगति दोन प्रकारे होऊ शकते म्हणजे मंद्रन्यास तरी घ्यावा किंवा त्याच्या पुढचा स्वर तरी घ्यावा. प्रचारातील उदाहरणे ध्यानात घेऊन ह्या विषयाची व्यवस्था करण्याच्या हेतूने (मंद्र-गतिविषयक वरील) नियम सांगितला आहे. त्याप्रमाणे (ज्या जातीत) गांधार न्यास आहे, तेथे 'न्यासपर' ह्या नियमाने गांधारापर्यंत मंद्रगति सिध्दः होते. (शंकाः-) तर मग पुन्हा (आणखी नियम) का सांगतात ? (निराकरणः-) त्याचे कारण आहे. ते असे सांगतात :- (**लङ्घनं ह्यृषभस्यापि तच्च मन्द्रगतं स्मृतम् ।** (श्लो.१३३) हा विषय व्यवस्थित (=नियमबध्द) आहे, शिवाय त्याला विकल्पहि आहे, तो (येथे या वाक्याने ) समजाविला आहे. तर हे, वचन मुनींनी ज्ञातेपणानेच येथे घातले आहे. वास्तविक हे वचन गान्धर्वाबाबत असल्यामुळे पूर्वीच सिध्द झाले आहे, त्यामुळे यात दोष नाही. या वाक्यातील तु शब्द निश्चयार्थी आहे.(व्यवस्थितौ म्हणजे) अवस्थित असलेले असा अर्थ. ॥७१।

**अथ न्यास एकविंशति - संख्यः। अङ्ग- समाप्तौ न्यासः। तव्ददपन्यासो ह्यङ्ग-मध्ये षट्पञ्चाशत्संख्यः । यथा ---**

**न्यासोऽङ्ग - समाप्तौ स चैकविशंति - संख्यस्तथा। षट्पञ्चाशत्संख्योऽपन्यासो ऽङ्ग- मध्ये भवेत् ॥ ७२ ॥**

आता **न्यास**; त्यांची संख्या एकवीस आहे. न्यास स्वर हा (जातीच्या) अंगाच्या समाप्तीस असतो.त्याचप्रमाणे **अपन्यास** स्वर हा (जातीच्या) अंगाच्या मध्यात असतो. त्यांची संख्या छप्पन्न आहे. (एतद्विषयक एक श्लोक ) असा आहे :-

अंगसमाप्तीत न्यास हे एकूण एकवीस आहेत. अंगमध्यात अपन्यास एकूण छप्पन्न आहेत ।। ७२ ।।

अ.भा. - आता न्यासांची संख्या लक्षणासहित सांगतात :- **न्यास एकविंशतिसंख्य** :- इ. षड्जमध्यमा जातीचे न्यास दोन, कैशिकीचे तीन व बाकी उरलेल्या जातींचे न्यास सोळा आहेत. जातीच्या शरीराची (बंदिशीची) समाप्ति करण्याचा स्वर तो न्यास. याची निरुक्ति, ज्या स्वराने प्रयोग सोडला (=संपविला) जातो, तो न्यास अशी आहे. पुढे अपन्यासाची व्याख्या देतात :- **तद्वत्** इ. अपन्यासहि समाप्तीचा स्वर आहे, तर मग न्यासापासून त्याचा वेगळेपणा तो कोणता ? सांगतात :- **अङ्गमध्ये** इ. अवान्तर समाप्तीच्या प्रसंगी, हा अर्थ. दत्तिलाचार्यांनीहि असेच सांगितले आहे :- **विदारीमध्यगस्तथा** इ. (द-६०) षड्जग्रामात षड्जमध्यमेचे अपन्यास सात असतात; षड्जोदीच्यवेचे दोन व बाकी पाचांचे प्रत्येकी तीन मिळून चोवीस होतात. बाकीचे मध्यमग्रामातील जातींचे आहेत. याप्रमाणे अपन्यासाचे स्वरूप, अनुष्टुभ् वृत्ताचा एक प्रकार विताननामक वृत्त, त्याने सांगतात. **न्यासोऽङ्गसमाप्तौ सः** इ. ।।७२।।

**संन्यास- विन्यासावप्यङ्ग-मध्य एव । अनियत-त्वाच्च बहुत्वमिति ।**
**तत्र प्रथमविदारी-मध्ये न्यास-स्वरः प्रयुक्तस्तु ।**
**विवदन-शीलं मुक्त्वा संन्यासः सोऽ भिधातव्यः ।**
**कृत्वा पदावसाने विन्यासात्कापि विन्यासः ॥ ७३ ॥**

**संन्यास** व **विन्यास** दोन्ही अंगमध्यातच असतात. ते अनियत असल्यामुळे बहुसंख्य समजावे.

जेव्हा पहिल्या विदारीमध्ये अविवादी असा न्यास स्वर प्रयुक्त होतो, तेव्हा त्याला संन्यास हे नांव देण्यात येते. ( अविवादी असा) कोणताहि स्वर पदाच्या अंती ठेवला जातो, तेव्हा त्याला विन्यास (म्हणतात). ।। ७३ ।।

अ. भा. - आता उद्देशात दिलेले नसतानाहि अंशाच्या लक्षणाच्या संदर्भाच्या प्रसंगाने सांगतात :- **संन्यास विन्यासावप्यङ्गमध्य एव** इ. विदारीमध्ये असा अर्थ समजावा. संन्यास-विन्यास हे अनियत असल्यामुळे यांची संख्या अमुकच असे कसे सांगता येईल? म्हणून म्हणतात :- **अनियत्वाच्च बहुत्वम्** इ. तरी पण अंश, न्यास व अपन्यास यांच्याप्रमाणेच त्यांच्याबद्दलहि दरेक जातीच्या प्रयोगात नियम आहेत,

असा अर्थ समजावा. संन्यासाचे लक्षण सांगतात :- **तत्र प्रथमविदारीमध्ये** इ.= अंशाचा विवादी नसलेला असा स्वर पहिल्या विदारीच्या शेवटी योजला जातो, त्यावेळी त्याला संन्यास असे नाव दिले जाते निरुक्ति :- समीप असलेलां न्यास तो संन्यास. **कृत्वा पदावसाने** इ. = अंशाचा संवादी किंवा अनुवादी असा कोणताही स्वर विदारीरूप पदाच्या अंती स्थापन केला जातो, तेव्हा त्याला विन्यास ही संज्ञा दिली जाते. ॥ ७३ ॥

**द्विविधमल्पत्वं लङ्घनादनभ्यासाच्च । तत्र षाडवौडुवितकाराणामनंशानां च गीतान्तरमार्गमुपगतानां स्वराणामनभ्यासः लङ्घनादनभ्यासाद् यथा जात्यल्पत्वं तद्वब्द्हुत्वं च । तथा -**

**अल्पत्वेऽथ बहुत्वे बलवदबलता विनिश्चयादेव ।**
**जातिस्वैरस्तु नित्यं जात्यल्पत्वं द्विविधमेतत् ॥ ७४ ॥**

अल्पत्व दोन प्रकारचे आहे. ( स्वराच्या )लंघनाने होणारे व ( स्वराच्या ) अनभ्यासाने करण्यात येणारे. (त्याचा विधी असा) षाडव व ओडव स्थितींमध्ये वर्जित होणाऱ्या अनंश स्वरांचा, गीताच्या अंतरमार्ग क्रियेच्या द्वारे अनभ्यास ( करण्यात येतो. ) जातीमधले अल्पत्व ज्याप्रमाणे लंघन व अनभ्यास असे दोन प्रकारचे आहे. त्याचप्रमाणे बहुत्वहि दोन प्रकारचे आहे. (याबद्दलचा श्लोक) असाः-

" ( जातीतील ) निर्बल स्वरांचे निश्चतपणे व त्याच्या उलट बलवान स्वरांचे बहुत्व असते व हे ज्ञातिस्वरांनी होणारे जातीचे अल्पत्व ( आणि बहुत्व) नित्य दोन प्रकारचे असते." ॥ ७४ ॥

अ.भा. - ह्याप्रमाणे अपन्यासाची परिवर्तित रूपे दोन - संन्यास व विन्यास, त्यांची लक्षणे सांगून आता अंशाच्या विषयाला धरून अल्पत्व या विषयाचे (दोन्ही) प्रकारांनी लक्षण कथन करतात. **द्विविधम्** इ. लंघन म्हणजे स्वराला (केवळ) स्पर्श करून त्याच्यावर न थांबता दुसऱ्या स्वरावर जाणे. (या क्रियेमुळे पहिल्या) स्वराचे अप्रधानीकरण केले जाते. (हा अल्पत्वाचा पहिला प्रकार होय.) ........ एखाद्या स्वराची पुन्हा पुन्हा आवृत्ति न करणे, याला अनभ्यास म्हणतात. (हा अल्पत्वाचा दुसरा प्रकार होय.) (स्वराला) वर्ज्य करणे म्हणजे लंघन (असा कोणी अर्थ करतात तो) खोटा आहे. अल्पत्वाचा अर्थ जर वर्ज्य असा केला तर मग षाडव-ओडवाचा विधी व अल्पत्व ह्या दोन्हींत काहीच फरक राहणार नाही. उदाहरणार्थः- नंदयंती जातीत पंचम हा अंश असतो, त्याचा संवादी ऋषभ. त्याचे लंघनत्व योग्य आहे. पण तो पंचम या अंशाचा संवादी असल्याकारणाने त्याचा लोप करणे योग्य (होणार) नाही. ह्याच कारणामुळे संवादी स्वराच्या योगाने (जातीचे) षाडव-ओडव प्रकार होण्यास जी आपत्ति दाखविली आहे, ती लंघन व अनभ्यास यांच्या आधारे दाखविलेली नाही. **तत्र षाडवौडुवितकाराणाम्** इ. स्वराची लोप्यावस्था पूर्णरूपाने दाखवावयाची असते, त्यावेळी त्या स्वराचे बाहुल्याने लंघन करावयाचे असते. याच बाबतीत क्वचित अनभ्यासहि करावयाचा असतो. जे स्वर (जातीत) पर्यायांश नसतात आणि ते ज्यावेळी अंतरमार्गात प्रयुक्त होतात, त्यावेळी त्यांचा अनभ्यास केला जातो. उदाहरणार्थ :- षाड्जी जातीचे ऋषभ व निषाद हे पर्यायांश (आहेत, त्यांचा अंतरमार्ग प्रयोगाने अनभ्यास करण्यात येतो.) अशा स्वरांचे क्वचित लंघनहि करण्यात येते. ते गीताच्या ग्रह व संवादी स्वरांचे स्थान सोडून (स्वरांच्या) योगाच्या गतीमुळे होणाऱ्या न्यासाच्या समूहामध्ये होते (?) (अशा प्रकारे करण्यात येणारे) अंतरमार्गण हे अंतरमार्गाचे लक्षण समजावे.

यथाजाति इ.= अंश नसणारा स्वरहि क्वचित अल्प नसतो. (म्हणजे त्याचे एखाद्या जातीत बहुत्वही होते.) उदाहरणार्थ :- कार्माखी जातीत (अंश नसलेल्या) गांधाराची सर्व स्वरांशी संगति होते व अशातऱ्हेने अंतरमार्गाने बहुत्वयुक्त असा त्याचा प्रयोग होतो. त्याबद्दलचा नियम पुढे - ' गान्धारस्य विशेषेण सर्वतो गमनं भवेत् २८.१३६) हा सांगण्यात येणारच आहे.

आता बहुत्व सांगतात :- **अल्पत्वं तद्वद्बहुत्वम्** इ. या वाक्यात 'लक्षयति' हा शेष शब्द समजावा. (हे बहुत्व कसे जाणावयाचे ते आता) सांगतात :- **बलवदबलवतोर्विपर्यये** अबल म्हणजे अल्प, त्याचा विपर्यय म्हणजे बलवान. बहुत्वामुळे (बलवान स्वराचे) लक्षण जाणले जाते.म्हणूनच म्हणतात :- **जातिस्वैरस्तु नित्यम्** इ.= जातिगत अल्पत्वाप्रमाणेच बहुत्वहि दोन प्रकारचे असते. जातीचे पर्यायांश व संवादी स्वर यांनी बहुत्व हे लक्षित होते. त्यामुळे अलंघन व अभ्यास या दोन उपायांनी अशा स्वरांचे बहुत्व सांगितले आहे. ।।७४।।

**सञ्चारांश-बल-स्थानामल्पत्वे दुर्बलासुच ।**
**न्यासश्चान्तरमार्गश्च जातीनां व्यक्तिकारकः ॥ ७५ ॥**

**षट्स्वरं षाडवितं चतुर्दशविधं सप्तचत्वारिंशत्प्रकारं पूर्वोक्तविधानं यथाजात्यंशप्रकारमिति ।**
**पञ्चस्वरमौडुवितं विज्ञेयं दशविधं प्रयोगज्ञैः ।**
**त्रिंशत्प्रकारविहितं पूर्वोक्तं लक्षणं चास्य ॥ ७६ ॥**

बलवान पर्यायांश स्वरांचे (बहुत्व) व दुर्बल स्वरांचे अल्पत्व यांमुळे ( निरनिराळ्या स्वरांवर) होणारा न्यास आणि अंतरमार्ग (ह्या दोन क्रिया) जातींचे व्यक्तित्व निर्माण करतात. ॥ ७५ ॥ (जातींचे) सहा स्वरी षाडवित रूप चौदा प्रकारचे असून त्याचे भिन्न भिन्न प्रकार सत्तेसाळीस एवढे होतात. हे पूर्वी सांगितलेल्या रीतीप्रमाणे त्या त्या जातीच्या अंशाच्या प्रकाराप्रमाणे समजावे.

पाच स्वरांचे ओडव रूप प्रयोग-जाणकारांनी दशविध जाणावे. त्याचे तीस प्रकार होतात. त्याची लक्षणेहि पूर्वी सांगितलीच आहेत. ॥ ७६ ॥

अ. भा.- या प्रमाणे अल्पत्व-बहुत्वाचा उपयोग दाखवून प्रसंगवशात् आता त्यांचा दुसराहि एक उपयोग सांगतात :- **सञ्चारांशबलस्थानाम्** इ. संचाराने अर्थात पर्यायाने होणारे जे अंश (पर्यायांश) त्यांच्या आधाराने जातींचा न्यासान्तरमार्ग हा (जातींच्या) स्वरूपाचा अभिव्यंजक होतो, दुसऱ्या कोणत्याही रीतीने न्यासान्तरमार्गाचा उपयोग होऊ शकत नाही. **अल्पत्वे** = अल्पत्व विषयाचे स्वर म्हणजे लोप्य व अनंश स्वर; त्यांच्या बाबतीत ज्या दुर्बल किंवा हीनबल जाती असतात, त्यांचेहि स्वरूप प्रकट करण्यास (='स्वरीभवति') न्यासान्तरमार्ग हा साधनरूप होतो, दुसऱ्या कशासाठी नाही. "सर्वत्र प्रधान असलेल्या अंतरमार्गाच्या स्वरूपाचा लाभ अल्पत्वबहुत्वाशिवाय होतच नाही असे मानणारे टीकाकार या (७५ व्या) श्लोकाची व्याख्या अंतरमार्गाच्या लक्षणाने करतात, ती अशी- च = हेतुदर्शक. **अन्तरमार्गस्तु जातीनाम्** इ. अन्तरमार्ग हा जातींचा व्यक्तिकारक असून अल्पत्व-बहुत्वजीवी हे त्याचे लक्षण आहे. **सञ्चारांश** इ. = संचार अर्थात अंशस्वर व अनुवादी स्वर हे मुख्य समूहात असतात, त्यामुळे म्हणजे संवादी स्वरांच्या

बलवत्तेमुळे (त्यांचे बहुत्व होते), आणि **अल्पत्वे दुर्बलासु** = अल्पस्वरांच्या दुर्बलतेमुळे त्यांचे उल्लंघन करण्यात येऊन (अंश व संवादी या बलवान स्वरांवर) न्यास केला जातो. ही क्रिया म्हणजेच अंतरमार्ग होय. त्या कारणाने स्वरांचे अल्पत्व बहुत्व सांगावे लागते."

दुसरे टीकाकार अर्थ करतात :- " ही जाति या दुर्बलस्वरांनी व या बलवान स्वरांनी युक्त आहे, हे न्यास व अन्तरमार्ग हया दोघांमुळे समजते आणि पर्यायांशाच्या बहुत्वाचा प्रयोग न्यासान्तरमार्गाच्या जोरावर होतो." ॥७५॥

षाडवाचे लक्षण पूर्वी सांगितले होते, तरी पण जातींचे लक्षणदशक सांगण्याच्या प्रसंगाचा समतोलपणा ठेवण्यासाठी (= 'प्रसङ्गशय्यावैषम्यशान्तये' ) पुन्हा सांगतात :- षट्स्वरं **षाडवम्** इ. = '**चतुर्दशजातिविधाः**' म्हणजे (षाडव-औडुव) चौदा जातींचे (अंशापवाद) प्रकार. चार जाती पूर्ण असल्यामुळे त्यांच्यात ह्या गोष्टीचा अभाव आहे. **सप्तचत्वारिंशत्प्रकारम्** इ. = सर्व (जातींचे एकूण ) अंश त्रेसष्ट., अर्थात त्यातून (चार) जातींचे (नऊ अंश) बादमून केले असता(त्रेसष्ट ही संख्या होते.)(यात पुन्हा ) अपवाद सात आहेत, त्याविषयी सांगतातः- **जात्यंशप्रकारम्** इ. जातींच्या अंशस्वरांच्या आधाराने जो अपवादविधी सांगितला आहे, तो लागू केला असता (='अतिक्रमेण') होणारे जातींचे प्रकार (ते असे :-) अंशांची एकूण संख्या त्रेसष्ट; त्यातून नित्यपूर्ण जातीचे नऊ अंश बाद करावयाचे. त्यातूनही पुन्हा नित्य षाडव जातीचे बारा अंश वजा करावे. असे केल्यावर बेचाळीस अंश शिल्लक राहतात. पुन्हा त्यातुन औडुवितेतेला अपवाद करणारे बारा अंश काढून टाकले म्हणजे तीस अंश शिल्लक राहतात.हीचं गोष्ट सांगतातः- **पूर्वोक्त लक्षणंचास्य** इ. ॥ ७६ ॥

**षट्स्वरस्य प्रयोगोऽस्ति तथा पञ्चस्वरस्यच**
**चतुःस्वरप्रयोगोऽपि ह्यवकृष्टध्रुवास्विह ॥ ७७ ॥**
**द्वैग्रामिकीणां जातीनां सर्वासामपि नित्यशः ।**
**अंशास्त्रिषष्टिर्विज्ञेयास्तेषां चैवांशवद् ग्रहाः ॥ ७८ ॥**

(जातींचे) सहा स्वरांचे व पाच स्वरांचे प्रयोग हे (वर सांगितल्याप्रमाणे) होतातच, परंतु **अवकृष्ट ध्रुवांच्या** गायनात (फक्त) चार स्वरांचा प्रयोगहि करण्यात येतो. ॥ ७७ ॥

दोन्ही ग्रामांतील सर्व जातींचे नेहमी एकूण त्रेसष्ट अंश जाणावे. त्यांचे ग्रह हेहि अंशाप्रमाणेच (समजावे.) ॥ ७८ ॥

अ. भा. - आता वर सांगितलेल्या विषयाच्या व्यतिरिक्त ध्रुवांचे आणखी काही वैशिष्ट्य असते, पण गांधर्वात त्याचा अभाव असतो. (त्याचा खुलासा करण्यासाठी) सांगतात :-

**षट्स्वरस्य प्रयोगोऽस्ति तथा पञ्चस्वरस्यच** इ. = **तथा** हा शब्द समुच्चय या अर्थी व उत्पत्तीच्या किंवा मर्यादेच्या अर्थी योजिला आहे. ह्या शब्दाने सुचवितात की, संपूर्ण जातीप्रमाणेच (प्रकार रूपाने) सहास्वरी

(म्हणजे षाडव) व पाचस्वरी (म्हणजे औडुव) हे प्रयोग करावयाचे असतात. अस्ति इ. हा विषय सांगतात. इह = हे जे नाट्योपयोगी असे ध्रुवागान आहे, त्यात चार स्वरी प्रयोगहि होतो. अपि शब्दाने सूचित करतात की पूर्वोक्त विविध प्रकार (संपूर्ण षाडव व औडुव) यांचा प्रयोग तर होतोच, पण शिवाय चारस्वरी गायनाचा प्रयोगहि होतो. तो कोठे करावयाचा? तर तेच सांगतात :-

**अवकृष्टासु** :- गुरूप्राय (= गुरूअक्षरे जास्त असलेल्या ) व करुण रसाला उपयुक्त अशा ध्रुवांमध्ये (हा चार स्वरांचा प्रयोग केला जातो.) ॥ ७७ ॥

पुढे, ज़ातींचे ग्रह व अंश यांची संख्या सांगण्यासाठी जातींचे विभाग (ग्राम) निर्दिष्ट करतात :- **द्वैग्रामिकीणां जातीनाम्** इत्यादि. ॥ ७८ ॥

अंश ग्रहमिदानी वक्ष्यामः । तत्र
मध्यमोदीच्यवायास्तु नन्दयन्त्यास्तथैव च ।
तथा गान्धारपञ्चम्याः पञ्चमोंऽशो ग्रहस्तथा ॥ ७९ ॥

धैवत्याश्च तथा ह्यंशौ विज्ञेयौ धैवतर्षभौ ॥
पञ्चम्याश्च तथा ज्ञेयौ ग्रहांशौ पञ्चमर्षभौ ॥ ८० ॥

गान्धारोदीच्यवायास्तु ग्रहांशौ षड्जमध्यमौ ।
आर्षभ्याश्च ग्रहा अंशा धैवतर्षभसप्तमाः ॥ ८१ ॥

गान्धारश्च निषादश्च ह्यार्षभश्च तथापरः ।
निषादिन्यास्त्रयो ह्येते ग्रहा अंशाश्चकीर्तिताः ॥ ८२ ॥

षड्ज-पञ्चम-गान्धारैस्त्रिभिरेव प्रकीर्तिता ।
अंशर्ग्रहैस्तथा चैव विज्ञेया षड्जकैशिकी ॥ ८३ ॥

षड्जश्च मध्यमश्चैव निषादो धैवस्तथा ।
षड्जोदीच्यवतीजातेर्ग्रहा अंशाश्च कीर्तिताः ॥ ८४ ॥

पञ्चमश्चार्षभश्चैव निषादो धैवतस्तथा ।
कार्माख्या बुधैरंशा ग्रहाश्च परिकीर्तिताः ॥ ८५ ॥

गान्धारश्चार्षभश्चैव पञ्चमोऽथ निषादवान् ।
चत्वारोंऽशा भवन्त्यान्ध्र्या ग्रहाश्चैव तथैव हि ॥ ८६ ॥

षड्जश्चार्षभश्चैव मध्यमः पञ्चमस्तथा ।
मध्यमाया ग्रहा ज्ञेया अंशाश्चैव सधैवताः ॥ ८७ ॥

**निषाद-षड्ज-गान्धार-मध्यमाः पञ्चमस्तथा ।**
**गान्धारी - रक्तगान्धार्योर्ग्रहा अंशा प्रकीर्तिताः ॥ ८८ ॥**

**षाड्जी धैवत-गान्धार-षड्ज-मध्यम -पञ्चमैः**
**ग्रहैरंशैश्च विज्ञेया विकृता स्वर-योगतः ॥ ८९ ॥**

**कैशिक्याश्चार्षभं हित्वा ग्रहांशाःषट् स्वराः स्मृताः ।**
**सप्तस्वरग्रहांशा तु विज्ञेया षड्जमध्यमा ॥ ९० ॥**

**एते त्रिषष्टिर्विज्ञेयाः सर्वास्वत्र तु जातिषु ।**
**अंशवच्च ग्रहास्तासां सर्वासामेव नित्यशः ॥ ९१ ॥**

(जातींचे) **अंश** व **ग्रह** आता सांगतो, ते येणे प्रमाणे :-

मध्यमोदीच्यवा, नंदयंती व गान्धारपंचमी या जातीचा अंश व ग्रह स्वर पंचम हा आहे. ॥ ७९ ॥ धैवतीचे अंश (व ग्रह) ऋषभ आणि धैवत हे जाणावे. ॥ ८० ॥

गांधारोदीच्यवा जातीचे ग्रह व अंश षड्ज व मध्यम हे आहेत आणि आर्षभीचे ग्रह व अंश धैवत, ऋषभ, व निषाद हे होत. ॥ ८१ ॥

निषादिनीचे ग्रह व अंश गांधार, निषाद आणि ऋषभ हे तीन स्वर सांगितले आहेत. ॥ ८२ ।

षड्जकैशिकी (जिच्यात) षड्ज, पञ्चम व गांधार हे तीन ग्रह व अंश सांगितलेले आहेत अशी जाणावी. ॥८३॥

षड्ज, मध्यम, निषाद तसेच धैवत हे (चार स्वर) षड्जोदीच्यवती जातीचे ग्रह व अंश सांगितलेले आहेत. ॥ ८४ ॥

कार्मारवीचे, पंचम, ऋषभ, निषाद तसेच धैवत(हे चार स्वर) ज्ञात्यांनी अंश व ग्रह सांगितले आहेत. ॥ ८५ ॥

आन्ध्रीचे अंश तसेच ग्रह चार असून ते गांधार, ऋषभ, पंचम आणि निषाद असे आहेत.॥ ८६ ॥

मध्यमा जातीचे ग्रह व अंश षड्ज, ऋषभ, मध्यम तसेच पंचम आणि धैवत ( हे पाच स्वर ) आहेत ॥८७॥

गान्धारी व रक्तगांधारी ह्या दोन्ही जातींचे अंश व ग्रह निषाद, षड्ज, गांधार, मध्यम तसेच पंचम (हे पाच स्वर) सांगितले आहेत ॥ ८८ ॥

षाड्जी जातीचे ग्रह व अंश षड्ज, गांधार, मध्यम, पंचम आणि धैवत (हे पाच) जाणावे. (अंशाखेरीज अन्य ) स्वर ग्रह बनतो तेव्हा (षाड्जी वगैरे जाती) विकृत होतात. ॥ ८९ ॥

ऋषभ सोडून बाकीचे सहा स्वर (म्हणजे षड्ज, गांधार ,मध्यम, पंचम, धैवत आणि निषाद ) हे कैशिकीचे ग्रह व अंश सांगितले आहेत. (षड्जादि) सातहि स्वर ग्रह व अंश असलेली षड्जमध्यमा जाणावी. ।। ९० ।।

ह्याप्रमाणे सर्व जातींचे मिळून एकूण हे त्रेसष्ट अंश जाणावे.

त्या सर्व (जातींचे ) ग्रह हे नेहमी अंशाप्रमाणे (जाणावे) ।। ९१ ।।

अ. भा. - आता ग्रामविभागांचा क्रम सोडून (केवळ अंशादिकांच्या) संख्येच्या अनुलक्षून जातींची एकापासून सातपर्यंत अंशव्यवस्था सांगतात. (ती अशी :-) तीन जातींमध्ये एक-एक अंश आहे. तीन जातींचे अंश दोन-दोन. पुन्हा तीन अंशवाल्या जाती तीन व चार अंश असलेल्या तीन (त्याचप्रमाणे) पाच अंशवाल्या जाती चार असून सहा अंश असलेल्या जाती एक व सात अंशवाली जाति एक आहे. ह्याप्रमाणे जातींच्या एकूण अंशांची संख्या त्रेसष्ट आहे.

[स्पष्टीकरण = उपरोक्त कथनानुसार दोन्ही ग्रामांतील १८ जातींच्या अंशांची एकूण संख्या पुढीलप्रमाणे होते :- एक अंशवाल्या जाती तीन = ३×१ = ३ अंश, दोन अंशवाल्या जाती तीन = ३×२=६ अंश. तीन अंशवाल्या तीन = ३×३= ९, तीन जातींचे अंश प्रत्येकी चार=३×४=१२ अंश.

चार जातींचे प्रत्येकी अंश पाच पाच = ४×५ =२० अंश; एक जाति सहा अंश असलेली = १×६ =६ अंश व सात अंशवाली जाति एक = १×७ =७ अंश. याप्रमाणे सर्व जातीचे मिळून ३+६+९+१२+२०+६+७ =६३ एकूण] (दरेक जातीचे) जे अंश असतात तेच ग्रह (समजावे) मात्र नियमाला एकच अपवाद आहे. तो असा :- नंदयंती जातीत (उपरोक्त नियमानुसार ) अंश स्वर(पंचम हा) ग्रह असावयास पाहिजे होता, पण तिची लक्षणे सांगितली आहेत, त्यात तिचा ग्रह स्वर गान्धार असल्याचे म्हटले आहे, म्हणून एवढा एक विकल्प समजावा. परंतु अंशाचेच ग्रहत्व मुनींनी सांगितले अल्यामुळे तोच नियम मुख्य समजावा. (ग्रहत्वाचा हा नियम मोडून ) संवादी किंवा विवादी स्वरांपैकी एखादा स्वर जेव्हा (कोणत्याही जातीचा) ग्रह स्वर केला जातो, तेव्हा त्या जातीचे विकृतत्व होते असे समजावे. (म्हणजे त्या जातीचा तो विकृत प्रकार समजावा.) हीच गोष्ट स्पष्ट करतात :- **विकृता स्वरयोगतः** ग्रह-विकार (म्हणजे अंशाखेरीज अन्य स्वर ग्रह होणे ही विकृति) सर्वच जातींना असते :- **सर्वास्वत्र.** ।। ७९-९१ ।।

**सर्वासामेव जातींना त्रिजातिस्तु गणःस्मृतः ।**
**ते च सप्त गणा ज्ञेया वर्धमानस्वरा बुधैः ॥ ९२ ॥**

**एकस्वरो द्विस्वरश्च त्रिस्वरश्च चतुःस्वरः ।**
**पञ्चस्वरश्चतुर्धा स्यादेकधा सप्तषट्स्वरौ ॥ ९३ ॥**

सर्वच जातींचे, तीन जातींच्या आधारावर सात वर्ग सांगितले आहेत. ते ज्ञात्यांनी (क्रमाक्रमाने) स्वर वाढत जाणारे असे जाणावे ।। ९२ ।।

(ते असे :-) एक स्वरी, दोन स्वरी, तीन स्वरी, चार स्वरी, चार प्रकारचे पाच स्वरी, आणि एक प्रकार असणारे सहा स्वरी व सात स्वरी ॥ ९३ ॥

अ.भा. (मागे दर्शविल्याप्रमाणे) जातींच्या अंशविभागांचे प्रयत्नपूर्वक ज्ञान होण्यासाठी मुख्या संख्या विभाग संक्षिप्तात सांगतात :- **सर्वासोमव जातींना त्रिजातिस्तु गणः इ. गण** म्हणजे समूह, ते सर्व जातींचे (पुढे दाखविल्याप्रमाणे) तीन जातींच्या आधाराने करावयाचे आहेत. परंतु येथे शंका अशी की, समूह हा कोणत्या तरी एका (जातीला) अनुलक्षून करावयाचा असतो, त्यामुळे (तीन जातींचा आधार घेऊन) समूह करण्यात काय अर्थ आहे? (या शंकेचे उत्तर देण्यासाठी) सांगतात :- **तेच सप्तगणा ज्ञेया वर्धमान स्वराः** इ. अर्थात एकस्वर अंश असलेल्या जातींच्या स्वरांचा एक गण या प्रमाणे सात स्वर अंश असलेल्या (जातींच्या गणांपर्यंत गण जाणावे.) या रीतीने अंशाच्या संख्येप्रमाणे (गणांच्या) विभागांची योजना सांगितली गेली आहे. (शंका :-) जर तीन जातींच्या आधारावर सात गण करावयाचे आहेत, तर जातींची संख्या एकवीस एवढी होइल. (उत्तर :-) ते असे (होणार) नाही, कारण एकूण जाती अठरा असल्याने पूर्वीच सांगितले आहे :- **जातयोऽष्टादशेत्येवं ब्रह्मणाभिहितम्** इ. (१.२.२८.२९) ह्याच गोष्टीचा अपवाद सांगण्यासाठी त्रिक म्हणजे तीन जातींचा ग्रह करून (जातींचे गण) सांगितले आहेत. ॥ ९२ ॥

आता तीन जातींच्या समूहीकरणाचा विषय स्पष्ट करतात :- त्रिजातिक होतात असा अर्थ, त्यामुळे या (४×३)=१२ जाती होतील.येथे एका स्वरापासून चार स्वरांपर्यंत अशांची संख्या समजावी. ह्या नियमाला अपवाद सांगतात :- **पञ्चस्वराश्चतुर्धा स्यात्** इ. या कथनानुसार पाच स्वरी गण चार जातींचा होतो. त्यामुळे मागच्या १२ व या चार मिळून १६ जाती झाल्या. पुढे **एकधा** वगैरे शब्दांनी सहा स्वरी व सात स्वरी अशा प्रकारे दोन गणांच्या एकूण दोन जाती सांगतात.गण हे अंशस्वरावर आधारित असल्यामुळे येथे एक जातीचा सुध्दा गण म्हणला आहे. तर याप्रमाणे एकूण १८ जाती व त्याचे ६३ अंश गणून दाखविले आहेत. अंश हे ग्रह असल्यामुळे ( त्यांची संख्याहि तेवढीच होईल.) ॥ ९३ ॥

**एतदुक्तं मया त्वासां ग्रहांशपरिकल्पनम् ।**
**पुनश्चैव प्रवक्ष्यामि न्यासापन्यासयोगतः ॥ ९४ ॥**

ह्याप्रमाणे ग्रहांशांची कल्पना मी सांगितली. आता जातींचे न्यास व अपन्यास स्वर अणि (इतर लक्षणांचे) योग यासह पुन्हा एकदा सांगतो. ॥ ९४ ॥

अ. भा. - ह्या कथनाचा उपसंहार करतात :- **एवदुक्तं मया....**
**पुनश्चैव प्रवक्ष्यामि न्यासापन्यासयोगतः** ॥ ह्याचा सारांश असा की, जातींचे अंश व ग्रह हे सांगून झाले. आता पुढे न्यास व अपन्यास, त्याचप्रमाणे जातीच्या दहा लक्षणांपैकी षाडव ओडव वगैरे बाकीची जी लक्षणे जी पूर्वी सांगितलेली नाहीत, ती प्रत्येक जातीची सांगावयाची आहेत. 'न्यासापन्यासयोगतः' हा न्यास, अपन्यास व योग असा द्वन्द्व समास आहे. 'योग' शब्दाने असे समजवायाचे की अंशग्रहाचा विषय एकदा स्पष्ट केला असला तरी, (प्रत्येक जातीचे सविस्तर वर्णन करताना) ग्रहांशांचा पुनः उल्लेख

करावयाचा आहे.त्यामुळेच जातींचे स्वरूप स्पष्टपणे समजणे शक्य होईल, हे तात्पर्य. अंशाच्या अपेक्षेनेच प्रायः अन्य (न्यासादिकांच्या) लक्षणांचा बोध होतो, असे जरी असले तरी, जातीची सर्व लक्षणे एकाच ठिकाणी सांगितली तर प्रत्येक जातीचे स्वरूप विशेष स्पष्ट होऊन समजविण्यास सोपे होईल, (हे उघड आहे) ............. किंवा जातींचे गायन हे दृष्ट म्हणजे ऐहिक व अदृष्ट म्हणजे पारलौकिक कार्यार्थ (= संगीतासाठी व गांन्धर्वासाठी) उपयुक्त आहे, (हे आम्ही मागे स्पष्ट केलेच आहे). अन्यमताने अंशग्रहलक्षणम् इ. असा या श्लोकाचा पाठ मानला जातो. ॥ ९४ ॥

पञ्चांशा तु भवेत्षाड्जी निषादर्षभवर्जिता ।
अपन्यासो भवेदत्र गान्धारः पञ्चमस्तथा ॥ ९५ ॥

न्यासश्चात्र भवेत् षड्जो लोप्यः सप्तम एवच ।
षड्जगान्धारसञ्चारः षड्जधैवतयोस्तया ॥ ९६ ॥

षाडवं सप्तमापेतमल्पौ वै सप्तमर्षभौ ।
गान्धारस्य च बाहुल्यं त्वत्र कार्यं प्रयोक्तृभिः ॥ ९७ ॥

ऋषभ व निषाद हे सोडून बाकीचे पाच स्वर षाड्जी जातीचे अंश असतात; आणि गांधार व पंचम हे तेच्यात अपन्यास असतात. ॥ ९५ ॥

हिच्यात षड्ज न्यास असतो व निषाद हा वर्ज्य स्वर असतो. आणि षड्ज व गांधार तसेच षड्ज व [illegible]वत यांची परस्पर संगति असते. ॥ ९६ ॥

ह्या जातीत निषाद व ऋषभ यांचे अल्पत्व असून, निषाद वर्जित झाल्यामुळे तिचे षाडव रूप (तयर होते). प्रयोगकर्त्याने हिच्यात गांधाराचे बाहुल्य करावयाचे असते. ॥ ९७ ॥

अ. भा.- षाड्जीचे लक्षण सांगतात :- पञ्चांशा इ. म्हणजे स ग म प ध हे अंश आणि ग प हे (दोन) अपन्यास असून स हा न्यास होय. निषाद वर्ज्य होतो, तेव्हा षाडव स्वरूप होते. स व ग ह्यांचा, त्याचप्रमाणे स व ध ह्यांचा अन्योन्य संचार होतो. गांधार अतिबहुल असल्यामुळे वादी असल्यासारखा वाटतो. ह्याच कारणाने ऋषभाचे विवादित्व समजावे. ह्या जातीत ऋषभ (व निषाद ) अंश होत नाहीत, अर्थात अनंश असतात. व निषादाच्या लोप्यत्वामुळे (षाड्व अवस्थेत तो स्वर लोप पावत असल्यामुळे) तोहि अनंश बनतो. षाड्जीच्या संपूर्ण अवस्थेत निषाद वर्ज्य होत नाही, ही गोष्ट उघड होत असल्यामुळे मुनींनी ती स्वमुखाने सांगितली नाही. ह्या जातीच्या सर्व प्रकारांतील अंशांची गणना केली असता ते एकूण चौदा भरतात. ते ह्याप्रमाणे :- ह्या जातीच्या शुध्द भेदांचे अंश पाच, विकृत भेदांचे पाच, षाडव भेदांचे अंश चार, कारण गान्धार स्वर जेव्हा अंश होतो तेव्हा (त्याचा संवादी असल्यामुळे) निषाद हा वर्ज्य होऊ शकत नाही, त्यामुळे येथे हा अपवाद समजावा. लोप्य स्वरामुळे बाकीचे स्वर अंश आहेत हे आपोआपच स्पष्ट होते. ह्या नियमांच्या आधारे ह्या जातीचे अंशादि विभाग पाळले जाऊन आसारित इत्यादी गीते,

मंत्र, व स्तोत्रे, यज्ञ वगैरे प्रसंगी गायिली जात असता गान्धर्वफल प्राप्त होते; तथापि ह्या जातीच्या स्वरांच्या गायनाने एकाद्याला संगीतानंदाचीहि प्राप्ती होऊ शकते, असे पाहण्यात येते. 'सकृत्प्रयुक्ताऽपिहि नन्दयन्ती' इ. असे (नंदयंती जातीबद्दल म्हटले आहे, ते (धार्मिक फलाचे) प्राधान्य दर्शविण्यासाठी होय. (अनेक प्रकारचे) विशेष ताल सोडून केवळ सामान्य अशा चच्चत्पुटादि तालात वार्तिक मार्गाने लोकांत जातिगान प्रसिध्द आहे, म्हणून जातींचे चच्चत्पुटादि ताल सांगितले आहेत, तो विकल्प समजू नये. (शिवाय या तालांचा) चतुष्कल वगैरे भेदांनी जो कलापात विधी (तालप्रकरणात) सांगितला आहे, तो योग्य असूनहि लौकितात तसा प्रचलित नाही. (गाण्याच्या दृष्टीने) स्वरभागाचे प्राधान्य असल्यामुळे ब्रह्मप्रोक्त संस्कृत-प्राकृत (गीतांची स्वरबद्ध रूपे प्रचारात आहेत. अशा गीतांत स्वरभागाबरोबरच विशिष्ट) तालभागांचे प्राधान्य असते.(अर्थातच गीत हे स्वरबद्ध व तालबद्ध असते.) याबद्दल म्हटले आहे :- वर्धमानप्रयोक्तारो यास्यन्ति शिवकेतनम् ।। इ. (म्हणजे "वर्धमान गीतांचा प्रयोग करणारे शंकराच्या स्थानाला जातात.") ते.(प्राचीन गीतांचे) श्रेष्ठत्व दाखविण्यासाठी समजावे. जातींच्या (निरनिराळया) अंशापासून (उत्पन्न झालेली) शुद्ध भिन्न इत्यादी ग्रामरागांत रचलेली त्रोटक वगैरे गीते प्रसिध्दच आहेत. मुख्यतः जातींच्य अंशावर आधारित व गीति राग,आणि ताल यांनी बद्ध असे संस्कृत शब्द (अर्थात गीते) ही सर्व गांध संगीतात अन्तर्भूत असून त्याचसाठी उपयुक्त आहेत. अशा प्रकारची गीतक,वर्धमान वगैरे (गीते) पू (गांधर्व संगीतात ) प्रचलित होती, एवढे विवेचन येथे पुरे आहे. ।। ९५-९७ ।।

**आर्षभ्यामृषभस्त्वंशो निषादो धैवतस्तथा ।**
**एत एव ह्यपन्यासा न्यासश्चाप्यृषभः स्मृतः ।**
**षट्पञ्चस्वरता चात्र षड्जपञ्चमयोर्विना ।। ९८ ।।**

आर्षभी जातीचे अंश ऋषभ, निषाद तसेच धैवत हे असून अपन्यास पण तेच असतत, आणि ऋषभ हा न्यास सांगितला आहे. षड्ज वर्ज्य होतो तेव्हा हिचे षाडव आणि षड्ज-पंचम वर्जत झाल्याने ओडव रूप होते. ।। ९८ ।।

अ. भा. - आता आर्षभीचे लक्षण सांगतात :- **आर्षभ्याम्** इ. रि, ध, नि हे आर्षभीचे अंश, रि, ध, नि हेच अपन्यास आणि ऋषभ स्वर हा न्यास होय. षड्ज वर्ज्य होतो, तेव्हा षाड्व आणि षड्ज व पंचम वर्ज्य होतात, तेव्हा ह्या जातीचे औडुवित रूप होते. स-ध व रि-ग यांची संगति (हिच्यात) असते. आर्षभीत कोणी पंचम स्वराचे लंघन सांगतात. ह्या जातीची पूर्णावस्था असते, तेव्हा षड्ज, गांधार व पंचम हे अल्पत्व पावतात. अर्थात यांचा प्रयोग अल्प होतो. तसेच औडुव रूप असते तेव्हा गान्धार व मध्यम यांचे अल्पत्व असते. आर्षभी जातीचे एकून अंश बारा होतात. मूर्च्छना पंचमादि व ताल चच्चत्पुट असून ह्या जातीचा विनियोग बहुधा नैष्क्रामिकी ध्रुवा गाण्यासाठी करण्यात येतो. ।। ९८ ।।

**धैवत्यां धैवतो न्यासस्त्वंशावृषभधैवतौ ।**
**अपन्यासा भवन्त्यत्र धैवतार्षभमध्यमाः ।। ९९ ।।**

षड्जपञ्चमहीनं तु पाञ्चस्वर्यं विधीयते
पञ्चमेन विना चैव षाडवं परिकीर्तितम् ॥ १०० ॥

आरोहिणौ च तौ कार्यौ लङ्घनीयौ तथैव च ।
निषादश्चर्षभश्चैव गान्धारो बलवांस्तथा ॥ १०१ ॥

धैवती जातीचा न्यास धैवत व अंश ऋषभ-धैवत हे होत. ऋषभ मध्यम व धैवत हे स्वर हिच्यात अपन्यास असतात. ॥ ९९ ॥

(या जातीचे) ओडव रूप षड्ज व पंचम वर्ज्य झाल्याने होते. आणि (एकटा) पंचम वर्ज्य झाल्याने षाडव रूप सांगितले आहे. ॥ १०० ॥

ते (षड्ज व पंचम हे स्वर) आरोही घ्यावयाचे असून लंघनीयहि आहेत. (हिच्यात) निषाद, ऋषभ व गांधार हे स्वर बलवान असतात. ॥ १०१ ॥

अ. भा.- आता धैवती जातीचे वर्णन करतात. :- ' **धैवत्याम्** . इत्यादि. धैवती जातीचे अंश ऋषभ व धैवत हे होत. विकृत अवस्थेमध्ये रि, ध, म हे अपन्यास असतात. ह्या जातीचा न्यास स्वर धैवत हा आहे. पंचमाचा लोप होतो तेव्हा षाडव व षड्ज-पंचमाचा लोप झाल्याने औडुव रूप होते. संपूर्ण अवस्थेत आरोही वर्णात पंचम व षड्ज यांचे लंघन करण्यात येते.या स्वरांच्या लोप्यत्वाच्या नियमामुळे लंघन आपोआप सिध्द होते, तथापि ही गोष्ट स्पष्ट करण्याकरिता येथे पुन्हा सांगितली आहे. ह्या जातीचे एकूण अंश आठ होतात, ते याप्रमाणे :- संपूर्ण भेदाच्या शुध्द व विकृत अवस्थांचे दोन-दोन व षाडव-ओडव अवस्थांचे दोन-दोन. ॥ ९९-१०१ ॥

निषादिन्यां निषादेंऽशो सगान्धारर्षभस्तथा ।
एत एव ह्यपन्यासा न्यासश्चैवात्र सप्तम : ॥ १०२ ॥

धैवत्या इव कर्तव्ये षाडवौडुविते तथा ।
तद्वच्च लङ्घनीयौ तु बलवन्तौ तथैव च ॥ १०३ ॥

अंशास्तु षड्जकैशिक्याः षड्जगान्धारपञ्चमाः ।
अपन्यासा भवन्त्यत्र षड्जपञ्चमसप्तमाः ॥ १०४ ॥

गांन्धारश्च भवेन्न्यासो हैनस्वर्यं न चात्र तु ।
दौर्बल्यं चात्र कर्तव्यं मध्यमस्यार्षभस्य च ॥ १०५ ॥

[धैवतस्य[१८] निषादस्य किञ्चिदाधिक्यमिष्यते ।]

**नैषादी** जातीचे अंश, ऋषभ, गांधार व निषाद हे असून अपन्यासहि तेच आहेत. हिचा न्यास निषाद हा स्वर आहे. ॥ १०२ ॥

षाडव-ओडव, लंघनीय स्वर व बलवान स्वर हे धैवतीप्रमाणेच योजावे. ॥ १०३ ॥

**षड्जकैशिकी** जातीचे अंश षड्ज, गान्धार व पंचम हे असून, अपन्यास षड्ज, पंचम व निषाद हे असतात. ॥ १०४ ॥

हिच्यात न्यास स्वर गांधार असून, कोणताहि स्वर वर्ज्य होत नाही. ऋषभ व मध्यम हे स्वर या जातीत दुर्बल असतात. ॥ १०५ ॥

[धैवत आणि निषाद यांचे किंचित् आधिक्य मानले आहे.]

अ. भा. - नैषादी जातीचे वर्णन करतात :- **निषादिन्याम्** इ. नैषादी जातीचे अंश रि ग नि हे असून तेच अपन्यास असतात. हिचा न्यास निषाद असून षाडव-ओडव भेद धैवती जातीप्रमाणे समजावे. अर्थात पंचम वर्ज्य झाल्याने षाडव व षड्ज-पंचमांचा लोप झाल्याने ओडव रूप होते. षड्ज व पंचम हे स्वर (आरोहात) लंघनीय (अल्पतर) असतात. हेच अनंश (स,प) अवरोहात 'अल्प (अनंशावबहुलौ घ्यावयाचे असतात. नैषादीचे एकूण अंश बारा होतात, ते असे :- संपूर्ण शुध्द भेदाचे तीन, संपूर्ण विकृत भेदाचे तीन, षाडव भेदाचे तीन व औडुव भेदाचे तीन याप्रमाणे बारा होतात. ॥ १०२,१०३ ॥

**षड्कैशिक्याः** इ. :- (षड्जकैशिकीचे) स, ग,प हे अंश स,प,नि हे अपन्यास व गांधार हा न्यास होय. ही जाति नित्यपूर्ण आहे, ऋषभ व मध्यम हे अनंश असल्यामुळे त्यांचे दौर्बल्य सिध्द आहे, तथापी पुन्हा तेच दृढीकरणासाठी सांगितले आहे. ह्या जातीत धैवत व निषाद या स्वरांचे किंचित आधिक्य असते. ह्या जातीचा शुध्द प्रकार नाही. (षाडव-ओडव भेदहिं नाहीत.) त्यामुळे हिचे एकूण अंश तीन होतात. ॥ १०४,१०५ ॥

**षड्जश्च मध्यमश्चैव निषादो धैवतस्तथा ।**
**स्युःषड्जोदीच्यवांशास्तु न्यासश्चैव तु मध्यमः ॥ १०६ ॥**

**अपन्यासो भवत्यस्या धैवतः षड्ज एवच ।**
**परस्परांशगमनमिष्टतश्च विधीयते ॥ १०७ ॥**

**षाट्स्वर्यमृषभापेतं कार्यं गान्धर्वविदिभिः ।**
**पञ्चमार्षभहीनं तु पाञ्चस्वर्यं तु तत्र वै ॥ १०८ ॥**

**षड्जश्चाप्यृषभश्चैव गान्धारश्च बली भवेत् ।**
**गान्धारस्य च बाहुल्यं मन्द्रस्थाने विधीयते ॥ १०९ ॥**

**षड्जोदीच्यवती** जातीचे अंश षड्ज, मध्यम, धैवत व निषाद हे असून न्यासस्वर मध्यम हा असतो. ॥ १०६ ॥

तिचे अपन्यास षड्ज व धैवत हे असतात. अंश स्वरांची इष्ट अशी परस्पर संगति करावयाची असते. ॥ १०७ ॥

ऋषभ वर्ज्य झाल्याने हिच्यात षाडव आणि ऋषभ-पंचम वर्ज्य करून ओडव रूप गांधर्व जाणकारांनी योजावयाचे असते. ॥ १०८ ॥

(या जातीत ) बलवान स्वर षड्ज, ऋषभ व गांधार हे असतात; पैकी गांधाराचे बाहुल्य मंद्रस्थानात योजायचे असते. ॥ १०९ ॥

अ. भा. - **षड्जोदीच्यवा ... षड्जश्च** इत्यादि :- षड्जोदीच्यवा ह्या जातीचे अंश स,म,नि,ध हे होत. धैवत व षड्ज हे हिचे अपन्यास आणि मध्यम हा न्यास असतो. अंशांची परस्पर संगति होते. ऋषभाचा लोप झाल्याने षाडव भेद होतो. ऋषभ व पंचम यांच्या लोपामुळे औडुव रूप होते. षड्जग्रामात ऋषभ हा धैवताचा संवादी असल्यामुळे धैवत अंश केला असता ऋषभाचा लोप होऊ शकत नाही. (अर्थात अशा वेळी या जातीचे षाडव रूप होत नाही.) ह्या जातीत स, रि, ग हे स्वर बलिष्ठ असतात. षड्ज हा अंशापैकी एक असल्याने त्याचे बलवान स्वरूप सिध्द असूनहि आधिक्य दाखविण्यासाठी पुनरुक्ति केली आहे.(सांगितलेल्या नियमाप्रमाणे) ऋषभाचे अत्यल्पत्व सिध्द होते, याचा निषेध करण्यासाठी (येथे ऋषभ हा ही बलवान स्वर असल्याचे म्हटले आहे.) ह्या जातीत गांधाराचे बाहुल्य मंद्रस्थानात असते. ह्या जातीचे एकूण अंश अकरा होतात ते असे :- संपूर्ण भेदाचे चार, षाडव भेदाचे तीन, कारण धैवत अंश केला असता एका षाडव रूपाचा अपवाद होतो. (अशावेळी हिचे षाडव रूप होऊ शकत नाही); आणि औडुवित भेदाचे अंश चार. (ही जाती मुळातच मिश्र असल्यामुळे) हिचा शुध्द असा प्रकार नाही.

वर षड्जकैशिकी जातीचे वर्णन आले आहे. तिच्या नावात 'कैशिकी' शब्द आहे. कैशिक या शब्दाची निरुक्ति आम्ही पूर्वी सांगितलीच आहे. कैशिकाच्या योगामुळे (= कैशिक स्वरांच्या प्रयोगामुळे या जातीला 'कैशिकी' ही संज्ञा प्राप्त होते. (षड्जोदीच्यवा या नावातील) 'उदीच्यवा' शब्दाची व्युत्पत्ति कोणी अशी सांगतात :- 'उदीच्याः' म्हणजे जिचा अधिक प्रयोग करणारे लोक उत्तरेकडील असतात, ती उदीच्याः ('वा' प्रत्ययावरून असा अर्थ निघेल.) वान्ति = गच्छन्ति (म्हणजे जातात.) उत्तरेकडेच (विशेषतः =) आढळण्यात येते. (म्हणून उदीच्य-वा). ज्या गीतांचा (रागांचा)प्रचार अमुक एका प्रदेशात बाहुल्याने दिसून येतो, त्या प्रदेशाचे नांव त्या गीतांना (रागांना) उचित्वाच्या दृष्टीने ठेविले जाते, (अशी रूढि आहे.) उदा.- राग टक्क, मालवपंचम, गौडी, मालवी, काम्भोजी वगैरे. ॥ १०६-१०७ ॥

**सर्वेऽशाः षड्जमध्यायामपन्यासास्तथैव च ।**
**षड्जश्च मध्यमश्चापि न्यासौ कार्यौ प्रयोक्तृभिः ॥ ११० ॥**

**गान्धारसप्तमापेतं पाञ्चस्वर्यं विधीयते ।**
**षाडवं सप्तमापेतं कार्यं चात्र प्रयोगतः ॥ १११ ॥**

**सर्वस्वराणां सञ्चार इष्टतस्तु विधीयते,**
**षड्जग्रामाश्रिता ह्येता विज्ञेयाः सप्त जातयः ॥ ११२ ॥**

**षड्जमध्यमा** जातीचे अंश सर्व म्हणजे सातहि स्वर असतात. तसेच अपन्यासहि तेच असतात. प्रयोगकर्त्यांनी षड्ज व मध्यम हे स्वर न्यास म्हणून योजावे. ॥ ११० ॥

गांधार व निषाद वर्ज्य करून हिच्यात ओडव रूप योजिले जाते व निषाद वर्ज्य करून प्रयोगानुसार षाड्व रूप योजिले जाते. ॥ १११ ॥

इच्छेनुसार सर्व स्वरांची परस्पर संगति योजिले जाते. याप्रमाणे ह्या षड्जग्रामातील सात जाती जाणाव्या ॥ ११२ ॥

अ. भा. :- .......... **षड्जमध्यमा सर्वेऽशाः षड्जमध्यमायाम्** इ. :-

षड्जमध्यमा जातीचे अंश सात व तेवढेच अपन्यास समजावे. षड्ज व मध्यम हे हिचे न्यास होत. निषादाचा लोप होऊन हिचे षाडव रूप बनते आणि गांधार निषाद वर्ज्य झाल्याने औडुव रूप होते. जेव्हा (निषादाखेरीज) अन्य स्वर अंश होतात तेव्हा या जातीत निषादाचा प्रयोग फार थोडा होतो. या जातीत स्वरांचा संचार (=स्वरसंगति) यथेष्ट होते. ह्या जातीच्या सर्व प्रकारांच्या एकूण अंशांची गणना केली असता त्यांची संख्या सतरा होते, ती अशी :- संपूर्ण भेदांचे अंश सात; षाडव भेदांचे अंश स्वर पाच व औडुव प्रकारांचे पाच; कारण गांधार-निषादांच्या संवादित्वाचा अपवाद बाधक होतो. (षाडव प्रकारात सहा अंश होऊ शकत नाहीत.) या विषयाचा उपसंहार करतात :- षड्जग्रामाश्रयाः सप्त. इ. ॥ ११०-११२ ॥

**अतः परं प्रवक्ष्यामि मध्यमग्रामसंश्रयाः ।**
**गान्धार्याः पञ्च एवांशा धैवतर्षभवर्जिताः ॥ ११३ ॥**

**षड्जश्च पञ्चमश्चैव ह्यपन्यासौ प्रकीर्तितौ ।**
**गान्धारश्च भवेन्न्यासः षाडव चर्षभं विना ॥ ११४ ॥**

**धैवतर्षभयोर्हीनं तथा चौडुवितं भवेत् ।**
**लङ्घनीयौ च तौ नित्यमार्षभाद्धैवतं व्रजेत् ।**
**विहितस्त्विति गान्धार्याः स्वरन्यासांशगोचरः ॥ ११५ ॥**

यानंतर आता मध्यमग्रामातील (जाती) सांगतो :- गांधारी जातीचे अंश धैवत व ऋषभ सोडून (बाकीचे ) पाच स्वरच आहेत. ॥ ११३ ॥

षड्ज व पंचम हे हिचे अपन्यास सांगितले आहेत. हिचा न्यास गांधार असतो व ऋषभ वर्ज्य झाल्याने षाडव रूप होते. ॥ ११४ ॥

तसेच धैवत व ऋषभ वर्ज्य झाल्याने हिचे ओडव रूप बनते. हे दोन्ही स्वर लंघनीय आहेत.

(हिच्यात) सदोदित ऋषभावरून धैवताला जावे. गांधारीच्या बाबतीत (बाकीच्या स्वरांची) संगति न्यासस्वराशी व अंशस्वराशी करावयाची असते. ॥ ११५ ॥

अ.भा. - पुढे दुसऱ्या विषयाचा (मध्यमग्रामिक जातींच्या वर्णनाचा) प्रारंभ करतात. अतः परम् इ. येथे गंधारी जातीचे वर्णन असे आहे:- **गान्धार्यां** इ. या वर्णनाप्रमाणे ह्या जातीचे अंश स,ग,म,प,नि हे होतात; स,प हे अपन्यास व गांधार हा न्यास असतो. हिचे षाडव रूप ऋषभ वर्ज्य केल्याने होते. आणि औडुव रूप ऋषभ-धैवत वर्ज्य केल्याने होते. (औडुव रूप करण्यासाठी ऋषभाबरोबर पंचम वर्ज्य करता येत नाही कारण) मध्यमग्रामात पंचम हा स्वर अलोप्य असतो. ऋषभ-धैवतांचे लंघन करण्यात येते. पूर्णावस्थेमध्ये ऋषभावरून धैवतावर जावयाचे असते. बाकींच्या स्वरांचा संचार न्यांस स्वराच्या व अंशस्वराच्या संबधाने समजावा. या बाबतीतील नियम असा सांगितला आहे :-

**स्वरन्यासांशगोचरः** या वाक्याचा अर्थ - स्वरांचा न्यास (= विश्रान्ति) अंशावरून (='अंशगोचरः') समजण्यात यावा. असा अन्य विद्वान करतात. पण असा नियम सांगणे म्हणजे नियम न सांगण्यासारखे आहे. ह्या जातीच्या सर्व भेदांचे मिळून पंधरा अंश होतात. ते असे :- शुध्द-संपूर्ण भेदांचे अंश पाच; विकृत संपूर्ण भेदांचे अंश पाच; षाडव प्रकारांचे चार, कारण पंचमाचा अपवाद येतो. (= पंचम अंश असता षाडव रूप होत नाही.) गांधार अंश करण्यात येतो तेव्हाच या जातीचे औडुव रूप होते. अन्य स्वर अंश केले जातात, तेव्हा औडुव रूपाला अपवाद होतो. (औडव रूप होत नाही.) त्यामुळे या जातीच्या औडुव रूपाचा अंश एकच असतो. मिळून सर्व भेदांचे अंश एकूण पंधरा होतात. ॥ ११३-११५ ॥

**लक्षणं रक्तगान्धार्या गान्धार्या एव यत्स्मृतम् ।**
**धैवतो बलवानत्र दौर्बल्यं तस्य लोपतः ॥ ११६ ॥**

**गान्धारषड्जयोश्चात्र सञ्चारश्चार्षभादिना ।**
**अपन्यासस्तथा चैव मध्यमस्तु विधीयते ॥ ११७ ॥**

**गान्धारोदीच्यवांशौ तु विज्ञेयौ षड्जमध्यमौ ।**
**पाञ्चस्वर्य न चैवात्र षाट्स्वर्यमृषभं विना ॥ ११८ ॥**

**कार्यश्चान्तरमार्गश्च न्यासोपन्यास एव च ।**
**षड्जोदीच्यवतीवत्तु तत्र[१९] सर्वविधिः स्मृतः ॥ ११९ ॥**

**रक्तगांधारीचे** लक्षण जे गांधारीचे सांगितले तेच (होय). हिच्यात धैवत बलवान आहे; (तथापि षाडव-ओडव अवस्थेत) त्याचा लोप होत असल्यामुळे (त्यावेळी) तो दुर्बल समजावा. ॥ ११६ ॥

(मधला) ऋषभ सोडून षड्ज व गांधार यांची संगति करावयाची असते. हिचा अपन्यास मध्यम स्वर सांगितला आहे. ।। ११७ ।।

**गांधारोदीच्यवा** जातीचे षडज व मध्यम हे अंश जाणावे. हिच्यात ओडव रूप होत नाही. ऋषभ वर्ज्य झाल्याने हिचे षाङ्व रूप होते. अंतरमार्ग व न्यासापन्यास (आणि अल्पत्व बहुत्व आदि नियम) ही सर्व योजना षड्जोदीच्यवतीप्रमाणे सांगितली आहे. ।। ११८-११९ ।।

अ. भा.- रक्तगांधारी जातीचे लक्षण सांगतात- **लक्षणं रक्तगान्धार्या** : इ.= हिचे अंश स,ग,म,प,नि हे होत. रि वर्ज्य होण्याने षाडव आणि रि - ध वर्ज्य झाल्यामुळे अन्य म्हणजे औडव रूप तयार होते. तर मग (गांधारीपेक्षा) हिचे विशेष लक्षण ते कोणते ? तेच पुढे सांगतात :- **धैवतो बलवानत्र** इ. धैवताचे लोप्यत्व असल्यामुळे तो स्वर वास्तविक दुर्बल असावयास पाहिजे, पण तसे नसून उलट तो बलवान असतो.ह्या जातीत ऋषभ स्वराचे लंघन करून (=ऋषभाला सोडून देऊन ) षड्ज व गांधार यांना निकट आणण्यात येते, अर्थात त्यांचे मिलन करण्यात येते. ह्या जातीचा अपन्यास स्वर मध्यम आहे. हिचे एकूण अंश बारा आहेत, ते याप्रमाणे :- संपूर्ण भेदांचे पाच; षाडव भेदांचे चार, कारण (अलोप्य असल्याने) पंचमाचा अपवाद होतो; औडुव भेदांचे तीन, कारण औडुवित रूप होण्याला षड्ज व मध्यम या दोन स्वरांचा अपवाद येतो. ।। ११६ - ११७ ।।

आता गांधरोदीच्यवेचे (लक्षण सांगतात) :- **गान्धारोदीच्यवांशौ** इ. हिचे स व म हे दोन अंश असतात. ऋषभ वर्ज्य होतो तेव्हा षाडव रूप होते. हिचे औडुव रूप होत नाही. बाकीचे नियम षड्जोदीच्यवा जातीच्या प्रमाणे समजावे. अंश स्वरांची परस्परांशी संगति झाल्याने अंतरमार्ग होतो. स आणि ध हे हिचे अपन्यास असतात. अंशरूप षड्जाचा प्रयोग अतिशय होतो. ह्या जातीत ऋषभ लोप्य आहे, तथापि पूर्णावस्थेमध्ये त्याचा अल्प प्रयोग करण्यात येतो. मंद्रस्थानात गांधाराचा प्रयोग फार होतो. हे सर्व नियम ग्रंथावरून समजावयाचे आहेत. ह्या जातीचे एकूण अंश चार आहेत; संपूर्ण भेदाचे दोन व षाडव भेदाचे दोन. ।। ११८-११९ ।।

**मध्यमाया भवन्त्यंशा विनागान्धारसप्तमौ ।**
**एत एव ह्यपन्यासा न्यासश्चैव तु मध्यमः ॥ १२० ॥**

**गान्धारसप्तमापेतं पाञ्चस्वर्यं विधीयते ।**
**षाडवं चाप्यगान्धारं कर्तव्यं तु प्रयोगतः ॥ १२१ ॥**

**षड्जमध्यमयोश्चात्र कार्यं बाहुल्यमेव हि ।**
**गान्धारलङ्घनं चात्र कार्यं नित्यं प्रयोक्तृभिः ॥ १२२ ॥**

**मध्यमोदीच्यवा पूर्णा स्यंश एकस्तु पञ्चमः ।**
**शेषो विधिस्तु कर्तव्यो गान्धारोदीच्यवां गतः ॥ १२३ ॥**

गांधार-निषाद सोडून अन्य पाच स्वर **मध्यमा** जातीचे अंश असतात व तेच अपन्यास असून न्यास मध्यम असतो. ॥ १२० ॥

गांधार व निषाद वर्ज्य झाल्याने हिचे षाडव रूप योजिले जाते. प्रयोगानुसार हिचे षाडव रूप गांधार वर्ज्य करून योजावे ॥ १२१ ॥

हिच्यात षड्ज व मध्यम यांचे बाहुल्य योजावे आणि प्रयोगकर्त्यांनी हिच्यात गांधाराचे सदोदित लंघन करावयाचे असते. ॥ १२२ ॥

**मध्यमोदीच्यवा** जाति संपूर्ण असून पंचम हा तिचा एकच अंश आहे. बाकीची योजना गांधारोदीच्यवा जातीप्रमाणे करावी. ॥ १२३ ॥

अ.भा. - **मध्यमाया भवन्त्यंशा** : इ.:- स, रि, म, प, ध हे मध्यमा जातीचे अंश आणि अपन्यास आहेत. मध्यम हा न्यास आहे. गांधाराचा लोप झाल्यामुळे षाडव आणि गांधार-निषादांच्या लोपामुळे औडुव रूप तयार होते.षड्ज व मध्यम हे पर्यायांश असल्यामुळे त्यांचे बहुत्व सिध्द आहे, परंतु बहुत्व फार असते हे दर्शविण्यासाठीसाठी पुन्हा सांगितले आहे.गांधराचे लोप्यत्व असल्यामुळे अल्पत्व असते अर्थात ते पूर्णावस्थेतहि असते. हया जातीचे एकूण अंश वीस होतात, ते असे :- शुध्द भेदाचे अंश पाच, तेवढेच विकृत, षाडव व ओडव भेदांचे प्रत्येकी समजावे. ॥ १२०-१२२ ॥

मध्यमोदीच्यवा जातीचा अंश पंचम हा असतो. ही जाति नित्यपूर्ण आहे. हिचे अपन्यास षड्ज व धैवत असून, हिच्यात गांधार व मध्यम यांचे बाहुंल्य असते. न्यासस्वर मध्यम हा होय. बाकीचे नियम गान्धोरोदीच्यवा जातीच्या प्रमाणे समजावे. हिची अंशसंख्या एक ही आहे. ॥ १२३ ॥

**द्वावंशावथ पञ्चम्यामृषभः पञ्चमस्तथा ।**
**सऋनिषा[२०] दावपन्यासी न्यासश्चैव तु पञ्चमः ॥ १२४ ॥**

**मध्यमावत्तु कर्तव्ये षाडवौडुविते तथा ।**
**दौर्बल्यं चात्र कर्तव्यं षड्जगान्धारमध्यमैः ॥ १२५ ॥**

**कुर्यादप्यत्र सञ्चारं पञ्चमस्यर्षभस्य च ।**
**गान्धारगमनं चैवं कार्यं त्वल्पं च सप्तमात् ॥ १२६ ॥**

पंचमी जातीत ऋषभ व पञ्चम हे दोन अंश असतात. ऋषभ व निषाद हे अपन्यास असून पंचम हा न्यास असतो. ॥ १२४ ॥

हिची षाडव व ओडव रूपे मध्यमा जातीप्रमाणे करावी. तसेच हिच्यात षड्ज, गांधार व मध्यम हे स्वर दुर्बल ठेवायचे असतात. ॥ १२५ ॥

हिच्यात पंचम व ऋषभ यांची संगाति योजावी व निषादापासून अल्प असे गांधाराला जावे.॥ १२६ ॥

अ. भा. - **द्वावंशावथ पञ्चम्याम** इ. = पंचमी जातीचे ऋषभ व पंचम हे अंश असून ऋषभ व निषाद हे अपन्यास असतात. पंचम हा न्यास असतो. ॥ १२४ ॥

मध्यमा जातीच्या प्रमाणे म्हणजे गांधार वर्जित झाल्याने षाडव आणि गांधार व निषाद हे वर्ज्य केल्याने औडुव रूप होते. ही गोष्ट 'मध्यमावत्तु ' ह्या शेष शब्दांनी व्यक्त करण्यात आली आहे. षड्ज व मध्यम हे स्वर ह्या जातीत अनंश असल्यामुळे तसेच गांधाराचे लोप्यत्व असल्यामुळे ह्या तिन्ही स्वरांचे अल्पत्व ( आपोआपच) सिध्द होते, तथापि ह्या स्वरांचे अल्पतरत्व दर्शावण्यासाठी **दौर्बल्य चात्र कर्तव्यम्** इत्यादि वचन ग्रंथात आले आहे. ॥ १२५ ॥

ह्या जातीत ऋषभ व मध्यम ह्या स्वरांची अन्योन्य संगति असते. निषादापासून गांधारगमन म्हणजे पूर्णावस्थेत निषादावरून गांधार स्वरावर गमन करण्यात येते. परंतु ते परिमित असते. ह्या जातीचे एकूण अंश पाच होतात, ते असे - शुध्द संपूर्ण मेदाचे दोन; षाड्व भेदाचे दोन; व औडुविताचा एक,कारण ऋषभ अंश असता गांधार व निषाद वर्ज्य होत नाहीत. ॥ १२६ ॥

**अथ गान्धारपञ्चम्याः पञ्चमोंऽशः प्रकीर्तितः ।**
**तारगत्या तु षड्जोऽपि कदाचिन्नातिवर्तते ॥ १२७ ॥**

**ऋषभः पञ्चमश्चैव ह्यपन्यासौ प्रकीर्तितौ ।**
**न्यासश्चैव तु गान्धारः सा च पूर्णस्वरा सदा ।**
**पञ्चम्या यश्च गान्धार्याः सञ्चारः स विधीयते ॥ १२८ ॥**

**पञ्चमश्चार्षभश्चैव गान्धारोऽथ निषादवान् ।**
**चत्वारोंऽशा भवन्त्यार्ष्यामपन्यासास्त एव हि ॥ १२९ ॥**

**गान्धारश्च भवेन्यासः षड्जापेतं तु षाडवम् ।**
**गान्धारार्षभयोश्चापि सञ्चारस्तु परस्परम् ॥ १३० ॥**

**सप्तमस्य च षष्ठस्य न्यासो गत्यनुपूर्वशः ।**
**षड्जस्य लङ्घन चात्र नास्ति चौडुवितं सदा ॥ १३१ ॥**

**गांधारपंचमी** या जातीचा अंश पंचम हा सांगितला आहे. ह्या जातीची तारगति (तार-) षड्जाच्या पलीकडे केव्हाहि असत नाही. ॥ १२७ ॥

हिचे अपन्यास ऋषभ व पंचम हे सांगितले आहेत व न्यास गांधार (म्हटला आहे.) ही जाती नेहमी संपूर्ण असते. पंचमी व गांधारी ह्या जातींत जी स्वरसंगति असते ती हिच्यात याजिली जाते. ॥ १२८ ॥

आंध्री जातीचे अंश ऋषभ, गांधार , पंचम आणि निषाद हे चार स्वर असतात व तेच अपन्यासही असतात. ॥ १२९ ॥

(हिच्यात) गांधार न्यास असतो. षड्ज वर्ज्य झाल्याने हिचे षाडव रूप होते. गांधार व ऋषभ यांची परस्पर संगति (हिच्यात) असते. ॥ १३० ॥

स्वरगगतीच्या अनुसार धैवत व निषाद या स्वरांवर न्यास होत असतो. हिच्यात षड्जाचे लंघन करावयाचे असते. (हिच्यात ) ओडव रूप कधीही होत नाही. ॥ १३१ ॥

अ. भा. - गांधारपंचमी जातीचा अंश पंचम, अपन्यास ऋषभ व पंचम आणि न्यासस्वर गांधार हा असतो. ही जाती नित्यपूर्ण असते. ('पञ्चम्याश्च गान्धार्याः सञ्चारः') = गांधारी व पंचमी या दोन्ही जातींत होणारी स्वरसंगति या जातीत करावयाची असते.) गांधारी जातीत ऋषभावरून धैवतावर संचार होतो. पंचमी जातीत मध्यम व ऋषभ यांची संगति होते आणि निषादावरून गांधारावर गमन करावयाचे असते. ह्या दोन्ही प्रकारच्या संगति या जातीत होतात. हिचा अंश फक्त एकच असतो. ॥ १२७-१२८ ॥

**पञ्चमश्च** .. इ.- आंध्री जातीचे अंश रि,ग,प,नि हे असतात. अपन्यासहि हेच स्वर होतात. गांधार हा या जातीचा न्यासस्वर होय. षड्ज वर्ज्य केल्याने हिचे षाडव रूप होते. ह्या जातीचे औडव रूप होत नाही. ऋषभ - गांधार ह्यांची आणि धैवत-निषाद ह्यांची संगति होते. **न्यासो गत्यनुपूर्वशः** ज्यावेळी जो अंश प्रधानभूत असेल, त्यावेळी त्या अंशस्वरावरून न्यासगमन करावयाचे असते. म्हटले आहे की- 'अंशानुपूर्व्या न्यासगमनम्' (म्हणजे अंशाच्या अनुक्रमाने न्यासाला जावयाचे.) अन्य लोक ('न्यासो गत्यनुपूर्वशः' ह्या वाक्याचा अर्थ असा करतात :- ज्या क्रमाने अंश स्वर सांगितले गेले आहेत त्याच क्रमाने ते न्यासस्वरापर्यंत घ्यावयाचे असतात.' ह्या जातीचे अंश आठ आहेत, संपूर्ण भेदाचे चार व षाडव भेदाचे चार. ॥ १२९-१३१ ॥

**नन्दयन्त्याः क्रमान् न्यासापन्यासांशाः प्रकीर्तिताः ।**
**गान्धारो मध्यमश्चैव पञ्चमश्चैव नित्यशः ॥ १३२ ॥**

**षड्जो लोप्यश्च लङ्घ्यश्च नान्ध्रीसञ्चरणं भवेत् ।**
**लङ्घनं ह्यृषभस्यापि तच्च मन्द्रगतं स्मृतम् ॥ १३३ ॥**

**तारगत्या तु षड्जस्तु कदाचिन्नातिवर्तते ।**
**गान्धारो वा ग्रहः कार्यस्तथा न्यासश्च नित्यशः ॥ १३४ ॥**

**नंदयंती** जातीचा नेहमी अंश पंचम, अपन्यास मध्यम व न्यास गांधार हा स्वर सांगितला आहे. ॥ १३२ ॥

(षाडव रूपात) षड्ज हा स्वर वर्ज्य होतो. ( ह्या जातीच्या संपूर्ण प्रकारात ) षड्ज लंघनीय असतो; ऋषभाचेही लंघन करावयाचे असते पण ते मंद्रस्थानात सांगितले आहे. ( हिच्यात ) स्वरांची संगति आंध्रीप्रमाणे करावयाची नसते. ॥ १३३ ॥

किंवा हिचा ग्रह नेहमी गांधार तसेच तोच न्यास योजावा. हिची तारगति ( तार-) षड्जाच्या पलीकडे कधीहि जात नाही. ॥ १३४ ॥

अ.भा. - आता नंदयंती (जातीचे लक्षण सांगतात) :- नन्दयन्त्यां क्रमात् इ. = नंदयंती जातीचा ग्रह व न्यास गांधार आणि अपन्यास मध्यम सांगितला आहे. ह्या जातीचा अंश पंचम असून तोच अपन्यास असतो असे नंतर म्हटले आहे. षड्ज वर्ज्य केल्याने हिचे षाडव रूप होते. षड्जाच्या लोप्यत्वामुळे त्याचे लंघनत्व सिध्द होते. पुनरुक्तीमुळे षड्जाचे अल्पतरत्व असते असे समजावयाचे आहे.

**नान्ध्रीसञ्चरणम्** = गान्धारी व आर्षभी मिळून आन्ध्री जाति बनते आणि आर्षभी, गांधारी व पंचमी यांच्या मिश्रणाने नंदयंती जाति उत्पन्न होते, असे निरूपण संसर्गज प्रकरणात करण्यात आले आहे. त्यामुळे 'जातिवयस्यकारणतुल्यत्वाद् आन्ध्रीवत् संगतिः प्राप्ता' म्हणजे समान कारणामुळे मित्र असलेल्या आंध्रजातीप्रमाणे ( नंदयंतीत ) स्वरसंगति प्राप्त होते या म्हणण्याचे खंडन ' नान्ध्रीसञ्चरणं भवेत्' ह्या वचनाने करतात. ( कोणत्याहि अन्य जातींच्या ) जनक जाती समान असल्या तरी त्या त्या जन्य जातीची रंजकता भिन्न स्वरूपाची असल्यामुळे त्यातील स्वरसंगतीहि निराळ्या पध्दतीने करावयाला पाहिजे असे येथे सुचवितात. **ऋषभस्य लङ्घनं मन्द्रगतस्य** इ. येथे धर्मी म्हणजे जाति, तिचा धर्म म्हणजे स्वभावगुण. ह्या जातीत मंद्र स्थानातील ऋषभाचे लंघन सांगितले आहे. हा (या जातीचा स्वभावगुण समजावा.)

**तारगत्या षड्जो नातिवर्तते** :- ( ह्या जातीची तारस्थानातील स्वरगति तार) षड्जाच्या पुढे होत नसते, अर्थात तार षड्जाच्या पुढे जावयाचे नसते. (या नियमाप्रमाणे ) त्याच्या पुढे शिरःस्थानातील सात स्वरांना स्पर्श करायचा नसतो असा अर्थ (समजावयाचा आहे.) अन्य विद्वान (याचा असा अर्थ) सांगतात :- ह्या जातीत तार षड्जसुध्दा घ्यावयाचा (किंवा ओलांडावयाचा) नसतो, त्याचा आरोह करावयाचा नसतो.'

कदाचित् इ. (या शब्दाने असे समजावयाचे की,) तारस्थानाबद्दलचा हा नियम वैकल्पिक आहे. ह्या जातीच्या संपूर्ण भेदाचा एक व षाडवं भेदाचा एक मिळून हिचे एकूण अंश दोन होत. ॥ १३२-१३४ ॥

**कार्मारव्याः स्मृता ह्यंशा आर्षभः पञ्चमस्तथा ।**
**धैवतश्च निषादश्चाप्यपन्यासास्त एव तु ॥ १३५ ॥**

**पञ्चमश्च भवेन्यासो हैनस्वर्यं न चात्र तु ॥**
**गान्धारस्य विशेषण सर्वतो गमनं भवेत् ॥ १३६ ॥**

कार्मारवी जातीचे अंश ऋषभ, पंचम, धैवत आणि निषाद हे सांगितले आहेत, अपन्यासहि तेच होत. ॥ १३५ ॥

हिचा न्यास पंचम हा असतो व ह्या जातीत वर्ज्य स्वर नसतो. (हिच्यात) गांधार स्वराची संगति विशेषकरून इतर सर्व स्वरांशी होते. ॥ १३६ ॥

अ. भा. **कार्मारव्याः** इ. कार्मारवी जातीचे रि,प,ध,नि हे अंश व तेच अपन्यास असून पंचम हा न्यास असतो. ही जाति नित्यपूर्ण आहे. **विशेषेण** इ. हिचे बाकीचे म्हणजे अंश नसलेले हे अर्थात थोडेच (म्हणजे तीनच) आहेत. ह्या जातीत विशेषतः गांधार स्वरांची सर्व स्वरांशीं यथाशक्ति संगति करावयाची असते. विशाखिलाचार्यांनी (हा नियम) असा सांगितला आहे :- " ह्या जातीचे अनंश स्वर बहुल असतात व त्याची विशेषतः गांधार स्वराशी संगति (=गमन ) होते." ह्या जातीचे संपूर्ण भेदाचे चार अंश होतात; (अर्थात हिचे एकूण अंश एवढेच आहेत.) ॥ १३५-१३६ ॥

**कैशिक्यास्तु तथा ह्यंशा : सर्वे चैवार्षभं विना ।**
**एत एव ह्यपन्यासा न्यासौ गान्धारसप्तमौ ॥ १३७ ॥**

**धैवतेंऽशे निषादे च न्यासः पञ्चम इष्यते ।**
**अपन्यासः कदाचित्तु ऋषभोऽपि विधीयते ॥ १३८ ॥**

**आर्षभे षाडवं चात्र धैवतर्षभवर्जितम् ।**
**तथा चौडुवितं कुर्याद् बलिनौ चान्त्यपञ्चमौं ॥ १३९ ॥**

**दौर्बल्यमृषभस्यात्र लङ्घनं च विशेषतः ।**
**अंशवत्कल्पितश्चान्यैः षाडवे तु विधीयते ।**
**षड्जमध्यावदत्रापि सञ्चारस्तु भवेदिह ॥ १४० ॥**

**कैशिकी** जातीचे अंश ऋषभाखेरीज बाकीचे सर्व स्वर (म्हणजे स,ग,म,प,ध,नि) असून अपन्यासहि तेच होत. हिचे न्यासस्वर गांधार व निषाद हे आहेत. ॥ १३७ ॥

धैवत आणि निषाद हे स्वर अंश असता पंचमस्वर हा न्यास मानला आहे. पण केव्हा ऋषभहि अपन्यास म्हणून योजला जातो. ॥ १३८ ॥

हिच्यात ऋषभ वर्ज्य झाल्याने षाडव तसेच ऋषभ - धैवतं वर्ज्य करून औडुवित रूप करावे. (या जातीत ) निषाद व पंचम हे स्वर बलवान असतात. ॥ १३९ ॥

हिच्यात ऋषभ दुर्बल असून त्याचे विशेषतः लंघन करावे लागते. अन्य (विद्वानांनी) ऋषभाला अंशाप्रमाणे मानले असून षाडव रूपात तो वर्ज्य सांगितला आहे. हिच्यात षड्जमध्या जातीप्रमाणे स्वरसंगति असते.॥ १४० ॥

अ. भा.- **कैशिक्यास्तु** इ. कैशिकी जातीचे अंश स,ग,म,प,ध,नि हे स्वर असून तेच अपन्यास असतात आणि गांधार व निषाद हे न्यास असतात. धैवत व निषाद हे जेव्हा अंश असतात, तेव्हा पर्यायाने पंचम हा न्यास होतो. **कदाचिद् ऋषभोऽपि** इत्यादि ( क्वचित् ऋषभहि अंश होऊ शकतो; अर्थात ) त्याचा लोप होण्याची अवस्था असते तेव्हा तो अंश होऊ शकणार नाही. ( हे उघड आहे. त्यामुळे असे समजावयाचे की) एका संपूर्ण दशेतच तो अंश होऊ शकतो. **दौर्बल्यमृषभस्यः**- ऋषभाच्या लोप्यत्वामुळे त्याचे दुर्बलत्व असते. ऋषभाचा लोप करण्यात येतो तेव्हा ह्या जातीचे षाडव रूप होते आणि ऋषभ व धैवत हे दोन्ही स्वर वर्ज्य करण्यात येतात तेव्हा हिचा औडुव प्रकार होतो. **बलिनौचान्त्यपञ्चमौ** इ. दुसऱ्या पर्यायांशांपेक्षा पंचम व निषाद हे स्वर बलवत्तर असतात. षड्जमध्या जातीत सर्व स्वरांचा जसा यथेष्ट संचार सांगितला आहे तसाच तो ह्या जातीतहि करावयाचा आहे, पण ह्या ज़ातीत स्वरसंचारांचे प्रमाण काहीसे कमीच ठेवावयाचे आहे. हिचे एकूण अंश सहा होतात. ॥ १३७ - १४० ॥

अ. भा.- जातीपासून उद्‌भवणाऱ्या ग्रामरागादिकांची सूचना करण्याच्या हेतूने कित्येक विद्वान खालीलप्रमाणेची आर्या (मूळ ग्रंथात) देतात :- 'मिश्रं गेयं यत्.' इ.- 'जातीची दहा लक्षणे वेगवेगळया प्रकाराने मिश्र होऊन जातींपासून अनेक ग्रामराग आदि उत्पन्न होतात. ते अनेक प्रकारच्या वर्णालंकारांनी युक्त असल्यामुळे त्यांच्यात वैचित्र्यहि आलेले असते आणि (त्या कारणाने ) त्यांच्यांत रंजकताहि अतिशय असते.

'मिश्रम्' - जातीची अंशसंबद्ध जी दहा लक्षणे मागे सांगितली त्यांच्या संकीर्णतेमुळे मिश्र 'गेयम्' म्हणजे ग्रामरागादि. ते (गेयसुध्दा) एका जातीचा अंश तर दुसऱ्या जातीचा न्यास आणि तिसऱ्या एका जातीचा अपन्यास अशाप्रकारे ( मिश्रित असल्यामुळे त्याच्यात ) फार वैचित्र्य आलेले असते. अशाप्रकारचे जे मिश्र गेय (ग्रामरागादिक) त्याच्या नियमांचे, अमुक ह्या जातीपासून उत्पन्न झाले इत्यादि अनेक प्रकारे मतंग,नंदी,कश्यप, याष्टिक आदि ग्रंथकारांनी वर्णन केले आहे. जसा एखाद्या सरबत वगैरे पेयात मिश्रणाचा क्रम नसतो तसा ह्या गेयात मिश्रणाचा क्रम नसतो. आणखी पुढे सांगतातः- संकर म्हणजे त्यांची अतिसंकीर्णता भूषण संतति म्हणजे पुढे दर्शविण्यात येणारे अनेक अलंकार; त्याच्यायोगे (हे ग्रामराग आदि)फार विभिन्न रूपाचे होतात.त्यांचे वर्णन कोठवर करावे, असा सांगण्याचा उद्देश. 'रञ्जनातिशयात् ह्यात (म्हणजे रागगायनात) रंजकता अतिशय असते, त्यामुळे गान (=जातिगान, गांधर्व) वगैरे मध्ये ह्याचा (=रागगायनाचा ) जास्त उपयोग होऊ शकत नाही, हा सारांश. **दत्तिलाचार्यांनीहि** असेच म्हटले आहे :- 'सङ्करे रूपबाहुल्याज्जातिनिर्देशः' इत्यादि (द.९६) ['म्हणजे मिश्रणामध्ये रूपबाहुल्य होत

असल्याने जातीचा निर्देश केला जातो.'] भिन्नषड्ज राग षड्जोदीच्यवत्ती जातीच्या समान म्हटला जातो, अर्थात त्याचे स्वरूप नंदयंती जातीपेक्षा (नंदयंती जातीपासून उत्पन्न होणाऱ्या रागाहून) पुष्कळ भिन्न असते (हि उघड आहे. भिन्न षड्जरागाचे स्वरूप याप्रमाणे आहे :-) धैवत हा अंश आणि मध्यम न्यास असून ह्यात ऋषभ व पंचम हे स्वर वर्ज्य होतात. म्हणूनच ग्रामरागांची लक्षणे मुनींनी[२१] आपल्या ग्रंथात सांगितली नाहीत. ह्या वस्तुस्थिती (= 'अर्थे') संबंधी जे लोक सर्वथा अनभिज्ञ आहेत, ते कश्यपादि ग्रंथकार (रागविषयीचे) प्रणेता म्हणून प्रसिध्द आहेत असे सांगून लोकांना बनवितात. त्याचे निराकरण करावे ह्या हेतूने त्यांची (= ग्रामरागांची) लक्षणे थोडक्यात आम्ही येथे क्रमाने देत आहोत :-

'षाड्जी, मध्यमा व मध्यमोदीच्यवा यांच्या संकराने, मध्यम न्यास असलेले, क्रमशः षड्जग्राम व मध्यमग्राम हे राग उत्पन्न होतात.' ॥ १ ॥

शुध्दषाडव या रागाचा अंश व न्यास मध्यम हा असून तो मध्यमा जातीपासून उत्पन्न होतो. पंचम हा राग मध्यमा व पंचमी या दोन जातींपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश व न्यास पंचम स्वर असून , त्यात गांधार व निषाद अल्प असतात. ॥ २ ॥

शुध्दसाधारित ग्रामराग (षड्जमध्या जातीपासून) उत्पन्न झाला असून त्याचा अंश (तार) षड्ज व न्यास मध्यम आहे. कैशिकमध्यम हाहि कैशिकी व षड्जमध्या या दोन जातींपासून उत्पन्न झाला असून त्याचाहि अंश (तार) षड्ज व न्यास मध्यम आहे. ॥ ३ ॥

शुध्दकैशिक ग्रामराग कैशिकी व कार्मारवी या दोन जातींपासून उत्पन्न होतो. गांधार-निषादहीन असा तो संपूर्ण असून (अंतर-काकली यांनी युक्त असतो.) त्याचा अंश षड्ज व न्यास पंचम असतो. ह्याप्रमाणे शुध्द गीती सात प्रकारची होय. (अर्थात हे सात राग शुध्द गीतीचे समजावे.) ॥ ४ ॥

भिन्नषड्ज हा ग्रामराग षड्जोदीच्यवा जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश धैवत व न्यास मध्यम आहे. या रागात ऋषभ - पंचम वर्ज्य आहेत. भिन्नतान या ग्रामरागाचा अंश स्वर पंचम हा असून न्यास मध्यम आहे. मध्यमा व पंचमी या दोन जातींपासून त्याची उत्पत्ति होते. ॥ ५ ॥

भिन्नकैशिकमध्यम हा ग्रामराग षड्जमध्या जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश षड्ज असून न्यास मध्यम असतो. तो गांधार व निषाद हे स्वर अल्प असणारे असा जाणावा. भिन्नपंचम ग्रामरागाचा अंश धैवत व न्यास पंचम असतो. तो मध्यमा व पंचमी या जातींपासून तयार होतो. ह्या रागात ऋषभ स्वर दुर्बल असून अंश स्वराचा प्रयोग मंद्रस्थानात (विशेष) होतो. भिन्न कैशिक ग्रामराग कार्मारवी आणि षड्जमध्यमा या जातीपासून उत्पन्न होतो. ॥ ६ - ७ ॥

त्याचा अंश षड्ज आणि न्यासस्वर पंचम हा असतो. याप्रमाणे भिन्नगीतीचे हे पाच भेद (= राग) मानले आहेत. गौडपंचम हा ग्रामराग धैवती व षड्जमध्यमा या दोन जातींपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश धैवत व न्यास मध्यम हा असतो. यात पंचम व निषाद हे अल्प असतात. गौडकैशिकमध्यम ग्रामराग हा षृडजस्वर अंश आणि मध्यम स्वर न्यास असणारा असा असून त्याच्यात पंचम वर्ज्य असतो. तो

धैवती आणि मध्यमा या जातींपासून उत्पन्न होतो. गौडकैशिक या ग्रामरागाचा अंश षड्ज व न्यास पंचम असतो.. ॥ ८-९ ॥

तो कार्मारवी व षड्जमध्यमा या दोन जातींपासून उत्पन्न होतो.अशाप्रकारे (गौडज म्हणजे गौडी गीतीपासूनचे) राग तीन प्रकारचे होत. ......... ॥ १० ॥

टक्क या रागाचा अंश व न्यास षड्ज हा असतो. यात स्वरसंगति पुष्कळ होते. सौवीर हा ग्रामराग षड्जमध्यमा जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश व न्यास षड्ज असून त्यात गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य होतात. ॥ ११ ॥

मालवेसर[२२] (मालवंचम ?) हा मध्यमा व पंचमी या जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश व न्यास पंचम असून त्याच्यात गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य असतात. वेसरषाडव हा षड्जमध्यमा जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश व न्यास मध्यम हा असून त्याच्यात गांधार व निषाद वर्ज्य होतात. ॥ १२ ॥

(बोट्ट) हा[२३] ग्रामराग षड्जमध्यमा व पंचमी या जातींपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश पंचम असून न्यास मध्यम असतो. हिंदोल हा ग्रामराग आर्षभी व धैवती ह्या दोन जाती सोडून अन्य पाच (शुध्द) जातीपासून ( म्हणजे षाड्जी, गांधारी, मध्यमा, पंचमी व नैषादी या जातींपासून) उत्पन्न होतो. त्याचा अंश व न्यास षड्ज हा असतो. ॥ १३ ॥

टक्ककैशिक ग्रामराग मध्यमा व धैवती या जातींपासून तयार होतो. त्याचा अंश व न्यास धैवत असून त्याच्यात निषाद व गांधार अल्प असतात. मालवकैशिक हा ग्रामराग कैशिकी जातीपासून होतो. त्याचा अंश व न्यास षड्ज असून त्यात धैवत अल्प असतो. (आणि काकली निषाद असतो.) ॥ १४ ॥

(याप्रमाणे) वेसरागीती आठ प्रकारची आहे. ............... ॥ १५-१६ ॥

भम्माणपंचम[२४] हा ग्रामराग षड्जमध्यमा व नैषादी या जातींपासून उत्पन्न होतो. तो पूर्ण असून, त्याचा अंश षड्ज असतो. आणि न्यास स्वर (षड्ज) धैवत किंवा मध्यम असतो. त्यात गांधार व निषाद अल्प असतात. ॥ १७ ॥

रूपसाधार हा (षड्जमध्यमा व नैषादी या दोन जातींपासून उत्पन्न होतो.) त्याचा अंश षड्ज (किंवा निषाद) असून न्यास मध्यम असतो. गांधारपंचम हा ग्रामराग गांधारोत्पन्न (म्हणजे गांधारी व रक्तगांधारी या जातींपासून उत्पन्न झालेला ) असून त्याचा अंश व न्यास गांधार असतो. ह्यात त्रिश्रुतिक स्वर (म्हणजे ऋषभ व धैवत हे) दुर्बल असतात. ॥ १८ ॥

रेवगुप्त हा आर्षभी जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश ऋषभ हा असून न्यास मध्यम असतो.ह्या रागाता षड्ज स्वर वर्ज्य होतो. षड्जकैशिक, ग्रामराग कैशिकी जातीपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश षड्ज असून ....... त्यात गांधार व निषाद अल्प असतात. ॥ १९ ॥

शकपंचम हा षाड्जी व धैवती या जातींपासून उत्पन्न होतो. त्याचा अंश व न्यास षड्ज असून त्यात गांधार व निषाद यांचे अल्पत्व असते. या प्रमाणे ही[२५] साधारणी नावाची गीति नऊ प्रकारची (?) सांगितली आहे. ॥ २० ॥

भाषा आणि विभाषा ह्या (आणखी) दोन गीती असून त्या ग्रामरागांच्या आश्रित मानल्या गेल्या आहेत. ह्याप्रमाणे या सात गीती ध्रुवागानाच्या उपयोगासाठी असतात. ॥ २१ ॥

(ग्रामरागांचे संक्षिप्त वर्णन देण्यासाठी मूळ ग्रंथात) उपरोक्त आर्या[२६] कित्येक लोकांनी घेतलेली आहे. परंतु आमच्यापाशी असलेल्या पुस्तकात ही आर्या आढळत नाही. शिवाय ही आर्या घेतल्याशिवाय ह्या (ग्रामरागांच्या) विषयाची उपलब्धि (ग्रंथात) होत नाही. असेहि नाही कारण ग्रंथात जातींचे (निरनिराळे) अंश सांगितले आहेत. त्यामुळे ग्रामरागादिकांचा सर्व विषय स्वीकृत झालेलाच आहे. ग्रंथातही गायनाला उपयागी असणाऱ्या वैचित्र्याची जाणीव मुनींनी करून दिलीच आहे :- **चतुःस्वरप्रयोगोऽपि ह्यवकृष्टध्रुवास्विह** म्हणजे या शास्त्रात अवकृष्ट ध्रुवांमध्ये चार स्वर असणारा प्रयोगहि असतो.) असे सांगणाऱ्या मुनींनी पुढे अंलकारवैचित्र्य दाखविले आहे.

**एवमेता बुधैर्ज्ञेया जातयो दशलक्षणाः ।**
**यथा यस्मिन् रसे याश्च गदतो मे निबोधत ॥ १४१ ॥**
**इति भारतीये नाट्यशास्त्रे जातिविकल्पनं नामाध्यायोऽष्टाविंशतितमः ।**

ह्याप्रमाणे दहा लक्षणांनी युक्त अशा या जाती सुज्ञांनी जाणाव्या. या जाती ज्या रसात जशा (गावयाच्या) आहेत, तो विषय आता सांगतो. तो समजून घ्या. ॥ १४१ ॥

याप्रमाणे भारतीय नाट्शास्त्राचा **जातिविकल्पन** नावाचा हा अठ्ठाविसावा अध्याय संपूर्ण झाला.

॥ अध्याय २८ वा समाप्त.. ॥

अ. भा. - आता या अध्यायाच्या विवेचनाचा उपसंहार करीत असतानाच पुढच्या अध्यायातील विषयाची प्रस्तावना करतात.- **एवमेता** इ. (प्रस्तुत अध्यायाचा विषय) जातींची दहा लक्षणे वर्णन करण्याचा होता. (आता पुढच्या अध्यायात) निराळया विषयाचे वर्णन करावयाचे आहे. तो आशय व्यक्त करण्यासाठी म्हणतात. :- **बुधै** इ. तसेच **यथा यस्मिन्** इ.. जो रस ज्या अंशांमुळे किंवा न्यास वगैरेमुळे ज्या प्रकाराने **याः** म्हणजे ज्या (जाती) असा अर्थ. **गदतो मे** इ. येथे षष्ठि विभक्ति अनादर या अर्थी आहे. तिचा आशय असा की, या विषयात माझे वचन हेच केवळ प्रमाण मानू नये, कारण या विषयाचे निरूपण कश्यपमुनी आदि विद्वानांनी केले आहे, तर तेंहि प्रमाण समजावे. ॥ १४१ ॥

चंद्रशेखर शिवाच्या चरणकमलांचा आश्रय केल्यामुळे ज्याचा (त्रिविध) ताप नष्ट झाला आहे. त्या अभिनवगुप्ताने गुप्त (म्हणजे रहस्ययुक्त) अशा ह्या जात्यध्यायाचे हे विवेचन केले आहे.

ह्याप्रमाणे श्रीमहामाहेश्वर आचार्य **अभिनवगुप्ताने** नाट्यवेदावर केलेल्या अभिनवभारती नावाच्या टीकेचा जातिविकल्प नावाचा अठ्ठाविसावा अध्याय येथे समाप्त झाला.

## टीपा

अनुक्रमांक

(१) नाट्यशास्त्राच्या ३१ व्या अध्यायात (ध्रुवाध्यायात) ध्रुवागानाचे सोदाहरण विवेचन मिळते. संस्कृत नाट्यप्रयोगात पार्श्वगायन म्हणून ध्रुवा योजीत. या ध्रुवा त्र्यस्र व चतुरस्त्र तालात गायल्या जात. रंगपीठाच्या मागच्या बाजूस रंगशीर्ष हा भाग असे. या रंगशीर्षात वाद्यवादक व गायकगायिका बसत व ध्रुवा गात. स्थान व रस या अनुसार पात्र प्रवेशाच्या वेळी प्रावेशिकी, पात्राच्या निष्क्रमणाच्यावेळी नैष्क्रामिकी, पात्राच्या भावरसात एकदम बदल झाला असता आक्षेपिकी (उदाहरणार्थ शृंगार रसातून एकदम वीररसाचा अविष्कार), या बदललेल्या वृत्तीतील पुनः मन प्रसन्न होण्यासाठी प्रासादिका, प्रयोगात काही अडथळा आल्याने किंवा मुकुट खाली पडणे, दुःखातिशयाने पात्राचे खाली कोसळणे, अंतरा (निरर्थक शब्दयोजना असलेले गीत) गायली जात. ध्रुवा सार्थ असल्याने त्यांचा अर्थ महत्त्वाचा असे. यामुळे ध्रुवागानात वर्णालंकारांचा वापर मोजकाच करावयाचा असे.

(२) अलातचक्राप्रमाणे (ज्योतिचक्राप्रमाणे) पेटते कोलीत इत्यादि वर्तुळाकार फिरवले असता असंड ज्योतिचक्राचा भास उत्पन्न होतो. तसेच क्षुद्र वाद्येही आपापले स्वर व वर्ण यांनी नाट्यातील रंजकता चालू ठेवण्यात आपापल्या प्रकृतीप्रमाणे चतुर्विध मुख्य वाद्यांना अंतशः अनुसरण करून साहाय्य करतात.

(३) 'सुषिर' म्हणजे छिद्र. पोकळ नळीतून वारा फुंकून वाजविली जाणारी बासरी, सनई इत्यादि वाद्ये सुषिर या प्रकारात गणली जातात. सुषिर वाद्ये आणि तंत्री वाद्ये ही स्वरवाद्ये होत.

(४) स्पष्टीकरणात 'रथंतरं गायत्री' असा उल्लेख आहे. समावेदाच्या गानग्रंथांपैकी ऊह्य किंवा रहस्यगान यांतील २९ वे साम 'रथंतर' हे आहे. या सामाचा ऋषि वसिष्ठ असून छन्द 'गायत्री' आहे. याची देवता इन्द्र ही आहे.

(५) ''पादमार्ग'' या ऐवजी 'पादभाग' हा शब्द संगीतरत्नाकरातील तालवर्णनात मिळतो. तालाच्या बाबतीत लघूची एक मात्रा, गुरूच्या दोन आणि प्लुताच्या तीन मात्रा असतात. मूळ मुख्य ताल त्र्यश्र आणि चतुरश्र हे होत; त्र्यश्र हा ताल सहा गुरूंचा असतो. उदाहरणार्थ - 'चा च पुटः' या 'चा' च्या दोन मात्रा, 'च' ची एक, 'पु' ची एक आणि 'टः' च्या दोन असा हा यथाक्षर त्र्यश्र ताल होय. याचे द्विकल स्वरूप

अनुक्रमांक

करताना मात्रांची संख्या दुप्पट म्हणजे १२ होते. यांत ६ गुरू अक्षरे असून त्यामध्ये प्रत्येक भाग २ गुरूंचा असे तीन पादभाग आहेत. ते ऽऽ ऽऽ ऽऽ या खुणांनी निदर्शित केले जातात. ( गुरु = ऽ )

(६) जातीच्या षाडव आणि औडुव प्रकारात विशिष्ट एक किंवा दोन स्वरांचा लोप करावयाचा असतो. त्या संबंधीचा एक नियम असा की संवादी स्वरांचा लोप कधीही करायचा नसतो. संवाद परस्पर स्वरांचा होतो, श्रुतींचा नव्हे. त्यामुळे षड्जमध्या जातीत मध्यम अंश असता तिच्या षाडव प्रकारात निषादाचा लोप हा या नियमाला अपवाद ठरत नाही. दुसराही एक महत्त्वाचा विचार या बाबतीत करणे आवश्यक आहे. मध्यम आणि निषाद यांच्यात ९ श्रुतींचे अंतर असतानाही भरतमुनींनी त्यांचा संवाद दिलेला नाही. कारण संवाद सिद्धीसाठी संवादी स्वर सम श्रुतिक पाहिजेत. मध्यमाच्या ४ श्रुती व निषादाच्या २ श्रुती यामुळे हा संवाद मानलेला नाही. आणखीही एक कारण देता येते. शिक्षा ग्रंथानुसार गांधार व निषाद हे उदात्तापासून, ऋषभ आणि धैवत हे अनुदात्तापासून आणि षड्ज, मध्यम, पञ्चम हे तीन स्वरिता पासून निष्पन्न झाले. निषादाची उत्पत्ती उदात्तापासून व मध्यमाची स्वरितापासून होत असल्याने त्यांच्या उत्पत्ति स्थानांतही भिन्नता आहे.

(७) संवादी स्वरांचे विवेचन करताना अभिनवगुप्तांनी बिन्दु धातूचे उदाहरण दिले आहे. वीणावादनात तारेवर विशेष रीतीने प्रहार करून जे रंजक स्वरनाद उत्पन्न होतात ते धातू होत. या धातूंच्या वादनाने वीणावादन खूप रंजक होते. बिन्दु या धातूत एका तारेवर एका जागी प्रहार करून दीर्घ नाद उत्पन्न केला जातो. या धातूच्या वादनात एकाच जागी निषादाच्या तारेवर षड्ज व मध्यम यांचे वादन केले जात नाही. तसे केल्यास विसंवाद उत्पन्न होतो.

(८) वीणेतील तारा बांधण्याचे स्थान ढिले असल्यास वीणेवरील सारणा बिघडते. बेसुरेपणा निर्माण होतो. तसे न होण्यासाठी वीणेचा दंड, वीणेवरील पडदे, वादकाची बोटे यांच्यामधील दोष स्वरांतील बेसुरेपणा निर्माण करण्यास कारणीभूत होतो. बाह्य कारणामुळेही स्वरात कमी जास्तीपणा निर्माण होतो.

(९) एकश्रुतिदूरात्सम्बुद्धौ। (पा. १.२.३३)- एखाद्यास दुरून बोलवत असता योजलेला आवाज एक श्रुति होय. या बोलण्याच्या आवाजात उदात्तादि स्वरांचा अभाव असतो. हा आवाज एकसुरी असतो. त्यात विशिष्ट स्वरूपाचा चढउतार नसतो.

अनुक्रमांक

(१०) षड्जग्राम व मध्यमग्राम यांत मध्यमाचा लोप होत नाही. मध्यमाच्यापुढे मध्यमग्रामात त्रिश्रुतिक पञ्चमाची प्राप्ती व्हायची असते. त्याचा निग्रह म्हणजे ४ श्रुतींतील एका श्रुतीचा नाश होय. 'निग्रहे' म्हणजे निषादाचे ग्रहण करावयाचे असते तेव्हा जो त्रिश्रुतिक धैवत आहे तेथपर्यंत करावे. निग्रह म्हणजे एका श्रुतीचा नाश.

(११) ''षिद्गौरादिभ्यश्च''॥ (पा. ४.१.४१) 'ङीष्' म्हणजे स्त्रीलिंगवाचक दीर्घ ई हा प्रत्यय. काकली या शब्दात कल या पुल्लिंगी शब्दामध्ये स्त्रीलिंगवाचक दीर्घ ई प्रत्यय लागून काकली असे रूप तयार झाले. वरील सूत्रात 'गौर' इत्यादींमध्ये ई हा प्रत्यय लागून 'गौरी' असे स्त्रीलिंग रूप होत असल्याचे सांगून, 'काकली' मध्येही तसेच समजायचे आहे.

(१२) साधारण स्वर म्हणजे अंतर गांधार व काकली निषाद हे दोन स्वर. त्यांचा विशिष्ट उपयोगच नियमानुसार करावयाचा असतो. तसा न केल्यास जातीची श्रुतिव्यवस्था यात बिघाड उत्पन्न होतो आणि रंजकता नष्ट होते. काव्यमालाप्रतीत ३८ व्या श्लोकाच्या उत्तरार्धात 'नयन्ते त्वन्तरस्वराः' असा पाठ आहे. अन्तरगांधार व काकली निषाद हे दोनच साधारण स्वर असल्याने हा बहुवचनी पाठ योग्य वाटत नाही. अन्तरस्वराः या ऐवजी अन्तरस्वरः असाही पाठ घेतलेला आहे. काव्यमाला प्रतीप्रमाणेच कलकत्ता आवृत्तीतील ३७ व्या श्लोकांत पाठ मिळतो.

(१३) 'यथा स्वं दुर्बलतरं...' स्वरसाधारणाचा प्रयोग असणाऱ्या मध्यमा, पंचमी व षड्ज-मध्या या तीन जाती होत. पंचमी जातीचा अंश स्वर पंचम आणि ऋषभ हाही दुसरा अंश- स्वर होय. या जातीत षड्ज, गांधार व मध्यम अत्यल्प असतात. तिचे षाडव स्वरूप गांधाराच्या लोपाने व औडुव स्वरूप निषाद आणि गांधार यांच्या लोपाने होते. ऋषभ अंश असता संवादित्व नसल्याने औडुव स्वरूप होत नाही. ते फक्त पंचम हा अंश असतानाच होते. व्यत्यास म्हणजे उलटापालट. आशय हा की पंचम अंश असता अंतरगांधार व काकली निषाद दुर्बलतर असे योजावे. म्हणजे गांधाराच्या जागी अंतरगांधार आणि निषादाच्या जागी काकली निषाद अशी योजना करावी.

(१४) शुद्ध जातीचे न्यास हे लक्षण सोडून बाकीची लक्षणे म्हणजे संपूर्णत्व, ग्रह आणि अपन्यास यांमधील कोणत्याही एकाचा, दोन्हींचा किंवा अधिक लक्षणांचा बदल झाल्यास शुद्ध जातीचे विकृत स्वरूप होते. न्यास मात्रा बदलायचा नसतो.

अनुक्रमांक

(१५) संसर्गज विकृत जाती ११ आहेत. कारणरूप जातींच्या पैकी प्रत्येकीचे अंश वगैरे स्वर व हानि (म्हणजे एक किंवा दोन स्वर कमी असल्याने होणारे षाडव व औडुव प्रकार), यामुळे संसर्गज विकृत जाती हे स्वरूप उत्पन्न होते. उदाहरणार्थ- षड्ज मध्यमा जातीत षाड्जी व मध्यमा यांचे संमिश्रण असल्याने होणारे स्वरूप हे संसर्गज विकृत जाती होय. संसर्ग म्हणजे संमिश्रता.

(१६) षड्जकैशिकी, कार्मारवी, गांधारपंचमी आणि मध्यमोदीच्यवा या नेहमी संपूर्ण स्वरूप असणाऱ्या जाती होत. गांधारोदीच्यवा, आंध्री आणि नंदयंती या नेहमी षाडव स्वरूपाच्या होत. या कधीही ओडव होत नाहीत. गांधारोदीच्यवा ही ऋषभाच्या लोपाने, आंध्री षड्ज लोपाने आणि नंदयंती ही ही षड्ज लोपाने षाडव होतात.

(१७) 'अन्ये च बलिनो यस्य' - ज्याचे संवादी व अनुवादी स्वरही गीतभागात पुष्कळपणे असतात, ज्याचे प्राधान्य उत्पन्न करण्यासाठी त्याचा संवादी किंवा अनुवादी स्वर घेतला जातो, जो वादी म्हणून प्रयुक्त होणाऱ्या आपल्या स्वतःचा केव्हा केव्हा संवादी होतो, पण ज्याचा अनुवादी स्वर दुसरा असतो, ज्या बलिष्ठ स्वराचे संवादी व अनुवादी अन्य स्वर असतात;

'अन्यच्च' हा पाठ कलकत्ता आवृत्तीत घेतला आहे.

(१८) या जातीच्या वर्णनात संगीत रत्नाकरात (१.७९) 'ध निषादौ मनाग्बहु' असा पाठ आहे. त्यावरून 'धैवतस्य निषादस्य किञ्चिदाधिक्य मिष्यते' हा कंसात दिलेला पाठ नाट्यशास्त्रातील वर्णनात घेतलेला दिसतो.

(१९) अल्पत्व-बहुत्व इत्यादी षड्जोदीच्यवती प्रमाणे जाणावे.

(२०) १२४ व्या श्लोकात ऋषभ आणि निषाद अपन्यास सांगितले आहेत. संगीत रत्नाकरात हिच्यात ऋषभ, पंचम आणि निषाद हे अपन्यास दिले आहेत.

(२१) भरतमुनींनी ग्रामरागांची लक्षणे आपल्या ग्रंथात दिलेली नाहीत. मतंगाच्या बृहद्देशीत ही सर्व लक्षणे मिळतात. जातिगान, गांधर्व इत्यादींत रागगायनाचा फारसा उपयोग होत नाही. ग्रामरागात रंजन अतिशय असते. लक्षणांच्या संकीर्णपणामुळे ग्रामराग इत्यादींमध्ये खूप वैचित्र्य असते.

अनुक्रमांक

(२२) मालवपंचम रागाचे स्वरूप संगीत रत्नाकरात दिले आहे. मालववेसर हा जो राग येथे दिला आहे त्याच्याशी असलेल्या साम्यावरून मालवपंचम हे नाव सुचविले आहे.

(२३) बोट्ट हे नाव जरी दिलेले नाही तरीही संगीत रत्नाकरात दिलेले वर्णन समान असल्याने बोट्ट हे नाव स्वीकारले आहे.

(२४) भम्माणपंचम - संगीत रत्नाकरात हा राग शुद्धमध्यमा जाती पासून उत्पन्न झाल्याचे सांगितले आहे. त्याचा ग्रह, अंश व न्यास षड्ज असून मध्यमही न्यास असतो. मतंगाने मध्यम स्वर हाच न्यास सांगितला आहे.

(२५) येथे दिलेली ग्रामरागांची वर्णने सहाच रागांची आहेत. ' नर्त ' राग अधिक घेतल्याने ही संख्या सात होते. संगीतरत्नाकरांत साधारणी गीतीचे सात राग दिले आहेत. येथे दिलेल्या रागांत ' नर्त ' राग घेतल्यावर सात ही संख्या होते. ' नव ' हा पाठ योग्य वाटत नाही.

(२६) ही आर्या अशी -

आर्या

मिश्रं गेयं यदि यत्तद्‌र्थितज्ञेयमधिकबाहुल्यम् ।

सङ्करभूषणसन्ततिवैचित्र्याण्यत्र रञ्जनातिशयत् ॥

• •

## परिशिष्ट १
## जातिविषयक तक्ता

| | जाति | अंशस्वर | न्यास | अपन्यास | षाडवातलोप्य स्वर | औडुवात लोप्य स्वर |
|---|---|---|---|---|---|---|
| × १ | षाड्जी | स, ग, म, प, ध, | स | ग, प | नि | – – |
| × २ | आर्षभी | रि, ध, नि | रि | रि, ध, नि | स | स, प |
| ३ | गांधारी | स, ग, म, प, नि | ग | स, प | रि | रि, ध |
| ४ | मध्यमा | स, रि, म, प, ध | म | स, रि, म, प, ध | ग | ग , नि |
| ५ | पंचमी | रि, प | प | रि, प, नि | ग | ग, नि |
| × ६ | धैवती | रि, ध | ध | रि, म, ध | प | स, प |
| × ७ | नैषादी | नि, रि, ग | नि | नि, रि, ग | प | स, प |
| × ८ | षड्जकैशिकी | स, ग, प | ग | स, प, नि | – | – – |
| × ९ | षड्जोदीच्यवा | स. म, ध, नि | म | स, ध | रि | रि, प |
| × १० | षड्जमध्यमा | स. रि, ग, म, प ध, नि | स, म | स, रि, ग, म प, ध, नि | नि | ग, नि |
| ११ | गांधारोदीच्यवा | स, म, | म | स, ध | रि | – – |
| १२ | रक्तगांधारी | स, ग, म, प, नि | ग | म | रि | रि, ध |
| १३ | कैशिकी | स,ग,म,प ध, नि | ग, प, नि | स, ग, म, प, ध, नि | रि | रि, ध |
| १४ | मध्यमोदीच्यवा | प | म | स, ध | – | – – |
| १५ | कार्मारवी | रि, प, ध, नि | प | रि, प, ध, नि | – | – – |
| १६ | गांधारपञ्चमी | प | ग | रि, प | – | – – |
| १७ | आन्ध्री | रि, ग, प, नि | ग | रि, ग, प, नि | स | – – |
| १८ | नंदयंती | प | ग | म, प | स | – – |

मागे हे ( × ) चिन्ह असणाऱ्या जाती षड्जग्रामाच्या असूनं, बाकीच्या मध्यमग्रामाच्या होत. जातींची इतर लक्षणे या अध्यायात दिलेल्या अनुवादावरून समजून घ्यावी. औडुव स्वरूपात सामान्यतः संवादी स्वरांची जोडी लोप्य असते.

# परिशिष्ट २

## प्राचीन गांधर्व - गीते

मद्रक इत्यादी प्राचीन गांधर्वगीते भरताने वर्णिलेली आहेत. ही गांधर्वगीतें शंकराच्या स्तुतीमध्ये प्रयुक्त करायची असत असे शार्ङ्गदेवाने म्हटले आहे ( सं. र. ५.५६ ) त्यांच्यामध्ये वस्तूंचे एकवाक्यत्व अथवा भिन्न वाक्यत्व असे. त्यांचे पुनः निर्युक्त, पदनिर्युक्त आणि अनिर्युक्त असे प्रकार असत. एकवाक्यत्व म्हणजे एका क्रियेशी अन्वय; भिन्नवाक्यत्व म्हणजे प्रत्येक वस्तूची क्रिया वेगवेगळी असणे, सर्व अंगांनी युक्त ते निर्युक्त, स्तुतिवाचक शब्दांनी रचलेले ते पदनिर्युक्त; उपोहन व प्रत्युपोहन नसलेले व केवळ वस्तूंनीच रचलेले ते अनिर्युक्त होय. या गीतांची थोडी कल्पना यावी यासाठी मद्रकगीताचे वर्णन पुढे देत आहे–

मद्रक, एककल, द्विकल आणि चतुष्कल अशा तालयोजनेमुळे तीन प्रकारचे असते. तसेच चार वस्तू असणारे व तीन वस्तू असणारे असे ते पुनः दोन प्रकारचे असते. शीर्षक मात्र तीन वस्तू असणाऱ्या मद्रकातच योजले जाते. एककल मद्रकातील वस्तू आठ गुरू व आठ लघू असलेली असते. ज्या जातीची स्वरयोजना करायची तिचा न्यास किंवा अपन्यास या स्वरावर किंवा संन्यास अथवा अंशस्वरावर वस्तूची समाप्ति करायची असते. त्यातील पहिले तीन गुरू ध्रुवपातयुक्त किंवा पात ( हाताची टाळी ) रहित योजून बाकीच्या गुरू आणि लघु यांच्या बाबतीत योजायचे पात असे –

ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ । । । । । । । ।

उ उ उ श श ता श श श ता ता श ता श ता सं

( उ = उपोहन; श = शम्या, ता = ताल, सं = संनिपात )

याप्रमाणे तीन किंवा चार वस्तू गाऊन, तीन वस्तूंच्या शेवटी चतुष्कल किंवा पंचपाणि तालात शीर्षक गावे. ते पुढीलप्रमाणे तालात योजावे –

ऽ । ऽ ऽ । ऽ ही एक कला होय.

सं ता श ता श ता

ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

आ नि वि प्र आ ता वि श आ नि वि ता

ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

आ नि वि श आ ता वि प्र आ नि वि स

यात सहा पादभाग आहेत. प्रत्येक पादभागात चार गुरू आहेत. द्विकल मद्रकालवस्तूचे प्रमाण दुप्पट असते आणि चतुष्कल मद्रकात द्विकलाच्या दुप्पट प्रमाण असते. त्यांचा प्रस्तार संगीत रत्नाकरातून

पहावा. आवाप म्हणजे उताण्या हाताची पसरलेली बोटे आकुंचित करणे; निष्क्राम म्हणजे पालथ्या हाताची बोटे पसरणे; विक्षेप म्हणजे बोटे पसरलेला उताणा हात उजव्या बाजूला फेकणे आणि प्रवेश म्हणजे तो पालथा योजून बोटे आकुंचित करणे.

गीतातील स्वरांची सुयोग्य धारणा होण्यासाठी गीताच्या आरंभी भरताने उपोहन सांगितले आहे. उप म्हणजे जवळ व ऊहन म्हणजे तर्काने जाणणे. गीतातील स्वर, शुष्काक्षरे ( अर्थहीन अक्षरे ) योजून उपोहनात म्हटले जात. ही अक्षरे झण्टुं जगतिय वलितक इत्यादी प्रकारची असत. भरताने सांगितले आहे – " ज्यापासून गीतातील स्वरयोजना समीपतेने जाणली जाते आणि ज्याच्यामुळे गीत सुरू होते ते शुष्काक्षरयुक्त गान उपोहन होय. " [ ना. शा. बडोदा आ, भा. ४ पृ. २१६, अध्याय ३१, श्लोक १३८ ]

पहिल्या वस्तूच्या आरंभी योजले जाते ते उपोहन आणि बाकीच्या वस्तूच्या आरंभी योजायचे ते प्रत्युपोहन होय ( किंवा एका वस्तूत प्रथम योजलेले ते उपोहन आणि नंतर योजलेले प्रत्युपोहन होय. )

● ●

# परिशिष्ट ३
## बहिर्गीते

निर्गीत (सार्थ अक्षरे नसणारे) किंवा बहिर्गीत (नाट्यवस्तूत अन्तर्गत न होणारे गीत) यांची योजना पूर्वरंगात केली जात असे. रंगभूमीच्या मागील भागात, मध्ये गायक-गायिका आणि वादक बसलेले असत. ते व रंगपीठ (ज्यावर नाट्यप्रयोग नट सादर करीत) यामध्ये पडदा असे. रंगभूमीच्या मागच्या भागाला रंगशीर्ष ही संज्ञा होती. प्रत्यक्ष नाट्यप्रयोग सुरू होण्याआधी पूर्वरंग योजला जात असे. देवतांना प्रसन्न करणे व विघ्नांचा नाश होणे असे दुहेरी उद्दिष्ट पूर्वरंगाचे असे. या पूर्वरंगात एकूण १९ विधी असून त्यातील पहिले नऊ पडद्याच्या मागे सादर केले जात. यात वाद्यवादन मुख्य असे. नंतर पडदा दूर झाल्यावर बाकीचे १० विधी सादर केले जात. दहाव्या गीतविधीत मद्रक इत्यादी गांधर्वगीत तसेच अभिजात नृत्य योजल्यावर बाकीचे विधी सादर केले जात. निर्गीत किंवा बहिर्गीत यात अर्थहीन अशी अक्षरे योजलेली असत. ही तालबध्द अक्षरे वाद्यांवर योजून निर्गीत सादर केले जाई. त्याचे नऊ विधी पुढीलप्रमाणे होत–

(१) प्रत्याहार – यात वाद्यांची योग्य मांडणी केली जाई.

(२) अवतरण – यात गायक-वादक आपापले स्थान ग्रहण करीत.

(३) आरंभ – यात कंठसंगीत सादर करण्यासाठी आवश्यक अशी स्वरसाधना केली जाई.

(४) आश्रावणा – यात वाद्ये सुरांत मिळवली जात.

(५) वक्त्रपाणि – यात वाद्यवादनात हस्तप्रहारांनी निर्माण करावयाचे विविध प्रकार योजले जात.

(६) परिघट्टना – यात तंत्रीवाद्यांच्या तारांवर सुयोग्य प्रहारांनी वादन केले जाई.

(७) संखोटना – (किंवा संघोटना) – यात तालवादनातील विविध हस्तप्रकार योजून तालप्रमाण निर्दिष्ट केले जाई.

(८) मार्गासारित – यात अवनद्ध वाद्ये आणि तंत्रीवाद्ये यांचे संयुक्तवादन सुरेलपणे सादर केले जाई.

(९) आसारित – यात तिन्ही लयींत तालवैशिष्ट्ये सादर केली जात.

## परिशिष्ट ४

### रंगशीर्षावरील गायक - वादक वृंदव्यवस्था
### ( कुतपविन्यास )

→ ८ हात

८ हात ↓

| | | |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| ५ | | |
| ७ | | १० |
| | रंगशीर्ष | |
| ६ | | ९ |
| ४ | | ८ |

१ – मृदंगवादक; २ – पणववादक; ३ – दर्दुरवादक

४ – गायक; ५ – वीणावादक; ६, ७ – चंशवादक

८, ९, १० गायिका.

● ●

